पुणे भारत इतिहास संशोधक मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ७५

# संभाजीकालीन पत्रसारसंग्रह

(श. १६०२-श. १६१०)

संपादक

शंकर नारायण जोशी

भा. इ. सं. मं. पुणे

प्रकाशक - चिटणीस भा. इ. सं. मं. पुणे २

भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे

प्रथम आवृत्ती : शके १८७१, इ. स. १९४९

द्वितीय आवृत्ती : शके १९३७, इ.स. २०१५

पवार पब्लिक चॅरिटेबल ट्रस्ट, मुंबई
यांच्या आर्थिक सहकार्याने हे पुस्तक पुनःप्रकाशित होत आहे.

# संभाजीकालीन पत्रसारसंग्रह

प्रथम आवृत्ती - शके १८७१, इ. स. १९४९
द्वितीय आवृत्ती - शके १९३७, इ. स. २०१५



मुखपृष्ठ :
श्री. दिनेश कड

मुद्रक :
अपरांत,
४१, गिरीजाधाम,
राजेंद्रनगर, पुणे - ४११०३०.
भ्रमणध्वनी : ९४०३६०५७८३

प्रकाशक :
भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे
१३२१, सदाशिव पेठ, पुणे - ४११०३०.
दूरध्वनी : ०२०-२४४७२५८१

मूल्य : रु. २५०/-

# अनुक्रमणिका

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

'भारत इतिहास संशोधक मंडळा'ने अस्सल ऐतिहासिक दस्तऐवजांचा शोध हे उद्दिष्ट प्रथमपासूनच बाळगले आहे. सुरूवातीच्या काळात मंडळातील कार्यकर्त्यांनी महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरही गावोगावी प्रवास करून ठिकठिकाणच्या जुन्या घराण्यांकडून जुनी कागदपत्रे गोळा केली. त्यासाठी त्यांना कोण कष्ट घ्यावे लागले, किती मिनतवाऱ्या कराव्या लागल्या, कागदपत्रे झाडून, झटकून स्वच्छ कशी करावी लागली यांच्या आठवणी व आख्यायिका आजही ऐकायला मिळतात.

छत्रपती शिवाजी महाराज हे मराठयांच्या इतिहासातील अजोड स्फूर्तिस्थान, त्यांच्या काळातील व त्यांच्या चरित्रावर प्रकाश टाकणारे दस्तऐवज गोळा करायचे व सारांशरूपाने तर जमेल त्याप्रमाणे मूळ रूपात प्रकाशित करायचे हा मंडळाचा उद्योग गेली शंभर वर्षे चालला आहे. 'शिवकालीन पत्रसारसंग्रह' आणि 'शिवचरित्र साहित्य' या दोन मालिकांचे अनुक्रमे तीन व पंधरा खंड मंडळाने आजवर प्रसिद्ध केले आहेत.

त्यानंतर संभाजीकालीन पत्रांचा संग्रह करण्याची कल्पना निघाली. मंडळातील नाणावलेले इतिहास संशोधक (कै.) शंकर नारायण जोशी यांच्याकडून मंडळाने 'संभाजीकालीन पत्रसार संग्रहा'चा पहिला खंड तयार करून घेतला. त्याला शंकरराव जोश्यांची उदबोधक प्रस्तावनाही लिहवून घेतली. मंडळाच्या त्रैमासिकांच्या ३० व्या वर्षांचे हे पहिले दोन अंक एकत्रितपणे १९४९ साली प्रसिद्ध केले, त्यापैकी दुसरा अंक हा आताचा ग्रंथ आहे. त्यावेळी त्याची किंमत रूपये ३ इतकी होती.

त्यानंतर आता ६६वर्षे झाली. हा ग्रंथ दुष्प्राप्य झाला. तेव्हा मंडळाने निर्णय घेतला की, ग्रंथ नव्याने छापून प्रसिद्ध करायचा. मंडळाची पुण्याई मोठी. मुंबईच्या पवार चॅरिटेबल ट्रस्टने घसघशीत अनुदान दिले. 'अपरान्त प्रकाशना'चे पराग पुरंदरे यांनी पुस्तक छपाईची जबाबदारी घेतली आणि हे देखणे काम पार पाडले. मंडळाशी संबंधित संशोधक श्री. ग. भा. मेहेंदळे, श्री. पांडुरंग बलकवडे, डॉ. सौ. अनुराधा कुलकर्णी यांनीही लागेल ती मदत केली. या सर्वांच्या योगदानामुळे व मुख्यतः 'पवार चॅरिटेबल ट्रस्ट'च्या औदार्याने हा उपक्रम सिद्धीस गेला. त्या सर्वांचे आभार.

''संभाजीकालीन पत्रसार संग्रहाचा' दुसरा खंड जवळ जवळ तयार झाला आहे. यथाकाल तोही प्रसिद्ध होण्याचा सुदिन उगवेल असा भरवसा वाटतो.

श्री. मा. भावे

चिटणीस, भारत इतिहास संशोधक मंडळ

# प्रस्तुत अंकाविषयीं थोडेसे

भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकाचा हा जोड अंक प्रसिद्ध होण्यास आमच्या अपेक्षेपेक्षां विलंब झाला ह्याबद्दल क्षमस्व! युद्धकालीन परिस्थिति निवळल्यानंतर त्रैमासिक वेळच्या वेळीं वाचकांचे हाती जावे अशी योजना व संकल्प होता. त्याप्रमाणें गेल्या दोन वर्षांतले बहुतेक सर्व अंक बाहेर पडलेहि।

त्रैमासिकाच्या मागच्या अंकाची छपाई सुरु असतानाच, मंडळांतील आजीव सेवकांपैकी कोणाचे तरी एखादे पुस्तक प्रसिद्ध व्हावे ह्या हेतूनें, दुसऱ्या सभासदांकडून आलेला मजकूर बाजूला ठेऊन मंडळाचे सुप्रसिद्ध इतिहास संशोधक श्री. शं. ना. जोशी ह्यांना विनंति केली थोडासा आग्रही·पणा धरून त्यांच्याकडून हे काम करवून घ्यावे लागले.

झालेल्या विलंबाचा थोडासा फायदा घेऊन गेली बारा वर्षे मधून मधून क्रमशः प्रसिद्ध होणारे "दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधनें, खण्ड तिसरा" हे प्रकरणही प्राध्यापक वा. वि. मिराशी ह्यांचा नगरधन ताम्रपटावरील लेख मुद्रित करून पुरें केले आहे.

संभाजीकालीन शकावली, पत्रसारसंग्रह, विस्तृत सूची, तसेच मध्ययुगीन साधनांची परिपूर्ति ह्या सर्वांच्या मुळें सुमारें २०० पृष्ठांचा हा जोड अंक स्वागतार्ह वाटेल यांत शंका नाहीं.

ह्या अंकातच पुरवणी दाखल पुण्यास भरलेल्या साहित्य संमेलनाचे वेळीं प्राचीन मराठी शिलालेखांचे एक मोठे प्रदर्शन भरविले होते त्यावेळीं तयार केलेली "मंडळाची गेल्या ३० वर्षांतील साहित्य सेवा" सर्व प्राचीन व मराठी शिलालेखांचा परिचय ही दोन प्रकरणें जोडली आहेत. इतिहास संशोधनाचे अनुषंगानें मंडळाचे कडून मराठी भाषेची ही सेवा सर्व रसिकांचे चरणी रुजू होईल असा विश्वास वाटतो.

गेल्या एक दोन वर्षांमागें मंडळानें प्राचीन इतिहास संशोधनाचा एक नवीन उपक्रम करून पाहिला तो म्हणजे कऱ्हाड येथील दानशूर श्रीमंत पांडु अण्णा शिराळकर ह्यांच्या प्रोत्साहनानें सुरू केलेले कऱ्हाड येथील उत्खनन. ह्या उत्खननांत कऱ्हाड येथे सातवाहन कालीन अवशेष सापडले व आतां ते काम पूर्ण होऊन त्याविषयींचा विस्तृत सचित्र अहवाल, या अंका पाठोपाठच प्रसिद्ध होत आहे हे कळविण्यास संतोष होतो.

मंडळांत यंदा व्याख्यानेंही बरीच व उद्‌बोधक विषयांवर झाली. गेल्या संमेलनाचे निमित्तानें डॉ. तु. ना. देवरे यांचे बहामनी कालीन वाङ्मय तसेच श्री. जांभेकर ह्यांचे कै. बाळशास्त्री जांभेकर ह्याचा जीवन वृत्तांत व कार्य व श्री. तळवलकर ह्यांचे शातवाहन कालीन शिल्प ही विशेष उल्लेखनीय वाटतात.

नगर संशोधन समितीमार्फत शनवारवाडा व पाताळेश्वर लेणीं ह्यांची पहाणी हेही दोन कार्यक्रम सांगण्यासारखें झाले.

पुणें विद्यापीठ स्थापन झाल्यापासून, मंडळाचा त्यांत समावेश व्हावा ह्या दृष्टीनें प्राथमिक पत्रव्यवहारही ह्या वर्षी झाला व त्यांत मंडळांस यश येईल अशी खात्री वाटते.

यंदा मंडळाचे कार्याध्यक्ष महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार हे दिल्ली येथें भरलेल्या, व मंडळानें प्रथम सुरुवात करून दिलेल्या इंडियन हिस्टरी कॉंग्रेसचे अध्यक्षस्थानी विराजमान होते. त्याबद्दल त्यांचा गौरव मंडळानें ह्या पूर्वीचा अंक Dehli Special Number काढून केलाच आहे.

यंदाचे वर्षी मंडळाचे एक आस्थेवाईक व व्यासंगी सभासद श्री. गो. कृ. मोडक हे थोडयाशा आजारानंतर कालवश झाले हे नमूद करण्यास खेद होतो. मंडळाचे प्रत्येक सभेस नियमाने हजर रहात व प्रासंगिक चर्चेत भाग घेत. त्यांच्या निधनानें महाराष्ट्रांतील व्याकरण विषयाची एक बाजू लंगडीच पडल्यासारखी झाली.

चिटणीस

भा. इ. सं. मंडळ

# प्रास्ताविक

१ ग्रंथविशेष, २ दिवाणसत्ता व पेठेंतील शेटे-महाजन-वतनदारसत्ता, ३ राजकीय: दक्षिणीपक्ष व औरंगजेब; इंग्रज, ४ राज्यकारभार, ५ संभाजी बखरींतील काल-निर्दिष्ट प्रसंग व समारोप.

१

वीस वर्षांपूर्वी 'त्रिशत-सांवत्सरिक-श्रीशिवाजी-स्मारक-ग्रंथावली' म्हणून पांचसहा ग्रंथ मंडळाकडून प्रसिद्ध झाले ( श. १८५१ इ. १९३० ). ह्या सहाहि ग्रंथांत 'शिवकालीन पत्रसारसंग्रह' हाच ग्रंथ आद्य व प्रमुख होय. ह्या ग्रंथाचे एकंदर तीन खंड श. १८५८ (= इ. १९३७) अखेर प्रकाशित झाले आहेत. असल्या ग्रंथाची थोरवी व उपयुक्तता किती तें एक अभ्यासकच जाणूं शकतील. बहुमोल ह्याच्याहि पुढला शब्द बिनमोल हा आहे. व तशीच गोष्ट असल्या ग्रंथाची आहे. इतिहासाच्या साधनांत मूळ समकालीन पत्रें मिळून तीं प्रसिद्ध होणें; त्यांतहि तीं एकत्रित व कालानुक्रमानें प्रसिद्ध होणें ह्याच्या इतका आनंद व उत्साह अभ्यासकास दुसरा कशानेंहि मिळणार नाहीं. अशा सारसंग्रह-ग्रंथाचा प्रथमच उपक्रम भा. इ. सं. मं. नें केला व तो पहिले छत्रपती श्रीशिवाजीराजे यांच्या" कारकीर्दी पासून केला. तोच वर उल्लेखिलेला शिवकालीन पत्रसारसंग्रह हा त्रिखंडात्मक ग्रंथ होय. आणि त्याच्याच पुढला ग्रंथ म्हणजे दुसरे छत्रपती, शिवाजीराजांचे ज्येष्ठ पुत्र, संभाजी राजे ह्यांच्या राजवटीस अनुलक्षून 'संभाजीकालीन पत्रसारसंग्रह हा ग्रंथ, आज प्रसिद्ध होत आहे.

ह्या ग्रंथांत शिवकालीन पत्रसार-संग्रहाप्रमाणें निरनिराळ्या ५४ मराठी साधन ग्रंथांतून श.१६०२ ते श.१६१० म्ह.इ.१६८० ते १६८९ ह्या९वर्षांतील पत्रें कालानुक्रमानें, राजकीय दृष्ट्या साररूपानें संग्रहीत केलेलीं आहेत. शिवाजी-प्रमाणेंच संभाजीच्या ह्या कामासाठीं 'शिवचरित्र-कार्यालया' सारखें 'संभाजी चरित्र कार्यालय' आहे व तें हें आहे आणि त्या मार्फत प्रस्तुत ग्रंथ तयार झाला आणि आतां तो प्रसिद्ध होत आहे असें नाहीं. हें सांगण्याचा इत्यर्थ एवढाच कीं, शिवचरित्र कार्यालयाप्रमाणें ह्या ग्रंथासाठीं कोणाची देणगी वगैरे आज भा. इ. सं. मं. कडे आलेली नाहीं आणि शि. का. प. सा. सं. प्रमाणें

इंग्रजी, फारसी, डच, पोर्तुगीज इत्यादि अन्य भाषांतीलहि पत्रें ह्या ग्रंथांत मराठींत भाषांतरित करून घेतलीं गेलेली नाहींत. मराठी साधनसाहित्या-पुरताच मुख्यतः हा प्रयत्न आहे.

शिवकालीन प. सा. संग्रह आणि हा संभाजीकालीन प. सा. संग्रह ह्यांतील शिव—व संभाजी—कालीन ह्या संज्ञेनें त्या त्या ग्रंथांत संग्रहीत केलेल्या पत्रांच्या कालाची मर्यादा स्पष्ट होत असली तरी शि. का. प. सा. सं. त शिवपूर्वकालीनहि पत्रांचे उतारे घेतले आहेत.—व त्यासंबंधीची स्पष्टता त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत केली आहे—आणि ह्या संभाजी का. प. सा. सं. ग्रंथांत संभाजीच्या कार-कीर्दीतीलच म्ह. नऊ वर्षांमधीलच पत्रें घेतलीं असलीं तरी शि. का. प. सा. सं. हा ग्रंथहि संभाजी चरित्रासाठीं अवश्य अभ्यासांत घेतला पाहिजे. कारण, संभाजीचा छत्रपती ह्या नात्याचा काल नऊ वर्षांचा आहे पण छत्रपती होण्यापूर्वीची संभाजीची कामगिरी पंधरा वर्षांची आहे; व ती ह्या छत्रपतीपद-प्राप्तीनंतरच्या पत्रांतून अर्थातच आलेली नाहीं. म्हणून शिवकालीन पत्रसार-संग्रहाचे तीनहि खंड किंवा शिवचरित्र साहित्याचे आतांपर्यंतचे नऊहि खंड संभाजी—चरित्रासाठीं अगत्यपूर्वक अभ्यासिले पाहिजेत. इतकेंच नव्हे, ह्यापुढें असेच पुढल्या पुढल्या राजवटींच्या पुरतेच पत्रांचे संग्रह-ग्रंथ निघाले तरी पहिल्या पहिल्या पत्रसारसंग्रहग्रंथांचें अध्ययन अपेक्षितच राहील.

ह्या ग्रंथाचा दुसरा विशेष म्हणजे पृ. ९९ ते १२० हीं २२ पानें जोडलेली 'छत्रपति संभाजी शकावली' आणि शेवटीं जोडलेली सूची ही होय. शकावलींत छत्रपती होण्याच्या आधींच्याहि संभाजीच्या हालचाली दाखविल्या आहेत आणि सारसंग्रहांत तर छत्रपती झाल्यानंतरचीं पत्रें घेतलीं आहेत; आणि ह्या दोहोंतहि आलेल्या व्यक्तिस्थलनामांचा संग्रह सूचींत केला आहे. शि. का. प. सा. सं. च्या तिसऱ्या खंडांत 'शिवाजी शकावली' दिली आहे, पण त्या शकावलींत आलेल्या व्यक्तिस्थलांची नोंद त्याच खंडांत जोडलेल्या सूचींत आलेली नाहीं. अशा दृष्टीनें पाहतां प्रस्तुत ग्रंथास जोडलेली ही सूची यथार्थ होय. आतांपर्यंत निरनिराळ्या शकावली व सूची त्या त्या ग्रंथास जोडल्या आहेत. पण त्यांत त्यांतीलच शकावलींतील उल्लेखांची नोंद सूचींत घेणें राहिली ती उणीव ह्या सूचींत नाहीं. तिसरा एक विशेष ह्या ग्रंथाचा सांगणें इष्ट व तो म्हणजे प्रारंभीं जोडलेली विषयसूची. ही सूची जरी नुसती वाचली तरी ग्रंथांत आलेल्या पत्रांचें महत्त्व कळून येऊन पत्रांच्या वाचनाकडे व अभ्यासाकडे लक्ष लागेल.

२

ह्या संग्रहांत आलेल्या पत्रांची पाहणी व तशी मोजणी केली

अशा सामान्यतः असें आढळून येईल कीं, धार्मिक, वतनबाब, राज-कीय इत्यादि पत्रांपेक्षां राज्यकारभारविषयकच पत्रें सर्वांत अधिक आहेत. विषयसूचींत पत्रांत आलेल्या मजकुरांतून जे निरनिराळे पोटविषय आले आहेत ते दिले असले तरी ठोकळ व मुख्य वर्गीकरण पत्रांचें असें–राज्यकारभार विषयक पत्रें १२०, वतनबाब ८२, धार्मिक ७५, राजकीय १८, इतर सामान्य बाबी २५, पेठ बाजार १२ व जहा-गिरींचा उल्लेख असलेलीं पत्रें ९. येथें हेंहि एक ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, कांहीं पत्रें राज्यकारभार व वतनबाब ह्या दोहींकडे घेण्याजोगीं असल्यामुळें वर्गीकृत एकूण पत्रसंख्येंत ५३ पत्रांची वाढ झाली आहे. ह्या मुख्य सात बाबतींपैकीं एकदोन प्रमुख बाबतींतील कांहीं गोष्टींचा विचार करणें येथें उचित होईल. प्रथम राज्यकारभारविषयक पत्र तेंच वतन बाबतींतहि गणन करण्याजोगें कां तेंच उदाहरणानें पाहूं. व ह्यावरून राजसत्ता म्ह० दिवाणसत्ता व वतनी कारभार किंवा देशसत्ता ह्या दोन स्वतंत्र आणि प्रभावी सत्ता त्या कालीं होत्या हेंहि कसें तें लक्ष्यांत येईल. तिसरी एक ज्ञातिसत्ता म्हणजे धर्मसत्ता किंवा ज्ञातिधर्मसत्ता म्हणून स्वतंत्र असे. प्रस्तुत वरील दोन सत्तां-विषयीं पाहूं. व त्यासाठीं आर्थिक व्यवहार करणारे पेठकरी व्यापारी व साव-कार आणि राजसत्ताधारी ह्यांचें उदाहरण घेऊं. अथणी व तेरदळ ह्या दोन शहरांच्या पेठा शिवाजी कालापासून–अदिलशाहीपासून म्हटलेलेंच अधिक सयुक्तिक–चांगल्या भरभराटीस आलेल्या व विख्यात होत्या. पण शिवाजी राजे निवर्तले त्याच्या आदल्या वर्षापासून ह्या पेठांवर मोगली म्हणजे दिल्लीकरांचे हल्ले येऊं लागले प्रथम दिलेलखान इ. १६७९ च्या प्रारंभीं इकडे आला. व त्यानें (श. १६०१ आश्वीन म्ह.) १६७९ च्या ऑक्टोबरांत अथणी लुटली व कांहीं जाळपोळहि केली. त्यावर तेथील व्यापारी दुकानदारांनीं थोडेंसें बांधकाम करून पुनः पेठेची रचणूक केली; तों खैरखानाचा हल्ला आला व त्यानें ती पेठ मारून खराब केली. खान परत जातांच पेठेची वसाहत व लावणी उभा-रणी तेथच्या व्यापारीमंडळींनीं पुनरपि केली तरी पुनः लगेच शहाजाद्याची स्वारी आली व त्यानें घर, मळगी वगैरे जाळून टाकलें. तात्पर्य, अशा प्रकारें लागो-पाठ चार वर्षें अथणी पेठेवर हल्ले झाल्यामुळें तेथील व्यापारी व महाजन अथणी सोडून मुधोळ, तेरदाळ येथें जाऊन गुजराणा करूं लागले व तिकडेच स्थीरस्थावरहि होण्याचा विचार करूं लागले. उघडच अथणीचे गांवकरी व सरकार ह्यांची गैरसोय होऊन उत्पन्न बुडालें व कायमचेंच बुडतें कीं काय असेंहि त्यांस वाटलें. तेव्हां अथणीचे देशक म्हणजे देशमुख, नाडगौर, मोकदम व सरकारी सुभेदार मुधोळास गेले आणि त्यांनीं व्यापारीमंडळींस अभयपत्र देऊन परत अथणीस येण्याबद्दल विनविलें. ह्या वेळीं सुभेदार, देसक, मिरास-

दार आणि व्यापारी ह्यांत जो करार झाला तो मुख्यतः कशांत घ्यावयाचा आहे. व्यापारप्रसंगीं सुपारी, लवंग, कापड, मीठ, तांबूळ, गूळ इत्यादि मालावर गोणीमागें जकात किती किती घ्यावयाची, तसेंच वजनामापावर 'छपाव' करतांना हक्क किती घ्यावयाचा इत्यादि ठरलें; त्याबरोबरच पेठेंत सादिलवार म्हणजे सरकारी अधिकाऱ्यांचें सरबराईसाठीं व दप्तरखर्चासाठीं दुकानदारांकडून कांहींहि घ्यावयाचें नाहीं; इतकेंच नव्हे तर पेठेमध्यें आपापसांत झगडा-भांडण झालें तर त्या बहुतेक सर्व कज्जागती 'देवांतच' म्हणजे पेठेंतील शेटेमहाजन चौधरी, महानाड व इतर व्यापारीमंडळी यांच्या सभेंतच निर्णित होऊन संपावयाच्या, 'त्याची बाजीपुसी दिवाणानी करावयाची नाहीं' हेंहि ठरलें; ह्यांतहि विशेष हें ठरलें कीं, 'गुन्हेगार नफ्गासी सिर मारावें' म्हणजे ठार करावें असें, तशाच प्रसंगाच्या खटल्यांत निवाडा झाला व त्याप्रमाणें सिके झाले; म्हणजे ठार करावें हें निश्चित झालें तरी, 'देवानें सांगून पाठविले तर त्यास दिवाणांनीं सोडून द्यावें.' आणि 'व्यापाऱ्यांनीं खूनखराबी केली तरी ती मात्र कुल माफ असावी' (ले. ८९–९२). ह्या अभयपत्रावरून दोनतीन गोष्टी निदर्शनास येतात, कांहीं मर्यादेपर्यंतचे तंटे केवळ व्यापारीमंडळींनींच मिटवावयाचे; व त्यांत खूनमारामारी होऊन निर्णयांत गुन्हेगाराला ठार करण्याची शिक्षा होण्याचाच संभव, तशा तंटा दिवाणअधिकाऱ्यांच्या उपस्थितींत निकालीं लागावयाचा आणि ती शिक्षा दिवाणाकरवीच दिली जावयाची. तिसरी गोष्ट कीं, देहान्ताची शिक्षा सरकारी म्हणजे दिवाण अधिकाऱ्यांनीं निर्णित करून देण्याचें ठरलें तरी, ह्या केवळ व्यापारीमंडळींच्या सभेनें म्हणजेच 'देवानें' जर तें देहान्तशासन रहित करा असा आदेश सरकारी अधिकाऱ्यांला दिला तर दिवाणांनीं आपला निकाल फिरवून देवाच्या मतानुसार त्या गुन्हेगारास त्या शिक्षेपासून मुक्त केलें पाहिजे; इतका अधिकार व्यापारश्रेष्ठींचा असे. ह्यावरून सरकारी सत्तेइतकीच दुसरी एक स्वतंत्र सत्ता त्या कालीं होती व ती ह्या काळीं पांढरींतील वतनदार मंडळींची होती.

वतनदार म्हणजे 'काळी' आणि 'पांढर' विशेषतः काळीसंबंधींचे म्हणजे शेतीसंबंधींचेच तेवढे कामगार, असें नाहीं. तर केवळ पांढरीमधील म्हणजे बाजार पेठेंतील शेटे महाजन महानाड चौधरी हेहि देशमूख पाटील कुळकर्णी ह्यांच्याइतकेच वंशपरंपरेचे हक्कदार मानकरी व अधिकारी वतनदार होत. अशांपैकीं वरील व्यापारी मंडळीसंबंधाचा संभाजीकालीन सत्ताव्यवहार आहे. गांव-वसाहत किंवा जमीन-लागण ह्या विषयींचीहि अशींच सरकारी पत्रें त्या त्या वतनदारांची मनधरणी केलेली ह्या संग्रहांत आलेलीं आहेत. हीं पत्रें स्वतः संभाजी राजा, त्यांचे सरकारकून म्हणजे अष्टप्रधानांपैकीं प्रधान, सचीव, अमात्य किंवा छंदोगामात्य तसेंच ह्या प्रधानांच्या हाताखालचे सरसुभेदार,

सुभेदार, हवालदार, ठाणेदार ह्या राजसत्ताधिकाऱ्यांचींहि असून तीं देशमूख, देशपांडे, मोकदम, कुलकर्णी, खोत, नाडगौडा, देसाई ह्या वतनदार मंडळींना आहेत. ह्या पत्रांचे प्रत्यक्ष व पूर्ण उतारे येथें उद्धृत न करतां केवळ निर्दिष्ट करतो. गांव-लावणीबद्दल कुलकर्णी यास ४०, ६९, सरनाईकांबद्दल पाटलास ७३; फिरते व्यापाऱ्यांस तेरदाळ रायबाग, हुकेरी ७७; पेठेवर मार्ग पडोन आबादानी करणें ९४, खोत १४५; देशमूख २११, राजापूरकर गनीम म्ह. शिद्दी यानें सोनार, सराफ यांस त्रास दिल्याबद्दल देशमुखास २३९-२४१, देशमुख खोत व मुकद्दम लावणीबद्दल २५६, २६१; इ.इ.इ. एका पत्रांत तर छंदोगामात्य कविकलुषांनी कानदखोऱ्याचे देशमुखास लिहिलें आहे कीं 'याप्रसंगीं अवघे वतनदार एकमतें राहोन गनिमास सजा द्यावी' (१२६); दुसऱ्या एका पत्रांत स्वतः संभाजीनेंच वांईच्या देशमुखाना अनुलक्षून लिहिलें आहे कीं, 'हे दिवसांत गनीम ( म्ह. दिल्लीकर मोगल ) कोंकणांत उतरला आहे. हशमाचा नोवंदणीचा जमाव करून पाठवून देणें. हशमाचा जमावाचें म्ह. पायदळ सेन्याचें बहुत प्रयोजन आहे. जमाव जाला तरी गनिमाचा काय गुमान लागला, कुडविडाच जातो, हें बहुत नाजूक काम आहे. तरी जमाव पाठविणें' (११२-१३). हीं सर्व पत्रें वर म्हटल्याप्रमाणें सरकारी अधिकाऱ्यांनीं देशमूख देशपांडे इत्यादि परगण्याचे व गांवाचे वतनदारांना लिहिलीं असून त्यांत वतनी कामाबद्दल मजकूर आहे. सारांश, अशीं हीं पत्रें राजाचें जें एक काम, गांवांची सुरक्षितता व शांतता राखून भरभराट करणें त्या कामासाठीं व वतनदारांना लिहिलेलीं असल्यामुळें तीं राज्यकारभार व वतनबाब ह्या दोहींचीहि माहिती देणारीं आहेत.

३

राजकीय दृष्टीची ह्या संग्रहांत जीं पत्रें आलीं आहेत त्यांत शिवाजीराजाच्या राजकीय धोरणाचा परिपाक कोणचा तें स्पष्ट करणारीं कांहीं आहेत. श्रीशिवरायांनीं स्वराज्य सोडविलें ह्यांत त्यांचें राजकाज संपूर्ण व्यक्त होत नाहीं. तो त्यांच्या तद्विषयक धोरणाचा पाया आहे; स्वसंस्कृति पालनरूप तें पहिलें हरिकथानिरूपण म्हणतां येईल. पण त्यांचें दुसरें तें राजकारण हें होय कीं, दक्षिण हिंदुस्थानांतील इतर ज्या दोन पातशाह्या, अदिलशाही व कुतुबशाही, त्यांना देशाभिमानी-म्ह० 'दक्षिणी' बनविणें. ज्या खेमसावंत भोसल्यास-सरदेसाई कुडाळ सावंतवाडी यास-औरंगजेबानें 'संभा खोटा व हरामी आहे, त्याच्या किल्या-ताल्लुक्यास घेदावें, (तसेंच) आदलखानी तळ-कोकणांत (आमचे करितां) ठाणीं घालावी ( २७१ ), असें सांगितलें; त्याच खेम सावंताला त्या वेळचा अदिल-

शाही तख्तावर असलेला सिकंदरबादशहा यानें आधींच कळविलें कीं, 'संभाजीशीं ममता राखून मोगल ह्याशी मैत्री न ठेवावी. ( १३३ ); आणि लेखांक १८१ मध्यें तर गोवळकोंड्याचा ( अबुल हसन ) कुतुबशहा अदिलशहाच्या पत्रांत संभाजीराजांचा 'महाराज छत्रपती संभाजी राजे पातशहा' असा उल्लेख करून 'हमारी पातशाही वा.दख्खणकी पातशाही जुदी नाही' हें लिहीत आहे. ह्यांचा अर्थ, दक्षिणेंतील तीनही राज्यें उत्तर हिंदुस्थानांतील औरंगजेबी म्ह. मोगली सत्तेशी झगडण्यास एकोप्यानें तयार आहेत. त्यासाठीं त्यांचा वेगळा असलेला धर्म आड आला नाहीं. तात्पर्य, ही जी 'दक्षिणी' किंवा 'हिंदवी' वृत्ती ह्या दोन शाह्यांच्या गळीं उतरविली, तें शिवरायाचें 'दुसरें तें राजकारण' होय. व त्याची परिपक्वता संग्रहांतील पत्रांत दिसून येत आहे. औरंगजेबाचे रेट्यापुढें आणि आमच्यांतील कांहीं वैगुण्यामुळें विशेषतः आमच्या परधार्जिण्या वृत्तीमुळें ह्या वेळचा परिणाम विपरीत झाला हा भाग वेगळा. पण राजकारण, राजकारण म्हणजे-ज्यांत, स्वदेशांत राहणाऱ्या अन्य धर्मीयांना, त्या देशच्या धर्मीयांशी सलोख्यानें वागावयास व त्यांच्या धर्मास आपल्या धर्माइतकाच मान देण्यास लावून, देशशत्रूच्या विध्वंसनार्थ देशनिष्ठेच्या बळावर आपल्याबरोबर संग्रामार्थ उभे करणें हा विचार आणि आचार असतो तें. ह्या राजकारणी वृत्तीची जाणीव इ. १५६५ नंतर चांगल्या प्रकारें होऊन ती वाढीला लागली आणि श्रीशिवरायाच्या स्वराज्य-स्थापनेनें त्याला मूळ धरलें व दक्षिणीपक्षरूपानें-हें नाव पूर्वीचेंच आहे--ती दृश्यमान व वर्धमान झाली. हीच वृत्ती शिवोत्तर कालांत 'दक्षिणी'पक्ष व 'परदेशी' किंवा 'पठाणी' पक्ष ह्याच्या जागीं वाढत्या कार्यक्षेत्रानुसार 'हिंदी' व 'तुराणी'पक्ष ह्या नामांतरानें चालू राहिली. इ. स. १७५१ मधील प्रसिद्ध प्रसंग व त्यापुढेंहि दोन तीन दशकपर्यंतच्या हालचाली हा त्याचाच भाग आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो. हा किंवा त्यापुढील वर्तमानकालीन एतद्विषयक विचार येथें कर्तव्य नाहीं. पण प्रस्तुतच्या ह्या संभाजीकालीन पत्रसारसंग्रहापुरतें पाहतां एवढें सांगितल्यास चालेल कीं, त्या वृत्तीचें दिग्दर्शन शिवकालीन पत्रसारसंग्रहांतील पत्रांतून जितक्या ठिकाणीं आलें आहे त्यापेक्षां थोड्या अधिक प्रमाणांत प्रस्तुतच्या ह्या छोट्या ग्रंथांतील मराठी पत्रांमधून होत आहे. येथें असा दुसरा विचार लक्षांत येईल कीं, समान संकट येणें हीहि गोष्ट हे विचार उद्भवण्याच्या मुळाशीं असल्यामुळें केवळ राजकारणी जागृत दृष्टीचा तो भाग मानणें अवश्यकच आहे असें नाहीं. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, शिवाजी राजे विद्यमान व राज्यपदारूढ असतांना केवल अदिलशाहीवर असेंच संकट आलें होतें व तेव्हां शिवराज्यावर तसें आलें नव्हतें. अशाहि वेळीं अदिलशाही दक्षिणी पक्षाच्या वजीर व मुत्सद्दी मंडळींनी शिवाजीस साहाय्यास बोलाविलें व

शिवाजीनेंहि आपणास नसलें तरी ज्या आपल्या 'दक्षिणीपक्षांतील' एका राज्यास बुडविकें चात आहे त्यास, त्या 'परदेशी' किंवा 'पठाणी' पक्षीयांकडून आलेल्या संकटांतून वांचविणें हें दक्षिणीपक्ष–प्रमुख असलेल्या आपलें काम आहे, हा विचाराचा भाग ध्यानांत आणिला व साहाय्य दिलें. औरंगजेबाच्या मनांत शिवाजीचें स्वतंत्र राज्य तें हिंदूंचें म्हणून तर बुडवावयाचेंच होतें; पण विजापूर व गोवळकोंडा येथील सुलतान जरी शियापंथी होते म्हणजे औरंगजेब ज्या सुनीपंथाचा अभिमानी होता त्या पंथाचे हे दोन्ही सुलतान जरी नव्हते तरी मुसलमानच होते; तरीहि त्यांना बुडवावयाचे, असें औरंगजेबाच्या मनानें कां घेतलें ! औरंगजेबाच्या सैन्यांत व कारभारांत मोठमोठ्या कामावर शिया-पंथी मुसलमान होतेच. मग हेच शिया सुलतान त्यास हिंदू इतकेच द्वेष्टे व बुडविण्यायासच योग्य असें कां वाटले ! तर त्याचें कारण ते दोन्ही 'शहा' ह्या दक्षिणीपक्षांतील होते हें होय. औरंगजेबास आपणाला 'परदेशी' वा 'पठाणी' म्हणणारा हा 'दक्षिणी' पक्ष नष्ट करावयाचा होता.

औरंगजेब एकादें धोरण व त्याचे दूरगामी परिणाम जाणणारा होता. त्याच्या पदरचा शेखउल इस्लाम हा विद्वान् मनुष्य त्यांस हीं राज्यें बुडविणें इष्ट नाहीं हें सांगत होता. इतकेंच नव्हे तर जर हें आपलें म्हणणें ऐकलें नाहीं तर तुमचेजवळ मला राहणेंहि नकोसें होईल; इतक्या आग्रहानें तो तें पात-शहास सांगत होता. शेवटीं हा पंडित त्यास सोडून गेलाहि; तरी औरंगजेबानें त्याचें वा अन्य कोणाचेंहि ऐकलें नाहीं, आपलेंच मनानें ही सर्व मोहीम चालविली. बरें, औरंगजेबानें आपल्या हिंदु–द्वेषास कोठें कोठें मुरड घालून हिंदु साधु, मठ, एखादें देवालय ह्यास इनामहि दिल्याचें व तें चालविल्याचें आढळेल. म्हणजे नको असलेले शियापंथी व हिंदु ह्याविषयींची त्याची करडी नजर जेव्हां ते धर्मप्रेमापेक्षां विशिष्ट भागापुरते पण देशप्रेमभरानें म्हणजे राजकीय दृष्टीनें एकत्र होऊन नांदत आहेत तेव्हां चटकन् तिकडे वळते व मूळचा द्वेषाग्नि अधिक तीव्र व प्रज्वलित होतो. सारांश, उत्तरेकडील दिल्लीकर मोगलपादशहास 'दाक्षिणात्यांची ज्यांत हिंदुबलिष्ठ व सत्ताधीश आहेत अशी हिंदुमुसलमानांची जूट' नको होती. ह्या जुटीचें लक्षणात कोण कोणास गनीम म्हणतो व दक्षिणचें तख्त म्हणून कोण कोणचें सांगतो तेंहि लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. तसेंच औरंगजेबाचा चौथा मुलगा अकबर हा संभाजीकडे दुर्गादास राठोड ह्या मारवाडच्या दिवाणासह आला होता. अर्थात् वर जो 'दक्षिणीपक्ष' म्हणून म्हटलें त्या पक्षाच्या धोरणाच्या दृष्टीनें त्या उभयतांचें आगमन ही फारच उत्तम व सहाय्यक गोष्ट होती. पण त्यामुळें औरंगजेबाच्या द्वेषाग्नीस अधिकच इंधन मिळालें व त्या प्रमाणांत त्याच्या हालचाली चौफेर, घोडदौडीनें व आंगमेहनतीनें चालल्या. येथें मात्र एक गोष्ट स्पष्टपणें सांगणें भाग आहे

कीं त्या दोषांसंबंधीचें उल्लेख फक्त शकावलींत काय तें आले आहेत; मराठी पत्रांत त्यांचा निर्देश असलेलें पत्र एकच अर्धेमुर्धें प्रस्तुत उपलब्ध आहे. इतरहि राजकीय वृत्तान्तासंबंधानें हीच स्थिति आहे. तात्पर्य, संशोधन व अभ्यास अद्यापि व्हावयास पाहिजे.

राजकीय परिस्थितीचा विचार चालू असतां इंग्रजांनीं ह्या वेळीं कोणचें धोरण स्वीकारलें होतें तेंहि पाहिलें पाहिजे. ह्यासंबंधींचें एक पत्र ह्या संग्रहांत ले. २४३ हें आलें आहे व त्याचा विचार झालेला दिसत नाहीं. औरंगजेब दक्षिणेंत उतरतांच त्यानें संभाजी, अदिलशहा ह्यांचे विरुद्ध देशमुखादिकांना जशी उठावणी दिली व त्याप्रमाणें त्याच्या गळाला कांहीं देसाई लागलेहि; त्याचप्रमाणें इकडील ज्या तीन आरमारी सत्ता त्यांसहि चालना मिळाली. ह्यांतील दोन सत्ता प्रत्यक्ष चालू होत्या. एक पूर्ण स्वतंत्र ती पोर्तुगीज, दुसरी सत्ता मांडलिकी स्वतंत्र ती सिद्दी, आणि तिसरी, हे असे दोन परके तसे ही तिसरीहि परकीच मुख्यतः सिद्दीची मदतनीस म्हणून ती इंग्रज. ह्यांतील जंजिरेकर सिद्दी हा तर मोंगलांचा हस्तकच बनून संभाजीच्या मुलुखावर वारंवार स्वाऱ्या लुटालुटी करूं लागला, व त्याला सहाय्य पोर्तुगीजांचें मिळे. म्हणून संभाजीनें पोर्तु०वर स्वारी करून यश मिळविलें. सिद्दीला पोर्तुगीजांप्रमाणें उघड नसलें तरी इंग्रज कंपनीचेंहि सहाय्य मिळत असे व म्हणून इंग्रजाकडे संभाजीचा वकील जाऊन उभयतांमध्यें तहाच्या वाटाघाटी झाल्या. इंग्रज व संभाजी ह्यांमधील संबंध सांगणारा एक लेख सर जदुनाथ सरकार यांनीं मंडळाच्या नवम संमेलनांत वाचलेला त्रै. व. २ पृ. १० ते ४४ वर छापला आहे. त्यांत इ. १६८४ सालची माहिती आली आहे. ह्या संग्रहालयांतील पत्र इ. स. १६८७ मधील आहे. ह्या पत्रांत जनरल इंग्रज संभाजीस लिहितो कीं, "तुमच्या प्रधानांचे–निळो मोरेश्वर–पत्र येतें कीं, 'हबसी गनीम खाडींतून येऊन आमचा मुलूक मारतो. अशांत तुमची आमची जुनी दोस्ती असतां दर्यामधे खाडी राखली जात नाहीं. तरी खाडी राखावी व गनीम पैस होऊं न द्यावा.' ह्या पत्राबरोबर आणखी बोलणें करण्या करितां त्रिंबक गोपाल हा वकीलहि तुमचा आला व तह झाला. तह असा कीं, संभाजीनें इंग्रजास ५० ह. रु. रोख आणि २ ह. मुडे भात देऊन दर्यांत खाडी राखावी, आम्ही (संभाजीनें) खुशकीवरील मजबुदी करून खुशकी राखोन. ह्याप्रमाणें तह झाला व आम्ही कबूल केलें त्याप्रमाणें बोटी, जहाजें, गलबतें पाठवून आम्ही खाडी बंद केली, अशी कीं, गनीम इकडे येईना, नव्हे पाहीनाहि. असें असतां छत्रपतीचे लोकांनी खुशकी राखावी ते मोकलीच टाकली व ह्यास तीन महिने झाले. बरे, खर्चास देऊं केले तेहि पोहचविले नाहीं. २ ह. मुडे भात यावयाचे तेथें शंभरच मुडे भात आले, बरकड कांहीं पोहचत नाहीं. तशांत इंग्रज

लोकांचा खर्च बेमबलग. लोकांचे मुशाहिराखेरीज २० ह. असर्फी खर्च झाला. आतां पुढें आणखी किती म्हणून करावा. १५ रोजांत हानीचा जाब आला तरी खूब. नाहीं तरी आम्ही आपले आरमार परत बोलावून आणून.' ह्यावर छत्रपती म्हणतील किं, पैकियावर नजर देता. तरी तैसे नाहीं. छत्रपतीच्या लोकांस काम फार पडलें आणि बोलाचा भरंवसा नाहीं. अशांतहि दोस्तीवर नजर देऊन अजीजग कामाची शर्तो केली." ह्या जनरलच्या पत्रावरून संभाजीकडील स्थिती कळून येते. विजापूर गोवळकोंडा येथील राज्यें घेतल्यावर औरंगजेबपातशहाचें सैन्य केवळ संभाजीचा समाचार घेण्यास मोकळें झालें. यामुळें ह्या वेळीं संभाजीच्या लोकांस काम फार हें इंग्रजांचें लिहिणें संयुक्तिक दिसतें व ह्यामुळेंच 'बोलाचा भरंवसा नाहीं.' हा टपका संभाजीस ऐकून घ्यावा लागला. सारांश, इंग्रज हे प्रथम सिद्दीचे मदतनीस नंतर धोरण म्हणून संभाजीशीहि संधान राखून असणारे असे होते.

४

संग्रहांत आलेल्या ज्या पत्रांचा व त्यावरून ज्या मुद्याचा विचार संकलनात्मक ग्रंथांत आलेला नाहीं त्या राजकीय गोष्टींचा थोडक्यांत विचार केल्यानंतर आतां थोडेंसें राज्यकारभार व वतनकारभार ह्याविषयीं लिहिणें इष्ट होईल. ह्या संग्रहांत राजकीय, राज्यकारभार, धार्मिक इत्यादि ठोकळ विषयवार पत्रें किती तें वर दिलेंच आहे. त्याप्रमाणेंच स्वतः संभाजी राजे यांचे नांवें लिहिलेलीं किती, अष्टप्रधानापैकीं प्रधान, सचीव, अमात्य, पंडितराव, सेनापती यांनीं पाठविलेलीं किती, तसेंच कविकलश व सुभेदार व सर सुभेदार, ह्यांची किती, त्यांतहि अदिलशाही वा मोगल अंमलदारांची किती तें पाहिलें असतां हा विचार करणें सुलभ व रीतीचें होईल. ह्या संग्रहांत संभाजी छत्र० ४१, प्रधान २?, कविकलश ७, अमात्य १, सचीव ४, न्यायाधीश व पंडितराव १ व १०, सुभेदार ३०, सर सुभेदार ४, मुजुमदार, देशरक्षक हा नवाच अधिकारी आढळतो, ह्यांची एकेक, हवालदार ५, ठाणेदार ६, दिवाण ४, ह्याप्रमाणें सरकारी पत्रें आलेलीं आहेत. दिल्लीकर मोगलाकडील पत्रें ३६ असून अदिलशहाचीं ८ व त्याचे दिवाण सर्जाखान, सुभेदार, अबुलमुजफर इत्यादींची १६, कुतबशहाचें १ आहे. ह्याशिवाय घोरपडे, निंबालकर, घाटगे, मोहिते, शिरके, मांगरे, शिंदे, माहाडीक ह्या सरदारांचीं पत्रें असून, इतर नागरिक जे गिजरे, चाफळकर, कवींद्र, मावळंगकर, भाष्य, इतर मठपती, श्रीधंकराचार्य आणि वतनदारापैकीं पाटील, परीट, चौगुला, सेटीकार, देशमूख, देशकुलकर्णी, धर्माधिकारी, अधिकारी इत्यादींचीहि पत्रें ह्या संग्रहांत आलीं आहेत. ह्या पत्रसंख्येबरोबर त्या त्या पत्रांचे क्रमांक येथें व मागील

राजकीय वगैरे विषयाची जी पत्रगणना दिली तेथेंहि दिले असते तर तें अव-श्यक होतें. पण स्थलाभावी तसें करणें अशक्य. ह्यांपैकीं राजसत्तावाल्यांनीं त्या ठिकाणच्या वतनदार, मठपती, उपाध्ये वा इतर नागरिक मंडळींना पत्रें पाठ-विलीं आहेत त्यांतील तपशील लक्षांत घेतां दोन गोष्टी कळून येतात. एक कोणत्या प्रांतावर त्यांचा कसा व कां अधिकार आहे वा सुरू झाला आणि राज्यांतील सामान्यतः एकंदर ठिकाणांपैकीं कोणत्या ठिकाणचे कागद अद्याप मिळावयाचे आहेत. उदाहरणार्थ, कळुशाचे कागद फोंडा, कुडाळ, कानदखोरें, पुणें, देवरूख, शिराळे ह्या प्रांतावर असून त्यांपैकीं कुडाळ परगण्याच्या मानसी गोपाळ ह्या सुभेदारास, तेथील चिटणिसी पितांबर शेणवीच्या जागीं आलेल्या जिवाजीराम ह्याकडे चालविण्याबद्दल जें पत्र श. १६०६ (इ.१६८४) मध्यें दिलेलें आलें आहे त्या पत्रांत 'हली साहेबास मुलूक अर्जानी जाला' हें वाक्य आहे व तें अतिशय उद्‌बोधक आहे. संभाजीच्या कारकीर्दीच्या प्रारंभापासून कुडाळ प्रांतावर छत्रपतींची सत्ता चालत आहे. स्वतः संभाजीनेंच त्या प्रांतावरील गणोराम देशाधिकाऱ्याला पाटगांवच्या मौनी साधूंस पाल-खीच्या भोईसाठीं व वाजंत्र्यासाठीं १०० व २५ निशाणी होन द्यावे असें पत्र पाठविलें आहे. ले. ६ पहा. श. १६०३ मध्येंहि मोरेश्वर पंडितरायाचें पत्र त्याच गणोराम ह्या अधिकाऱ्यास लिहिलेलें प्रसिद्ध आहे ले. ५०. श. १६०५ श्रावणापर्यंत ( १६८३ जुलै ) छत्रपतींचीच सत्ता त्या परगण्यावर आहे. पण पुढें १६०५ च्या पौषांत शाहाअलम ह्यानें कुडाळ व बांदे ह्यावर स्वारी केली आणि हे दोन्ही गांव जाळून टाकले ( शकावली १६०५ पौष व. ५ पहा पृ. ११५). त्यानंतर त्या भागावर अदिलशाही सत्ता सुरू झाली (श.१६०५ माघ ले. ११५ ). पण मार्गीची सत्ता छत्रपतींची असल्यामुळें व छत्रपती संभाजी व अदिलशहा ह्यांत तह असल्यामुळें हा परगणा पुनः छत्रपतीकडे १६०६ च्या वैशाखांत आला आणि म्हणून कविकलशाच्या पत्रांत 'हली साहेबास हा मुलूख अर्जानी जाला.' म्ह. संभाजीराजांच्या ताब्यांत हा परगणा आला असें जें वाक्य आलें आलें तें सुसंगत व यथार्थ आहे. नुसत्या कुडाळ परगण्याचे देसाई व सरदेसाई आणि त्यांचे अदिलशाहीशी व औरंगजेबाकडे म्हणजे मोगलाईशी कसे संबंध आले व हर्षामर्षाचे प्रसंग घडले हें पाहणेंहि महत्त्वाचें आहे कारण, श. १६१० च्या माघ महिन्यांत तेथील मूळचे देसाई जे नारायण प्रभु त्याचे पत्रांत 'त्यावरी मुलूख पातशाही तरुफातीस आला' असें वाक्य आलें आहे. त्याचप्रमाणें लक्ष्मेश्वर परगण्याचा खानगौडा देसाई हा संभाजीलाहि सहाय्य करून इनाम मिळवितो आणि अलमगीर औरंगजेब यांसही मदत देऊन इनाम गांवें व जमीन मिळवितो; ह्यांतील मतलब व तफावत काय. तर बाद-शहाकडून त्यास सर नाडगौडकी मिळाली. देसाई व देशमूख हे एकाच

अर्थाचे वाचक दोन शब्द असले तरी कानडी भाषेप्रमाणें नाड–गौडा म्हणजे देशाचा पाटील म्हणजे देसाई किंवा देशमूख हाच अर्थ होत असला तरी नाडगौडा व देसाई ह्यांच्या अधिकारांत फरक आहे. देसाई हा नुसत्या प्रांताला अनुलक्षून असलेला अधिकारी आणि नाडगौडा हा किल्ला ज्यांत प्रमुख आहे त्या प्रांताचा अधिकारी आहे.नाडगौडाचा अधिकार प्रांतांतील किल्ल्यावरहि आहे तशी गोष्ट देसायांची नाही. अशा नाडगौडकी अधिकारावरीलहि अधिकार तो सरनाडगौडकीचा.त्या मानासाठीं खानगौड हा औरंगजेबाकडे गेला. असो. अशाप्रमाणें ह्या सारसंग्रहांतील पत्रांचा व शकावलीचा विचार होणें अवश्य आहे. विस्तारभयास्तव हा विचार आवरता घेऊन राज्यकारभार पद्धतिबद्दल दोन गोष्टी लिहितो.

सुभेदार, हवालदार, देसाई, पारपत्यगार, देशाधिकारी इत्यादिकांस पत्र लिहितांना 'व कारकून' किंवा 'व देशलेखक' अशी जोड दिलेली असते. सुभेदार म्हणजे देशाधिकारी, ह्याचें प्रत्यक्ष नांव दिलेलें असून त्याच्या जोडीस कारकून असें नुसतेंच कारकुनाचें नांव न देतां म्हटलेलें असतें. 'सुभेदार व कारकून' वा 'देशाधिकारी व देशलेखक' ह्या लिहिण्यांत सुभेदार व देशाधिकारी हाच मुख्य व त्यासच पत्र लिहिलेलें असतें. पण मग ज्याचा स्पष्ट नामनिर्देश नाहीं, मुख्याचें पोटांत त्याचे हाताखालचे येतातच, जो दुय्यमहि आहे, त्याचा मोघम उल्लेख तरी कशाला ! ह्या उल्लेखाचीं दोन कारणें वाटतात. एक कारण हें कीं, परकीय वरिष्ठ सत्तेचा तो एक अपरिहार्य परिणाम आहे. हा सुभेदार मुलकी व्यवस्थेसाठीं व त्या सरकारी दप्तराचा मुख्य अंमलदार असला तरी तो थोडासा फौजी अंमलदार आहे. परकी अंमल ह्या जोरावरच नांदावयाचा. मुसलमानी अंमलांत प्रारंभीं हे सुभेदार मुसलमान असणार व त्या एकट्या असल्या अधिकाऱ्याकडून प्रांताचा सर्व कारभार व दप्तर कसें सांभाळलें जाणार; म्हणून कामासाठीं अवश्य पण अधिकाराच्या दृष्टीनें दुय्यम अशी स्थानिक व्यक्ति हाताशीं घेणें प्राप्त. तो हा लेखन–प्रधान 'कारकून'. दुसरें कारण हें कीं, हा कारकून जरी स्थानीक दृष्टीनें आपल्या सुभेदाराकाच जबाबदार तरी त्याची नेमणूक फडणिसी खात्याच्या प्रमुखाच्या मंजुरीनें व्हाव-याची. सुभेदाराच्या वरचा अधिकारी 'सरसुभेदार' व त्याचा देशी प्रतिशब्द 'मुख्यदेशाधिकारी' असा आहे. ह्या सुभेदाराच्या जोडीलाहि 'कारकून' एवढेंच मोघम लिहिलेलें असतें. कारकूनाचे सरकारकून नाहीं किंवा देशलेखकाचे मुख्य देशलेखकहि नाहीं. ही 'सरसुभेदारी' सूचित करतांना 'महालानिहाय' म्ह. अनेक परगणे असें लिहिलेलें असतें. नागोजी नल्लाळ मुख्यदेशाधिकारी पर-गणेमहालानिहाय' ( ले. २२, ३४, ४५, १०० ). अशा वेळीं सर्वच ठिकाणीं अधिक महाल म्हणजे परगणे कोणकोणते व ते किती हें सांगितलेलें असतें

असें नाहीं. पुष्कळ ठिकाणीं सुभेदार हाच शब्द लिहून 'महालानिहाय' हें लिहिलेलें असतें. व त्या शब्दावरून तो 'सरसुभेदार' आहे असें समजावयाचें. अजिरें, चेऊल, कोपळ ह्या प्रांतावरील सरसुभेदारांचा उल्लेख 'महालानिहाय' ह्या शब्दावरूनच केला आहे असें समजावयाचें. सर सुभेदार असें प्रत्यक्ष सांगितलेलें नाहीं. कांहीं उल्लेखावरून एकाच प्रांतावर सुभेदाराप्रमाणें सर–सुभेदार हाहि अंमलदार आहे कीं काय हें अधिक उदाहरणावरून पाहिलें पाहिजे. येथें फक्त सं. का. प. सा. सं. तक्त्या पुरताच हा विचार केला आहे.

५

'संभाजी महाराजांचें चरित्र' म्हणून मल्हारराव चिटणीस यांनीं एक बखर लिहिलेली प्रसिद्ध आहे. तींत संभाजीविषयक ६, राजारामासंबंधानें व समर्थ रामदासविषयक एकेक आणि औरंगजेबाबद्दल २ असे एकूण १० शककाल देऊन प्रसंग सांगितले आहेत. त्यांपैकीं ६ कालोल्लेख राजवाडे खं. १५ ले. ३०१ मधील टिपणांत आले आहेत. हें टिपण मल्हारराव चिटणिसांच्या बखरलेखनाच्या साधनसाहित्यांतील दिसतें. चिटणीसांनीं आपली ही बखर खंडोबलाल व गोविंद खंडेराव ह्यांनीं केलेल्या टिपणाचिठ्यांच्या आधारानें लिहिलेली असावी. ह्या चिटणीस चरित्राचें हें टिपण आधारभूत असण्यासाठी वाटतें कीं, जे कालोल्लेख दोन्ही ठिकाणीं आहेत ते जवळजवळ सारखेच आहेत. औरंगजेब भागानगर व विजापूर घेतो, संभाजी मृत्यु, राजाराम मंचकारोहण ह्या चाऱ्ही प्रसंगांच्या कालाचा बखरींत व लेखांत सारखाच उल्लेख आहे. पहिल्या दोन्ही प्रसंगींचे काल दोन्ही ठिकाणीं चुकीचेच सांगितले आहेत. पण त्या चुकींतहि दोषांचें ऐक्य आहे. भागानगर श. १६०५ मध्यें व विजापूर श. १६११ शुक्ल संवत्सरी घेतले असें दोन्ही स्थलीं नुसता शकांक व शकांकाबरोबर संवत्सराचें नांव देऊन सांगितलें आहे. वस्तुतः श. १६०७ क्या कार्तिकांत ( १६८५ आक्टो. १९ ) कुतुबशाही नष्ट केली आणि विजापूरचें राज्य श. १६०८ आश्विन शु. ६ म्ह. १६८६ सप्टें. १२ ला औरंगजेबाचें आधीन झालें, म्हणजे बखरींत व टिपणांत अनुक्रमें दोन व तीन वर्षांची आधीं व नंतर अशी चूक झाली आहे. तिसऱ्या प्रसंगाचें वर्ष व संवत्सरनांव दोहींकडे (श. १६११ विभव) सारखेंच आलें असून चवथ्या प्रसंगाचा शक महिना पक्षतिथी ( श. १६०२ वैशाख व. ३ ) असा काल दिला आहे. तोहि दोहींकडे तसाच आहे. ह्या काल-निर्देशांत जेथे शकावलींतल्याप्रमाणें ( शि. च. प्र. ) वद्यच्या जागीं शुद्ध एवढा बदल पाहिजे. बाकी वध हाहिपक्ष त्याच पुस्तकांत पृ. ५३ वर दिला आहे.

शाहूचा जन्मशक टिपणांत १६०२ एवढाच दिला आहे आणि बखरींत रौद्रसंवत्सर मार्ग शु. १० असा थोडासा पुरता दिला आहे. व हाच शि. च. प्र. त त्याच पृष्ठावर सांगितला आहे. परंतु हा शाहूच्या जन्माचा शक वगैरे सर्व काल बरोबर नाहीं. श. १६०४ वैशाख वद्य ७ गुरुवार हाच शाहूचा जन्म दिन बरोबर आहे. बखरींत संभाजीचा राज्याभिषेक श. १६०२ माघ शु. १० गुरुवारीं झाला असें म्हटलें आहे. टिपणांत वार दिला नाहीं आणि संवत्सराचें नांव दुर्मती हें पुढलें दिलें आहे, तें चूक आहे. पण बखरींतील हा सिंहासनारोहणाचा दिवस तीन दिवसांनीं पुढला सांगितला आहे. जेधे शकावलींत माघ शु. ७–१६८१ जाने. १६ ही मिती दिली आहे. सिंहासनारोहणाचा हा विधी तीन दिवस चालला असावा. विनायक शांति, पुरंदरशांति, होम, हवन, तुलादान इत्यादि धार्मिक कर्मे ह्या राज्याभिषेकांगभूत झालीं व व त्यामुळें लागलेले तीन दिवस सप्तमी ते दशमी असे धरले गेले असावे, असें म्हणतां येईल. ह्याप्रमाणें चिटणीसांची चरित्ररूप बखर व रा. खं. १५ मधील टिपणयादी ह्या दोन्ही ठिकाणीं संभाजी चरित्रांतील म्हणून जे कालयुक्त प्रसंग आले त्यांचा विचार केल्यानंतर केवळ बखरींत जे आणखी चार कालनिर्दिष्ट प्रसंग आले आहेत त्यांचा विचार करूं.

संभाजीराजे शिवाजीराजे मृत्यु पावले तेव्हां पन्हाळागडावर होते. पन्हाळ्याहून ते रायगडीं केव्हां आले ह्याविषयीं बखरीमध्यें पृ. ५ वर 'आषाढ शुद्ध द्वितियेस किल्ल्यावर येऊन याप्रमाणें बंदोबस्त केला', असें वाक्य आलें आहे. हीच मिती शिवचरित्रप्रदीपांत पृ. ३० व ५३ वरील दोन्ही शकावलींत आली आहे. पन्हाळ्याहून रायगडास जातांना संभाजीची मनस्थिति–आपल्याविरुद्ध अष्टप्रधानांपैकीं प्रधानच आहेत आणि त्यांचा विचार आपल्याला छत्रपतीची गादी मिळूं न देण्याचा आहे. अर्थात् झगडा करावा लागणार. एकंदरींत, आपल्यावरील कारुराची व त्याबरोबर जबाबदारीची जाणीव उत्पन्न होऊन तो संतप्त तर झालाच पण धर्मप्रवणहि झाला आणि ह्या वेळीं संतमहंत साधु अशांचा आपल्याला आशीर्वाद असावा व त्यायोगेंहि धीर मिळावा–असें वाटणारी झाली होती. व असें होणें सहज आहे. आणि ह्यासाठीं पन्हाळासोडल्यानंतर रायगडास जातांना वाटेंत संभाजीनें कांहींचीं दर्शनें घेतलीं असावी, कांहीं व्रतस्थ व अनुष्ठानी मंडळींच्या गांठीहि घेतल्या. व त्याचें एक उदाहरण, श. १६०२ ज्येष्ठ वद्य १, २ म्ह. १६८० जून ३ ह्या दिवशीची अग्रहार पुनः चालू केयाची जी सनद छे. २ ही छापली आहे, त्यांत मिळतें. संभाजी आषाढ शु. २ स रायगडीं पोचला व ही सनद त्यापूर्वी पंधरा दिवसांची आहे. त्यांत स्पष्ट म्हटलें आहे की, 'पन्हाळीहून रायगडावर जातांना रा. स्वामी रा. गोसावी म्हणजे मल्हार गोसावी सदाममी ह्यास भेटले, संभा-

पण प्रसंग झाला. बहुत प्रामाणिक ईश्वरभक्त पाहून बंद केलेला अग्रहारगांव चालवावा ऐसा हायर्थ करून तो दिला.' पुढेंहि म्हणजे रायगडचा बंदोबस्त झाल्यावर नागपंचमीस मंचकारोहणविधि उरकल्यानंतर व राज्याभिषेक होण्याच्या आधीं मुद्दाम संभाजी असेंच कांहींच्या दर्शनास गेला व तेथें आठवडाभर राहून परत आला असेंहि बखरींत सांगितलें आहे. व त्याचा काल कार्तीक मासीं एवढाच दिला आहे. ह्या मंचकारोहणाची मितिहि जेधे शकावलीशी अगदीं जुळती आहे. बखरींतील दहावा कालयुक्त प्रसंग समर्थ रामदास स्वामी ह्यांचा निर्याणदिन हा बरोबर सांगितला आहे. सारांश, बखरींत आलेल्या दहा कालनिर्दिष्ट प्रसंगांपैकी चुकीचे ३, बरोबर ४, सामान्यतः बरोबर २ व एक नवीन असे आहेत. बखर लिहितांना जीं टिपणें मल्हार-रावांनीं जमविली होतीं त्यांतील एक रा. खं. १५ ले. ३०१ हें असून तसेंच दुसरें शि. च. प्रदीप पृ ५३ वर आलेलें टिपणहि असावें. असो.

ह्या बखरीची एवढी चिकित्सा अशासाठीं केली कीं, हीच एक बखर संभाजी राजे ह्यांची त्यातल्या त्यांत संमत अशी आहे. महाराष्ट्र साम्राज्याच्या बखरींत पृ. ४९ ते ६३ पानांवर संभाजीविषयक मजकूर आहे; तसेंच शेड-गांवकर बखरींतहि संभाजीची माहिती आली आहे. पण ह्या सर्वांत महाराष्ट्राचे आधुनिक सौमी जे मल्हारराव चिटणीस ह्यांचीच बखर अभ्यासिण्याजोगी आहे. मल्हार रामरावांनीं लगेच राजराम छत्रपतीचेंहि चरित्र असेंच लिहिलें व तें संभाजी चरित्रापेक्षां अधिक विस्तृत, आपुलकीनें व अधिक आदर उत्पन्न करणारें असें चित्रित केलें आहे. ह्या संभाजीच्या चिटणिस लिखित चरित्रांत वर जो दक्षिणीपक्ष व त्यांचें राजकारण ह्याची चर्चा केली व त्याचीच वाढ औरंगजेब पुत्र अकबर व त्याचा सहाय्यक दुर्गादास राठोड ह्यांच्या येऊन मिळण्यानें झाली, असें जें लिहिलें त्याचा निसुटता उल्लेख, आपण सर्व मिळून सारी फौज गोळा करून पातशाहावरी जावें, इत्यादि सांगत असतां 'थोरली मसलत' ह्या शब्दानीं चिटणिसांनीं केला आहे. रघुनाथपंत हणमंते हा जरा खालीं दक्षिणेंत राहणारा, संभाजीच्या जवळच्या लोकांपासून दूरस्थ व त्यामुळें वयस्काच्या भूमिकेवरून बोलणारा, ह्याच्याच सांगण्यावरून जगदेव किल्ला बाळाजी कृष्ण ह्या दुर्गाधिकाऱ्यानें मुसलमानी फौजेशीं लढून आपल्या हस्त-गत केला. हा किल्ला कर्नाटक प्रांताच्या पूर्वेस नंदीनामक पर्वतावर मोठ्या मान्याच्या जागीं अगदीं नाक्यावर मजबूत असा बांधविला होता. त्या रघुनाथ पंडितामार्फत अदिलशाही व कुतबशाही त्यांचेंहि राजकारण संभाजीकडे आलें होतें, पण हें राजकारण, ही थोरली मसलत संभाजीस पेलली नाहीं, हें खरें. तरी मधून मधून 'मोगल गनिमाचा तो

'गुमान काय, कापूनच काढतो,' 'दो दिवसाचे मोगल,' मुसलमानांचा हात घेतला तरच आलेस्य। सुलतानी संकटांतून मी वाचेन वा वाचावें असें मला वाटत नाहीं, इत्यादि संभाजी झटकपावरची उद्‌गार काढतो, तरी आलेल्या संकटाच्या मानानें जी एक तेवढीच मोठी मसलत उभारून त्या संकटास तोंड देणें हें संभाजीच्या हातून घडलें नाहीं. व 'एकेकाचीं घरें बुडवीत सर्वांचाच नाश हा पातशहा करील' असें जें म्हटलें आहे तेंच घडून आलें, आणि हा दक्षिणी पक्ष औरंगजेबाच्या अपेक्षेप्रमाणें ह्या वेळीं नष्ट झाला. तात्पर्य, हिंदु-मुसलमानांच्या एकीच्या आड परदेशी मग ते मुसलमान असोत वा अन्य कोणी हिंदुस्थानबाह्य असोत, कसे येतात; तसेंच, पूर्ण स्वावलंबी आणि आप स्याच ठिकाणीं सर्वांगानें दृढ व दूरावेशी राजकारणी दृष्टीनें परिपूर्ण नसण्यानें अभ्युदय जो तो कसा खंडित होऊन आपण खोट्या परमार्थ साधनाकडे किंवा नेभळेपणाच्या पोटीं उद्‌भवलेल्या तकलुपी सोबत्याकडे अथवा स्थापक-तेकडे कां झुकतो आणि फार झालें तर शेवटीं उच्च अशा भावनावेगानें आत्मार्पण करून कांहीं लौकिक संभाळण्याचा यत्न कसा करतो; तें येथें चांगलें कळून येतें.

पे. द. ३९ ले. १३८ मध्यें भगवंतराव प्रतिनिधींनीं त्यांना देवकुळकर्णांनें विदित केली ती माहिती देतांना सांगितलें कीं, 'संभाजीस नावडी येथें पकडलें (इ. स. १७७१). आतांपर्यंत आपण संगमेश्वर समजत होतों. हें गांव संगमेश्वर ता० त आहे. बारीक पाहणीनें असे उल्लेख आढळतात. तसेंच संभाजीकालीन कोणचें वाङ्मय बनलें हें दर्शित करण्याचा विचार होता; तसे कांहीं उल्लेख दिलेहि. ह्या कामीं उतारे घेतले ते व अन्यत्र उतारे आढळले नाहींत पण पाहावें लागले ते ग्रंथ तितकेच आहेत. असो. मं.ती.ल इतर सर्व नित्यनैमित्तिक कामें संभाळून ह्या पुस्तकाचें काम त्यांतल्या त्यांत समाधान मानून केलें आहे. मं.नें व सर्वांनीं मानून घ्यावें.

ह्या संभाजीकालीन पत्रसार-संग्रहांत जी घटकावळी जोडली आहे त्यांतील हालचाली व त्यांचा काळ ह्याचीहि चर्चा आणखी कांहीं प्रसंगापुरती तरी व्हाव-यास पाहिजे. व त्यासाठीं औरंगजेबनामा, हदिकत उलअकम् इत्यादि ग्रंथांतून आलेल्या काळनिर्दिष्ट प्रसंगाची तुलना करून निश्चिती केली पाहिजे. पण सध्यां झालें एवढेंच पुढें मांडून तूर्त विराम घेतों.

* * *

ह्या ग्रंथाचें सर्व काम अगदीं एकाकी झालें असलें तरी ह्या कामीं साहाय्य केलें त्या सर्वांचाच मी आभारी आहे.

शंकर नारायण वत्स जोशी

# ग्रंथसंक्षेप

या संभाजी कालीन पत्रसारसंग्रहांत ज्या ऐ. साधन ग्रंथांतील पत्रें सार-रूपानें घेतलीं आहेत ते ग्रंथ लेखांकाच्या डाव्या अंगास कंसांत संक्षेपानें दर्शित केलें आहे. त्या ग्रंथनाम-संक्षेपाची स्पष्टता पुढें अकारादि क्रमानें दिली आहे.

आठल्ये घ. इ. = आठल्ये घराण्याचा इतिहास.

इ. वृ. = इतिवृत्त भा. इ. सं. मं. प्रकाशन वार्षिक इतिवृत्त श. १८१२ ते १८

इ. सं. गो. इ. सा. = इतिहास संग्रह मासिकांतील गोमंतकाच्या इतिहासाचीं साधनें.

इ. सं. पे. द. मा. = इतिहास संग्रह मासिकांतील पेशवे दप्तरांतील सनदा-पत्रांतील माहिती.

ए. पिं. कर्ना = एपिग्राफिका कर्नाटिका व्हॉ.

ऐ. फा. सा. = ऐतिहासिक फारसी साहित्य भा. इ. सं. मं. प्रकाशन.

ऐ. सं. सा.=ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड १ ते ७ भा. इ. सं. मं.प्रकाशन

का. पत्रेंयादी = काव्येतिहास संग्रहांतील पत्रें यादी 'चित्रशाळा आवृत्ति'

कों. इ. सां. = कोंकणच्या इतिहासाचीं साधनें

खं. = रा. खं. पहा

त्रै. व. = त्रैमासीक भा. इ. सं. मं. चें वर्ष १–३०

पुरुषार्थ मासिक सातवळेकर श्री. दा., पारडी ( जि. सुरत )

पे. द. = पेशवे दप्तर एलिनेशन ऑफीस व पुणादप्तर या मधील निवडलेले कागद–सरकार प्रकाशित ग्रंथ.

रा. खं. = मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १ ते २६ हे सर्व वि. का. राजवाडे यांनीं संपादित केलेले आहेत.

राम. दासी. = रामदास रामदासी ग्रंथ माला सत्कार्योत्तेजक सभेचें प्रकाशन.धुळे,

लेखनालंकार = श्री. पां. मा. ऊर्फ आबा चांदोरकर व श्री. आ. वा. बावडे-कर प्रकाशित ग्रंथ.

शि. च. सा. = शिवचरित्र साहित्य खंड १ ते ९ भा. इ. सं. मं. चें प्रकाशन

श्रीसंप्र.का.=श्रीसमर्थ संप्रदायाचीं कागदपत्रें,रामदास रामदासी ग्रंथमालेचे भाग

सनदापत्रें = पुरुषोत्तम विश्राम मावजी व रा. ब. द. ब. पारसनीस संपादित.

साधन चिकित्सा–वा. सि. बेंद्रेकृत

सा. सं. इ. = सावंतवाडी संस्थानचा इतिहास.

# विषयसूची

ह्या संभाजी का. प. सा. संग्रहांत जीं पत्रें साररूपानें घेतलीं आहेत त्यांत आलेल्या व्यक्तिस्थळनामांची सूची ग्रंथाचे शेवटीं दिली आहे. पण अभ्यासकांस ह्या विशेषनामांइतकीच किंबहुना त्याहून अधिक प्रमाणांत त्या ऐ. पत्रांतून आलेल्या अनेक विषयोल्लेखांचीहि आवश्यकता असते. उदा० पत्रांतून आलेला व्याजाचा दर, जकात, प्रायश्चित्त, नाणीं, कपडे, शस्त्रें, जासूद, शारीरिक व्याधी व त्यावरील उपचार, सती, भाषा, धर्मादाय, कर्ज-वसुली, जमीन मोजणी, दुष्काळ, अवर्षणें, लूट, न्यायनिवाडे, वाटण्या, बाजार, व्यापार, इत्यादि इत्यादि इतिहासकालीन सर्व प्रकारच्या लोक-व्यवहाराची वा राज्यव्यवहाराचीहि माहिती पाहिजे असते. व त्यासाठीं ठोकळ विषयसूची पुढें दिलेली आहे. अभ्यासकांच्या सूक्ष्मतेनुसार इतरहि अनेक विषय-प्रकार आढळून येतील. येथें सामान्येकरून विषयांचें दिग्दर्शन केलें आहे. नांवा-पुढील आंकडा लेखांकाचा आहे.

---

## संभाजीकालीन शकवार पत्रसंख्या

| शक | लेखांक | | शक | लेखांक | |
|---|---|---|---|---|---|
| १६०२ | १—३५ | (३५) | १६०३ | ३६–५७,६३,८२ | (२४) |
| १६०४ | ५८—८८ | (३१) | १६०५ | ८९–१२० | (३२) |
| १६०६ | १२१–१४४ | (२४) | १६०७ | १४५–१८८ | (४२) |
| १६०८ | १८९–२१८ | (३०) | १६०९ | २१९–२५६ | (३७) |
| १६१० | २५५–२९५ | (३८) | १६११ | २९४–९६–२९८ | (४) |

# संभाजीकालीन अधिकारी

पुढील यादींत प्रथम गांवाचें नांव देऊन गांवाचाहि विशेष म्हणजे तर्फ, परगणा, प्रांत, मामला इ. सांगून त्यापुढें त्या गांवावरील अधिकाऱ्याचें नांव दिलें आहे; आणि त्यापुढें त्या अधिकाऱ्याचा हुद्दा दर्शित करून शक-काल दिला आहे. तसेंच तो अधिकारी अदिलशाहींतील किंवा औरंगजेबाकडील म्ह० मोगली असल्यास तें नांव सुचविलें आहे. कांहींच दिलें नाहीं तो अधिकारी स्वराज्यांतील म्ह० संभाजीकडील समजावा.

अजिरेतर्फ—नारो राम सुभेदार महालानिहाय श. १६०४

अथणी—महमद सुभेदार अदि० अंमलदार श. १६०५

अहमदनगर सरकार—महमदशरीफ करोडी = बकात अमलदार श. १६०९

अहिवंतगड—शामजी केशव दप्तरदार श. १६०७

इंदापूर पा—नागोजी बल्लाळ मुख्य दे० री श. १६०२, १६०३

कडेवलीत पर०—येतमादखान मोगली अंमलदार श. १६०६

कऱ्हाड—भानजी गोपाळ देशाधिकारी श. १६०२–०६, प्रांत–कोनेर रंगनाथ मुख्य दे०री १६०७, बायाजी भास्कर १६०४, रंगो विश्वनाथ श. १६०६-०७—वेंकाजी रुद्र

कुडाळ—गणोराम दे०री श. १६०२–०३, अबुल मुजाफर अदि० श. १६०५, प्रांत भानजी गोपाळ सुभेदार श. १६०६, जिवाजी राम चिटनिवीस श. १६०६, नीलकंठ नारायण दे०री श. १६०८

कोप्पलप्रांत—रखमाजी बाबाजी सुभेदार महालानिहाये श. १६०८

गदग पर०—प्रांत गोविंद रघुनाथ सुभेदार श. १६०७–०८

चेऊल मामला—नरसो सुरो सुभेदार श. १६०८—विसाजी कुमदेव सुभेदार श. १६१०, येसजी फर्जंद, —रामाजी महादेव हवालदार सरदेसमुख श. १६०९,—यशवंतराव अनंत सुभेदार श. १६०७–०८,— सूर्याजी प्रभु श. १६०७–०८, मुजुम०—सुभेदार तिमाजी त्र्यंकटेश १६०३—सरसुभेदार तुळजोजी १६०८,—हरि शिवदेव सुभेदार महालानिहाय श. १६०६ —रंगाजी सबनीस श. १६०६ —बहिरो त्रिमल सुभे०, रायाजी सदक प्रभु हवालदार श. १६०७ —रायाजी सदक प्रभु हवालदार— राघो विश्वनाथ सुभे० श. १६०४ चिमणाजी आऊजी १६०५–०७

जगदेवगड—बाळाजी कृष्ण श. १६०२

जाऊली—काशी रंगनाथ श. १६०२, प्रांत—बायाजी भास्कर दे०री

प्रांत—विठ्ठल शंकर श. १६०५, प्रांत—गोविंद पुर्षोत्तम सुभेदार श. १६०७

जामखेड पा—-अमानतखान दिवाण मोंगली अंमलदार श. १६०३

तुंडील ता—रामाजी आपाजी हवालदार श. १६०२ मोगली अमल०

तेरदाळपरगणे-भगवतराव सभे.कार० १६०५ मोंगल अंमल –खेरतखान मोंगली अंमळ शिद्दी १६०५

दौंडज मौ—हवाले मोकदमी बहिरो बाबाजी श. १६०३

धाराशीव परगणा-असदखान मोगल अंमलदार श. १६०६

नाचणगांव परगणा—अमानतखान मोगल अंमलदार, श. १६०५

पारनेर पर०—अबदुल करीम फौजदार मोगली अंमलदार श.१६०४

पुणेपरगणे—काकडखान फौजदार श. १६०९-श्रीयाजी शिवप्रभु हवालदार श. १६१०—विनायक उमाजी देशाधि० श. १६०२ व श. १६०३-१६०५ सुभे बाबाजी तानदेऊ श. १६०६—दामाजी रघुनाथ सरसुभेदार मानिहाये श. १६०४

पुरंधर—कोंडाजी दामोदर सबनीस श. १६०५, बाजी घोलप हवालदार,मुद्राधारी व कार०१६०८ –१० कृष्णाजी गोविंद अजहत सबनिस व चिटणीस शिरा. पंताजीपंत बोकील श. १६०५–कोंडाजी भोसले सर हवालदार हमारती श. १६०८ नेतोजीराजे पालकर हवालदार

प्रचंडगड—रघोजी अहीरराऊ मुद्राधारी श.१६०३-रायाजी तोडकरी हवालदार व कार० श. १६१० —शिवाजी माणकेश्वर मुतालीक सबनीस श. १६१०

फोंडा—प्रांत कुडाळ व महालाविहाय प्रांत मामले धर्माजी नागनाथ सर सुभेदार मुख्य देशरी श. १६०२ –०५—शानलिंगयन सुभेदार बरिगे दळवई श. १६०८

बदामी किल्ला—श्रीनिवास वेंकटाध्वरी नाडगोडा १६०२ (बादावी ऊर्फ) शिकंदरगड पहा

बसवपटणकिल्ला—पाशीबेग किल्लेदार श. १६१०

बहादुरबिंडा किल्ला—गणेश रघुनाथ व कासी त्रिमक सबनीस १६१०

बकापूर मामले—मकबुलखान सुभे० महालानिहाय श. १६०७

बारामती तर्फ—हणमंतराव ठाणेदार श. १६०९

भुवनगड प्रांत—चांदो नारायण सुभेहाय श. १६०७

मलकापूर—जगन्नाथ वेजाजी देशरी श. १६०२ —बापूजी त्रिंबक देशरी श. १६०४

मुधोळ—मालोजी राजे कदम सुभेदार व कार० श.१६०५ अदिल० अंमलदार

राजापूर प्रांत—गंगाजी दादाजी सुभे० श. १६०९

रायगड—दप्तरदार राघो रघानंद

# संभाजीकालीन पत्र-सार-संग्रह

---

रा. खं. २१ के. ४३ } (१) { श. १६०२ वैशाख शु. १५
जुलूस २३ रजब १३ } { इ. १६८० मे ३

अबदुल्ला वल्द अहमद जात शेखजादा, राहणार चळन, रंग तांबूस, पसरट कपाळ, अरुंद भोवया, काळे डोळे, नाक सरळ. उंच, दाढी व मिशा काळ्या, गालावर एक जखम उजवीकडे—इसम बरोबर आहे व मोहर तपासणी जाली. शिवाय घोडेस्वार, पायदळ, व रजपूत यांची यादी. घोड्यांचें वर्णन ( भांबोरेकर भोसले दप्तर—राजरूप वल्द सयाजी याचे नायब, मनसबदार व अधिकारी )

सनदापत्रें पृ. १३५ } (२) { श. १६०२ ज्येष्ठ वद्य १-२
राजशक ७ रौद्र } { इ. १६८० जून ३ गुरु.
सु. १०८१ जवल १५ }

राजा शंभु छत्रपती—मानजी गोपाळ देशाधिकारी व देशलेखक सांप्रत व भावी प्रांत कराड.

वे. रा. मल्हार गोसावी सदाव्रती गोसावी" वस्ती नाडोली तर्फ मारुल प्रां. कऱ्हाड हा गांव पहिलेपासून अग्रहार असतां के. स्वामींनी कांहीं दिवस अमान्य केलें होतें की हे रीति आपले राज्यांत चलिली नाहीं. यावरी, स्वामी रा. गोसावी याचे भेटीस मौजे कोरटीस पन्हाळीहून रायगडावर जातांना भेटलें. संभाषण प्रसंग जाला. पाहातां बहुत प्रामाणिक ईश्वरभक्त. यावरून गांव अग्रहार चालवावा ऐसा इत्यर्थ करून तो दिला. कुल गोसावी यांसी वुमाला करणें. ते गावी तुम्ही कांहीं घ्यावयासी गरज नाहीं. उजूर व हरकत न करणें. लेखनालंकार.

एपि. कर्ना १० } (३) { श. १६०२ श्रावण शु. ६
चिकबाळा. ३२ } शिलालेख { इ. १६८० जुलै २१

रौद्र संवत्सरीं शिवछत्रपतीचा पुत्र संभाजीराजा चिक्क-बाळापुरीं राज्यांत—राज्य करीत होता. त्यावेळीं बाळाजी कृष्ण हा जगदेव किल्ल्याचा दुर्गाधिकारी होता. त्यानें रघुनाथपंडिताच्या आज्ञेवरून नंदी किल्ल्याचा

अधिकार आपल्याकडे घेतला. सदर किल्ला घेण्याकरितां म्लेच्छ मोठी फौज घेऊन आले पण त्यांचा पराभव झाला. ( शि. प. सा. सं. ३-२७-८७ )

| | | |
|---|---|---|
| एपि. कर्ना १० मुळबागळ ११७ शक | (४) | श. १६०२ श्रावण शु. १५ इ. १६८० जुलै ३१ |

( उत्तनूर-मडीवाळ शिलालेख )

रा. संभाजी छत्रपती यांनीं कोलालच्या कारकुनास आज्ञा केली कीं पद्मभट्ट यांचा पुत्र व्यंकटेशशास्त्री यांस उत्तनूर मडीवाळ बक्षीस दिलें. ( शि. प. सा. सं. ३-१७८८ )

| | | |
|---|---|---|
| पे. द. ३१ ले. ४२ राज शक ७ रौद्र गुरुवार | (५) | श. १६०२ भाद्रपद शु. ५ इ. १६८० आगष्ट १९ |

राजा शंभु छत्रपती—विनायक उमाजी देशाधिकारी प्रांत पुणें

तुकोबा गोसावी याचे पुत्र महादोबा वस्ती देहू यास वर्षासनाची मोईन होन पातशाही एक, लुगडियाबदल गला जोरी बाबले महालमापे खंडी १ मोईन आहे. ते सालमजकुरापासून सुमेमजकुरावरी देविली आहे.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. २० ले. २८१ राजशक ७ रौद्र इंदुवार सावान २९ | (६) | श. १६०२ आश्वीन शु. १ इ. १६८० सप्टं. १३ |

शंभु छत्रपती—गणो राम देशाधिकारी व देशलेखक प्रांत कुडाळ

पाटगांव-मौनी गोसावी ईश्वरपुरुष आहेत. त्यास पालखीस भोई व वाजंत्री पाहिजे. त्यास निशाणी होन १२५ त्यांचे शिष्य तुरुतगिरी त्यांजवळ देणें. वाजंत्रीयास वर्षास २५ होन, उरले १०० होन भोई यास. गोसावी कुशल असत तो ठेवीत जाणें. तियास बजावटाव माफ असे.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ४ ले. ७१६ राज श. ७ रौद्र. इंदुवासर | (७) | श. १६०२ आश्वीन शु. १ इ. १६८० सप्टं. १३ |

राजा शंभु छत्रपती—गणो राम देशाधिकारी व देशलेखक प्रांत कुडाळ

तुम्ही हुजूर येऊन विनंती केली की, मौनी गोसावी पाटगावी राहतात बहुत थोर ईश्वरपुरुष आहे. ( खं. २० ले. २८१ प्रमाणें. म्ह. क्रमांक ६ पहा. )

साधनचिकित्सा पृ.२८५-२८६ } (८) { श.१६०२ भाद्रपद शु.१०
लेखनालंकार पृ. ३३ } { इ. १६८० आगष्ट २४

छत्रपती संभाजीचें दानपत्र. तुळजापूरच्या देवीस शृंगारखेला इची, सालंकार पांच घोडे व २० सहस्र होनांचें वार्षिक दान दिलें आहे. (संस्कृत)

सनदा पत्रें पृ. २९ } (९) { श. १६०२ आश्विन वद्य १०
सु. १०८१ रम २८ } { इ. १६८० आक्टो. ११

मालोजीराव घोरपडे—कारकून व देसाई परगणे केलूर ममदाबाद

मुद्गल येथील श्रीनिवासभट वेंकटभट यांनीं हुजूर येऊन सांगितलें कीं, कसबे होनगुंदे, तिमापूर, कलदे व नहाल, बेवीनमोटी येथील जमीन ८४ आणि जकातपैकी रोजमुरा बारा रुके, ।·, वैशाख, कार्तिक माघ मासी· शेळा १ आणि रामबाविगी जमीन कुडो ८= येणें प्रमाणें चालत आहे. शिवाय, इतर सात पट्या साल गुदस्त चालत आहे. हल्लीं साहेबास मोकासा अर्जानी जाला आहे. तरी सालगुदस्त प्रमाणें चालवावें.

श्रीसांप्र. ले. ३५ } (१०) { श. १६०२ कार्तीक शु. ६
राजशक ७ रौद्र इंदु. } { इ. १६८० आक्टो. १८
सु. १०८१ सौवाल ४ }

राजा शंभु छत्रपती—काशी रंगनाथ देशाधिकारी व देशक प्रांत कुडाळ

रा. रामदास गोसावी यांस श्री रघुनाथ देव वास्तव्य कसबे चाफळ यांस प्रत्यही पूजेनिमित्त व नैवेद्यास व देवाच्या सेवकास मोईन बा। सनद रा. के. स्वामींनी श. १५९७ वर्षे प्रतिपदेस दिली की दर माहे होन पातशाही २५ व दरोज वजन टकबंदी १७॥ शेर ९ टांक आणि नख्त खुर्दा येक राव पेशजीपासून चालत आहे तें चालविणे असल पत्र दिवाकर गोसावी यापासी देणे. मुख्याहिरा निवळ देणे.

श्रीसां. १ ले. १४ } (११) { श. १६०२ कार्तीक शु. ६
राज शक ७ रौद्र. इंदुवासर } { इ. १६८० आक्टो. १८
सु. १०८१ सवाल ४ }

राजा शंभु छत्रपती—काशी रंगनाथ देशाधिकारी व देशक प्रांत कुडाळ

रा. रामदास गोसावी यांस अतीत अभ्यागत आदि नित्यनैमित्तिक चालिले पाहिजे म्हणोन तीर्थस्वरूप के. स्वामीनें ( श. १५९७ चैत्र शु. १ ) मोईन ८१॥९॥४॥ येक मण २९ शेर साडेचार टाक दर माहे ३ शेर, पाने

रोज ५०० व दुमती म्हैस एक रास प्रो दिल्हे ते चालत आहे तसे चालविणें. म्हैस दुमेळ तोवरी ती, ती उडालियाउपर दुसरी देणें. १॥ शेर तेल नंदादीपास नख्ते, गोसावियाकडे समुदायास देत जाणें. पूर्वी जावळीसुम्यांतून फाटी, गवत पावत होते. हाली सातारा सुम्यांतून देविले असे. तरी सुम्नी नेदणे. सामग्रीचे लग पडो नेदणे. व श्रीकडे एक हरकारा दुबरून पहिल्यापासून दिल्हा आहे त्यास होनपा २ वेतन देऊन ते धर्मादाऊ म्हणोन लिहून पाववीत जाणें.

श्रीसां. का. १ के. ३१
रा. श. ७ इंदुवासर
सु. १०८१ सवाल ४
(१२)
श. १६०२ कार्तीक शु. ६
इ. १६८० आक्टो. १८

राजा शंभु छत्रपती—जगन्नाथ बैजाजी देशाधिकारी
व देशलेखक प्रांत मलकापूर

रा. रामदास गोसावी यांचे इनाम प्रांत मजकुरी आहेत. गोसावियानी श्री हणमंत देवाची प्रतिष्ठा चाफलियामधे केली आहे व वे. रघुनाथ भट वसिष्ठ गोत्री याजकडे देवतार्चन आहे. यांस नवेदानिमित्य व दीपास व फिरकोळ उपसाहित्यास देविले षा सनदा आनाजीपंत सिराले ठिकाणे २ रकम ५०–( नाटोली सेत २५ वेणाबाई सेत २५ ) टके; व मौजे थांकुरडे ता। शिराळे मौजे विकासी ता। वारण येथील इनाम चालविणे.

श्रीसां. का. के. ३२
राजशक ७ इंदुवासर
सु. १०८१ सवाल ४
(१३)
श. १६०२ कार्तीक शु. ६
इ. १६८० आक्टो. १८

राजा शंभु छत्रपती—भानजी गोपाळ देशाधिकारी व
देशलेखक प्रांत कऱ्हाड

कसबे चाफळ येथें श्री रघुनाथ देवस्वामी आहेत. प्रतिवर्षी रामनवमी मोहत्साये करावया ( शि. प. सा. ले. १९७२ ) होन पा ११ खुर्दा टके १५० व गला महाकमापे १७॥ मण ३ पायली व वजन टकबंदी १८ मण ९॥ शेर व कापड १४ सनगे व विडे पाने ११ हजार दिले. ते चालत आहे तसें चालवणे. कापड गैरकिमतीचे म्हणोन म्हणजे मोघम हें कसें. तर पा होन ११॥ चीं पावी तरी ग्रुदस्ताच्या किमतीचे देणें. खेरीज दशमीचे दिवशीं १२१ ब्राम्हणभोजन रुके ८४ दुमेमारी चालत आहे तसें देउन देवाचा मोहोत्साव चालवीत जाणे.

ऐ. फा. सा. १ ले. ८५
हि. १०९१ सव्वाल ४
सु. १०८१

( १४ )

श. १६०२ कार्तीक शु. ६
इ. १६८० आक्टो. १८

सिकंदर अदिलशाह—श्रीनिवास वेंकटाधरी देसाई परगणे गदग व नाडगौडा किल्ले बदामी.

या किल्यापैकीं सिद्दी सालिम याचे ताबतींतील सूळ हा गांव या किल्याच्या नाडगौडकीबद्दल तंबाकू, जकात, इनाम लवाझिमे सोडून महसूल, नकद व इतर बाबीसह इनाम दिला आहे. मध्यस्थी मसऊदखान.

श्रीसां. ले. ३७
राज्यक ७ इंदुवासर

( १५ )

श. १६०२ कार्तीक शु. ७
इ. १६८० आक्टो. १९

राजा शंभु छत्रपती—वासुदेव बाळकृष्ण

मौजे चाफळ येथें रामदासस्वामींनी श्री रघुनाथाचें देवालय केलें, तेथें यात्रा भरते, सर्वदाहि मोहत्साय चालतो. येसियास कटकीचे सिपाई व वरकड कितेक लोक श्रीची मर्यादा चालवीत नाहींत; यात्रेचे लोकास तसवीस देताती, दिवाणबळे कलागती करिताती. तरी यात्रेमधे ही अगर सर्वदा ही कोणाचा उपद्रव होऊं नेदणे. नाणेघोल तर्फेचे व ते प्रांतीचे कारकून संगीनातीनें जाऊन यात्रा सुखरूप भरे ते करवणे. मुसलमान व हरकोणाचा उपद्रव न लगे ऐसे करून रामदासगोसावी यांचें स्थल हरएकविशी परामृश करणे. लावाजाद चालते तसे चालविणे. श्रीची सिंहासने खालोखाली आहेती, त्यांस पत्रे पाठ- उन् आणवीत जाणे.

श्रीसां. ले. ३६
राज्यक ७ रौद्र, भौम.
सुा १०८१ सवाल ५

( १६ )

श. १६०२ कार्तीक शु. ७
इ. १६८० आक्टो. १९

राजा शंभु छत्रपती—कोनेर रंगनाथ देशी व देशलेख सुभा माहाला- निहाये तर्फ सातारा

श्री रघुनाथदेव वास्तव्य चाफळ कर्यात नाणेघोल वासी इनाम म्हणून जे ११ गांव दिले ते देवाच्या नांवे लिहून त्या गांवचें उत्पन्न श्रीचा प्रसाद म्हणून राजपहीं जमा करावें. त्यापैकीं दर गांवास ११ बिघे अवल जमीन पाणिपाखालील पाहून देवणें. वरकड गांवांतील प्रज राजी करोन गांव माहा- मूर करावें. दर गांवचे ११ बिघया सेरीचें उत्पन्न दिवाणांत जमा करावें, एकूण बिघे १८१ ( १२१ ) पैकीं मजा कऱ्हाडमधील ६ गांवे मह ६६ बिघे.

बाकी ५ गांवचे ११ प्रमाणें ५५ बिघे शाहापूर, रिसवड, उंबरज, सिरगाऊ, वडीगाऊ या पाच गांवचे दिले असत. याखेरीज येविलशाहीपासून कदीम इनाम बिघे चवेचाळीस मसूर ११, शाहापूर १२, उबरज ५, सिरगाऊ ११ व कोरटी ५ असे सालमजकुरी अवल सालापासून पेस्तर साल चालवीत जाणे. सुमेमजकुरी खर्च घालीत जाणे. सनद दिवाकर गोसावीपासी देणें

श्रीसां. ले. १८
राज शक ७ सोमवासर } ( १७ ) { श. १६०२ कार्तिक
इ. १६८० आक्टो.

राजा शंभु छत्रपती— मानजी गोपाळ देशाधिकारी व देशलेखक प्रांत कऱ्हाड

( ले. १६ प्रमाणें म. क. १६ पहा व ) मौजे शिंगणवाडीस इनाम आहे तेथें मठ आहे याकारणे तेथील रयतास वेठ बेगार माफ केली असे. निमित्य की मठास याकार करणे लागते व बागाची कुप(ण)काटी व फिरकोळी औरडील कार्यप्रयोजन पडते. व इनामाचे खटपटेस एक लिहिणार ब्राह्मण पेशजी तीर्थस्वरूप कै. स्वामीनें दिल्हा. त्याची वेतन नियल देउनु धर्मादाऊ म्हणौन गोसावियाकडे खर्च लिहिणे व अकराद येक सुमे मजकूरपैकी देऊन त्यास मुशाहिरा देणे.

श्रीसां. २ ले. ५५९, ५६०
श्री सां. वि वि. पृ. १९४
राजशक ७ रौद्र. सोम्यवासर } ( १८ ) { श. १६०२ कार्तिक शु. ७
इ. स. १६८० आक्टो. १९

राजा शंभु छत्रपती—विनायक उमाजी देशाधिकारी व देशलेखक प्रांत पुणें
—येसाजी मल्हार देशाधिकारी व देशलेखक प्रांत वाई

रा. वासुदेव गोसावी वास्तव्य मठ कन्हेरी ता नीरथडी प्रगणे पुणें. यास बिरादित जमीन ९ कास दके मोौ मार व बागाईत जमीन पुष्पवाटिकेस मौज माहिरदे व बिघे ४ व बवकापैकी बिघे ७ दिले असे.

श्रीसां. ले. ४०
राजशक ७ सोम्यवासर } ( १९ ) { श. १६०२ कार्तिक शु. १५
इ. १६८० आक्टो. २७

राजा शंभु छत्रपती—कासी रंगनाथ देशाधिकारी देशलेखक प्रांत वाऊजी

महाबळेश्वर येथें श्री हनमंतदेव याचे देऊळ पंचगंगेसनिध दिवाकर गोसावी यानी बांधोन प्रतिष्ठा केली. त्यास माजी प्रधान मोरो त्रिमळ याणी नंदादीपास, व फिरकोळ मोईन ८८४॥४॥ साडेचार सेर साडेचार टाक व

पानें १० व सालिना नक्त टके १४ व बजली टकवंदी १॥। मन ५ शेर याप्रमाणें मोकाद्याचे गाव देविले होते. हाली मुमे मजकूरपैकीं देविले.

| | | |
|---|---|---|
| श्रीसां. के. ३९<br>राज शक ७ बुधवासर | ( २० ) | श. १६०२ कार्तिक शु. १५<br>इ. १६८० आक्टो. २७ |

राजा शंभु छत्रपती—कोनेर रंगनाथ देशाधि देशक प्रांत सातारा

सजनगडी श्री गोसावी व श्रीदेव आहेत त्यांस आपा समुदायास व नवेद्यास २ व १ फाटी व गवत पुले १०० मारे २, कोळसे वेगडीस टकवंदी ८८५ शेर समयाचे समयास देत जाणे कम पडो नेदणें. पावलि-याचे प्रति उत्तर घेणे.

| | | |
|---|---|---|
| श्रीसां. ले. ४१<br>राज. ७ रौद्र. गुरुवासर | ( २१ ) | श. १६०२ कार्तीक वद्य १<br>इ. १६८० आक्टो. २८ |

राजा शंभु छत्रपती—कृष्णाजी भास्कर

श्री सां. के. ३७ प्रमाणें सर्व मजकूर—म्हणजे वरील क्र. १५ पहा.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ३ ले. ५५८<br>राजशक ७ | ( २२ ) | श. १६०२ कार्तीक वद्य ९<br>इ. १६८० नोव्हें. ४ |

राजा शंभु छत्रपती—नागोजी बळाळ मुख्य देशाधिकारी

रा. मोरेश्वर गोसावी वास्तव्य क्षेत्र मोरगाऊ यांचा इनाम प्रांत (पुणे) मजकुरी आहेत व येविशी कै. स्वामीच्या सनदा ( शि. च. सा. १ ले. ५५४ ) आहेत तरी लोणी, पणदरे, कामव, सेळगाऊ, जमीन काठ बके ७ व दोन चावर रोज टाकणाळी खुर्दा वेक टका वा बका येणेप्रो इनाम आहे. चालविणे.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ३ ले. ५५९<br>राज शक ७ मंदवासर | ( २३ ) | श. १६०२ कार्तीक वद्य ११<br>इ. १६८० नोव्हे. ६ |

राजा शंभु छत्रपती—सुभेदार, जुमलेदार व कारकून लष्कर

रा. मोरेश्वर गोसावी वास्तव्य श्री मोरेश्वर ता कऱ्हेपठार येथें कुटुं-बेसी राहाताती. तरी तुम्ही पोताजाता त्यांच्या माणसांस सेतापोतास, गुरा-ढोरांस काडीची तसवीस देत नव जाणे.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. २ के. ३९०–३९१<br>राजशक ७ रौद्र | ( २४ ) | श. १६०२ मार्ग. शु. ५<br>इ. १६८० डिसें. १६ |

शिव (१) छत्रपती—धर्मोजी नागनाथ मुद्राधारी प्रांत कुडाळ व महाकालिदास प्रांत मामले फोंडा

रा. नागोजी नाईक प्रतापराऊ सरदेसाई यांही विनंती केली जे, आपण मामले मजकूरचे सरदेशमूख, वडील घराणेत वडील परंपरा, देसकत चालत आली आहे ते प्रमाणे प्रवर चालवावा. अदलखानी कारकीर्दीस हक वतन इनाम जिरायत व बागायत व मुकासे गाव बिलाकसूर चालत होते. हली मक्ता खंड दर सालीना होन निशाणी ५०० देतात. तेणेकरोन अवकात चालत नाही. महाराजस्वामी कृपाळु होऊन वृत्ति दुमाला करून चालवावे. येविसी रा. मल्हार नरजू हरी व रा. नागोजी इंगले हवालदार किले भीमगड यांही विनंतीपत्रे लिहिली जे देसाई मशारनिले स्वामीसेवाठायी बहुत तात्पर्य धरितात. सांप्रत किले मजकूरचे तनखेच्या खेडेयासि दांडाकडील स्वारी येऊन घोसो लागले ते समई देसाई मशारनिले आपले जमावानसी राहोन व दुसरे देसमुखीकडील जमाव मिळऊन घेऊन मार्ग धरून मर्दानगी करून गनिमास नतीजा देऊन गांव आबादानीस लाविले म्हणून त्यावरून परंपरा वृत्ति करार करून तपे अंतरूज मामले फोंडा, मौ बांदिवडे...सरदेशमुखी महालनिहाय चंद्रवाडी, हेंवाडबारसें, मुकुंद नारायण मुतालीक याचे इनाम देखील बरहुकूम भोगवटा दुमाला केले असे. नागोजीचे वारीस वंशज एकोदर ऐक्यपणें एकत्र असतील तंव त्यांचे आपले सिरस्तीप्रमाणें चालवावे. विभक्तीने निराळे होतील तर प्रतिवर्षी दर घराणेस होनु जमा १२५ देऊन वृत्तिपरंपरा चालवणें.

रा. शं. २१ के. ६८ शक रौद्र. } (२५) { श. १६०२ पौष शु. १० इ. १६८० डिसें. २०

अपदेभट्ट गिजरे—रुद्रभट्ट गिजरे

खंडपत्र दिले जे, तुम्ही वाराणसीहून आलेसी आणि विभाग मागितला. तरी आम्ही तुम्हास भाग दिधला-तपशील, घर, वृत्तीचे धान्य, भांडी, वृत्ति, संहितेचा भाग, देव, लिंग व पश्वादि; पंच धातु ऐसा तृतीय भाग तुला तुज दिला. सर्वांचा भाग व तोळा मासा रुका अडका वडील दादा असता तुझा तुज दिला होता. वृत्तीचे कागदहि तृतीय भाग दिला असे व अणाचा भाग तृतीय दिला. परस्परे कोणाचे कोणा संबंध नाही. यास अन्यथा करील तो देवब्राह्मणाचा अपराधी व पंचमहापातकाचा दोषी. अम्ही आपल्या करभागी अंध आला त्यास आम्ही परसात आपल्या अंशांत गज दोनी पश्चमभागी वाटे कारणे दिले होते. यानंतर दुर्मती संवत्सरी अधिक वद्य १० स पत्र कालिले. दोघे झगडो लागलो मग सभासतानी समजाऊन गज १ देविला वाटेकारणे. गजा वेगळी भिंती, सरदेची भिंती, उभयतानी चालावी. यावेगळी पश्चमेची भिंती रुद्रभटाची.

श्रीसां. ले. ४२ शक } (२६) { श. १६०२ इ. १६८०

चाफळच्या रामचंद्र महायात्रोत्सवी कलह जाहला. कलहमूळ निवेदून संदेहवचने ऐकोन आज्ञा झाली ती व्यवस्था-कलमें ३५.

'संभाजीस राज्याभिषेक होण्याचे आधी सज्जनगडास निमंत्रण विनंती राघो अनंत यांनी केली.'

शि. च. सा. ६ पृ. ६९ रौद्र दुर्मती दुंदुभी सु० १०८१-१०८३ } (२७) { श. १६०२-०४ इ. १६८०-८२

येसाजी मल्हार हा तीन वर्षे सुभेदार होता. (हा शिवाजीच्या कारकीर्दीत श. १५९९ पासून असून १६०१ मध्यें तो बदलला. नंतर त्याच वर्षी माहादाजी सामराज सुभेदार झाले व पुनः १६०२-०४ मध्यें येसाजीकडे सुभेदारी आली. पुढेंहि पुनरपि श. १६०९ व १० मध्यें वाई प्रांतीं येसाजी सुभेदारीवर आहे.)

सनदापत्रें पृ. ५९-६० } (२८) { श. १६०२-११ इ. १६८०-८९

राघोस्वानंद बापोजी दिवाकर चिमणगांवकर संभाजीचे कारकीर्दीत रायगडावरील दफ्तरदार.

ऐ. फा. सा. ३ ले. ३० हि. १०९१ जिल्हेज २५ } (२९) { श. १६०२ पौष वद्य १२ इ. १६८१ जाने ६

सिकंदर आदिलशाह — !

नबाबापाशीं येऊन पादशाही मसलत नीट बजावून स्वतःची निष्ठा व सेवकत्व व्यक्त करावें त्याप्रमाणें उत्कर्ष होईल.

इ. वृ. १८३७ पृ. १४४-४५ इ. वृ. १८३८ पृ. १२७ } (३०) { श. १६०२ माघ शु. ७ इ. १६८१ जाने. १६

औरंगजेबाची सर्वांत वडील मुलगी झेबुन्निसा हिला बापानें दिल्लीतच सालिमगड येथें कैदेंत ठेविलें. (ती मुक्त न होतां कैदेंतच पुढें १७०२ मे २६ रोजीं मेली.)

रा. खं. १५ ले. ३०१ दुर्मती (?) } (३१) { श. १६०२ माघ शु. ७ इ. १६८१ जाने. १६

संभाजीराजे यास राज्याभिषेक (जे. श. पृ. ३१ वर शुा ७ आहे व

संवत्सर नाम रौद्र आहे तेंच बरोबर गह, मग जाने. १६ येईल. दुर्मती हें श. १६०३ चें संवत्सर-नाम आहे. )

शि. च. सा. ९ ले. ५८ } (३२) { श. १६०२ माघ वद्य १
जुलूस २४ मोहरम १३ } { इ. १६८१ जाने. २४

--रामाजी आपाजी हवालदार ता तुंबीक

सेख दाखल हुजूर आला. तुम्ही बलर पाठवून ता मारची हकिकत लिहिलीत नाहीं. दावळनें सांगितले की १२॥ खंडी भात व नागली खंडी ५ असा साठा केला. पैकी ६। ख. चे पैसे हुजूर रवाना केले. बाकी गल्याचे पैसे निर्ख ९ प्रो जाहाला सबब घेतले नाही. हाली घेऊन पाठविलीक. दरकाचे तसरेचे वणटका, लमटका व माहतर्फा जमा जाहला व हुजूरामधी येऊन पोचेल. गल्याचे फडखतीचे पैसे व गैरा आयबाबचे तकरका न करू. जलदीणे रवाना करणें. आपले घरी शादी असे. खर्चाचा जरूर आहे; मुर्गिया वगैरे सामना रवाना केले पाहिजे. व फडावर गला जमा जाला असेल त्याची तफर्का न करणें. सेख अबदुला व हसन कदीमपासन सरकारातून परवरीस पावले आहेत. परागंदगीने ते जागा राहात असत. कदीम आपले सरकारचे पावस्त आहेत. त्याचे तगीचा अहवालावरून त्यावर असलेली बाकी बस्तगीर्दी देविली असे. कुल १ खंडी गला देविला असे. जो बाकी राहील त्यास दुसरे गावी देविले. अदा करणे.

शि. च. सा. ५ ले. ७९८ } (३३) { श. १६०२ माघ वद्य ३
फ. १०९० मोहरम १५ } { इ. १६८१ जाने. २६

महजर--मौजे कोले कानडी (परगणे आंबे जोगाई=मोमिनाबाद) हा गांव दादो गोसावी यास मलिकंबरानें आपल्या जाहागिरींतून इनाम दिला. मग दादोबानी निजामशहाचे त्याबद्दलचे फर्मान मागितले. तेहि मिळाले. त्यानंतर मोगलाई जाली व परगणा हिमातखानास जागीर जाला. त्याची तगिरी होऊन अरबखानास व त्यानंतर दिलावरखानास त्यानंतर रणमस्तखान त्यानंतर आजमखान यास जहागीर झाली. या सर्वांनी आपआपलीं इनामपत्रसनद दिली. त्या सर्व सनदा पाहून अमानतखानजी दिवाण यानी बरहुकूम फर्मान आपला परवाना करून दिधला.

शि. च. सा. ३ ले. ५६०-६१ } (३४) { श. १६०२ माघ व. १४
सु. १०८१ मोहरम २७ } { इ. १६८१ फेब्रु. ७

नागोजी बलाळ सर सुभेदार--हवालदार व कारकून पा इंदापूर

मोरेश्वर गोसाव्यांचा इनाम प्रांत मजकुरी आहे. येविषयी स्वामींची सनद ( ले. ५५८ ग्र. क्रमांक २२ पहा ) आहे. तो चालवणें.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. खं. २ ले. २४१<br>सु. १०८१ रा. श. ७ रौद्र.<br>बृहस्पतवार सफर ९ | ( ३५ ) | श. १६०२ फाल्गुन शु. १०<br>इ. १६८१ फेब्रु. १७ |

मोरेश्वर पंडितराय--भानजी गोपाळ देशाधिकारी व देश-
लेखक प्रा कऱ्हाड वर्तमान व भावी.

वे. सिवभट नीळकंठभट अग्निहोत्री वास्तव्य कऱ्हाड ( याव ) धर्मादाय देविले जोंधळे केली कोठी मापे खंडी २. जोवरी भट गोसावी क्षेम असतील तोवरी प्रतिवर्षी परामर्श घेऊन सदरहूप्रमाणें आदा करणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा अक्षेप न करणे. भट गोसावी यांची वृत्ति कामजकुरी चावर १ व नक्त होन ९० होते ते कुली अमानत केले म्हणोन धर्मादाय देविले.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. २ ले. २४२<br>सु. १०८१ राक्षस ७ दुर्मती<br>बृहस्पतवार रवल १४ | ( ३६ ) | श. १६०१ चैत्र शु. १<br>इ. १६८१ मार्च १० |

मोरेश्वर पंडितराय--भानजी गोपाळ देशाधिकारी प्रा कऱ्हाड

रुद्रभट नीळकंठभट अग्निहोत्री वास्तव्य कऱ्हाड का मार यासी वृत्ति चावर १ नक्त होन पा १५ येणेंप्रमाणें होते तें कुली अमानत केले. ब्राम्हण निराश्रीत देखोन धर्मादाय देविले जोंधळे केली कोठीमापे मण ॰।।।॰ जोवरी भट गोसावी क्षेम असतील तोवरी प्रतिवर्षी मण १५ देणे. भट गोसावी याचे इनामपैकी आदा करणें.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. २१ ले. ४४<br>रवल ६ | ( ३७ ) | श. १६०३ चैत्र शु. ८<br>इ. १६८१ मार्च १७ |

राजरूप वल्द सयाजी यांचे नायब व हिस्सेदार कबीरखान वल्द बाहदुरखान मुलगा हबीबखान, जात अफगाण, राहणार नांदेड, रंग तांबुस, कपाळ पसरट, भोंवया आखूड, काळे डोळे, नाक उंच, मिशा व दाढी काळी, हनवटीवर एक मस, व डावीकडे दोन मस, तोंडावर देवीचे वण, दोन्ही कानात भोंके.

संभाजी वल्द जानोजी जात मराठा, राहणार दौलताबाद, तांबुस रंग, कपाळ पसरट.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. २० के. २७१<br>राजशक ७ दुर्मती गुरुवासर | (१८) | श. १६०३ चैत्र वद्य ७<br>इ. १६८१ मार्च ३१ |

राजा शंभु छत्रपती--रघोजी अहीरराऊ मुद्राधारी प्रचंडगड

गड मजकूरचे कोळी मेटकरी गडाचे घेरियाखाली राहतात. पैकी काही गडावर चाकर आहेत व कितेक सोनजी इतबारराव याचे दिमतीस आहेती. त्यानी अर्ज केला. ऐशास त्यांची गाईची वणी तो एकंदर माफ केली आहे; म्हैसीची वणी (कर) घ्यावयाचा तह आहे. तर हवालदार, नाइकवाडी व रजपूत यास २ म्हैसी सोड आहे. उरतील त्या म्हसीस वण घेणे. गडावर चाकर असतील त्यांची वणी त्याच्या नांवे लिहिणें. घरटकाहि त्याचे नांवें बार करणें. हेच सनद माहालचे कारकुनी मसमू जाणून एवंप्रमाणें चालवावें.

| | | |
|---|---|---|
| ऐ. सं. सा. ५ के. २५<br>राजशक ७ दुर्मति भोमवासर | (३९) | श. १६०३ चैत्र वद्य ११<br>इ. १६८१ एप्रिल ६ |

राजा शंभु छत्रपती--दत्ताजी केशवजी नाईक पिसाळ देशमूख वाई परगणा.

विल्हे अभयपत्र ऐसे जे, पिलाई कोम केशवजी नाईक याणी सिवाजी सुरो कारभारी व रामचंद्र दत्ताजी मुतालीक यांचे सांगणेवरून पिलाईची दीर गंगाजी, त्याचा लेक दत्ताजी हा अवघ्या वंदभाची पिलाईच्या वोट्यात घातला व पुत्रपण देऊन देसगतीस पा। होन ५ ह. शेरणी मोकरर केली. हकाची मोईन के. स्वामीनी करार करून विल्हे त्याप्रो चालत असे. तैसेच पेस्तर हवाला केले. पेशजी केशवजीस लंड बांधिला त्यापैकीं २ ह. पावले. बाकी ३ ह. च्या खिस्ती बांधून देऊन त्याप्रो वसूल करून देणें.

| | | |
|---|---|---|
| राम. दासी. ४२ के. ४३<br>सु १०८१ रखर ७ | (४०) | श. १६०३ वैशाख श. ९<br>इ. १६८१ एप्रील १६ |

तिमाजी व्यंकटेश सुभेदार--बाळाजी ताऊजी कुलकर्णी व कारकून सुभाप्रांत चेऊल मामले चेऊल

तुमचे बाबे सूर्याजी प्रभु मजमूदार व देशक मा। मार याणी सुभा मालूम केले कीं तुमचेकडे बाकी आहे म्हणून तुम्ही परागंदा जाला. तरी निमे बाकी सोडी विल्हे व निमे दुसाला उसूल करून गांवास येऊन सुखे असणें.

[ के. ४२ हें पत्र के. ४३ च्या आधींचें वाटतें. पण वर्ष इसने म्हणजे पुढचे आहे आणि तारीखहि जमत नाहीं. ]

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. २ ले. ४६६<br>सु. १०८१ शक | (४१) | श. १६०३ वैशाख शु. ९<br>इ. १६८१ एप्रील १६ |

अकोले देशपांडे यांचकडील हकीकत. लुमाजी देशकुलकर्णी त्याचे दोन पुत्र रामाजी व हरबाजी हे देशमुखानें मारले. इत्यादि इत्यादि.

| | | |
|---|---|---|
| खं. १८ पृ. ८२<br>सु. १०८१ जवल १० | (४२) | श. १६०३ जेष्ठ शु. १२<br>इ. १६८१ मे १९ |

बहिरो बाबाजी हवाले मोकदमीमौजे-दतसेट सेटिया<br>दौंडज ता। निरथडीप्रा। पुणें

तुम्हाकडे रा. हिरोजी इंदलकर सुभेदार यांचे कर्ज आहे. त्यांनी आम्हांस पैके देविले आहेत. त्यास तुम्ही आम्हास होन पा। ३५ व रु. ५ दिल्हे ते पावले. अखेर खाली रायगडास जाऊन कर्जपैकीं मजुरा देऊ.

| | | |
|---|---|---|
| इ. सं. गो. इ. सा. ले. ३४<br>सु. १०८२ रा़बश. ८ दुर्मती<br>गुरु. जवल १७ | (४३) | श. १६०३ ज्येष्ठ वद्य ५<br>इ. १६८१ मे २६ |

मोरेश्वर पंडितराय—बाळाजी भास्कर दे०री व दे०क प्रा। कांबगाऊ

श्रीनिवास आपा जोसी करकरा बा. खानापूर यासी पूर्वी निशाणी होन १॥ व १ सेत ठिकाण होते ते कुल अमानत केले. त्यामुळें ब्राह्मण निराश्रित जाला, देखोन तांदूळ केली कोठी मापे मण ।= बात जोवरी भटगोसावी क्षेम असतील तोवरी प्रतिवर्षी परामर्ष घेऊन आज्ञा करणे. आमचे सनदेविरहित जो धर्मादाय असेल तो गैरमजुरा असे. ...... सदरहू नांव सक्त जाले याचें नांव श्रीनिवासभट अपभट यासि पत्रप्रमाणें आज्ञा करणें.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ५ ले. ८४०<br>शक, रविवार (जं. मंगळ) | (४४) | श. १६०३ आषाढ शु. ९<br>इ. १६८१ जून १४ |

मुकुंद दुरजी सावरगांवकर पाटील—आपाजी भट निरंतर

श्रीमुरलेश्वराचे देवालयांत पूर्वपासून पुराण सांगत आहां. सांप्रत आम्ही या देवालयाचा जीर्णोद्धार केला. आपण देवासंनिध पुराण सांगत जावें. अन्यथा करील त्यास कुलस्वामीची श्रीसांबची शपथ असे.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. खं. १ ले. ६५<br>सु. १०८२ रजब ३ | (४५) | श. १६०३ श्रावण शु. ४<br>इ. १६८१ जुलै ९ |

नीलकंठ मोरेश्वर प्रधान—नागोजी बलाळ सुभेदार व कारकून सुभा<br>प्रांत महाबालिहाय पा। इंदापूर सुपे.

सुपे खुर्द येथील पाटिलकी रायाजी फाटकर व शंकराजी नीलकंठ राऊ व ह्राऊजी धणगर या तिघांची. ती तशीच चालवणें.

रा. खं. १५ ले. १४१ }
श. दुर्मती सु. १०८२ }  ( ४६ )  { श. १६०३ श्रावण शु. १३
{ इ. १६८१ जुलै १८

हजीर मजालसी विद्यमाने परगणे वाईपैकीं सेकीन निंब येथील श्रीसदानंद मठास कर्यात पा। माणपैकीं प्रतिवरुसी भंडाराबदल गला केली खंडी बेरीज १॥२॥ गांवें ५८ मधून मिळावे.

रा. खं. २६ ले. ४६
जुलूस २५ रमजान १० }  ( ४७ )  { श. १६०३ अ. आश्वीन शु. ११
फ १०९०१ (?)  { इ. १६८१ सप्टं. १३

चिठी—परसोजी भोसले यांचे नातू सयाजीचा मुलें राजरूप यांच्या नांवे परगणे संगमनेर वगैरे वसूल बाकी जामखेड खरीफाचा हंगामा ५ ल. ९९ ह. दाम अमानतखान दिवाण, ज्याहाबहादूर जफरजंग देशमुख, देशपांडे, मोकदम, रया पा। जामखेड सरकार आमदानगर, सुबे अवरंगाबाद ऊर्फ दक्षण यानीं मा।रइलेचे गुमास्तेयासि अमल दीजे.

रा. खं. २० ले. २४८–४९ }
सु. १०८२ फ. १०९१ रम २५ }  ( ४८ )  { श. १६०३ अ. आश्वी. व. १२
{ इ. १६८१ सप्टं. २८

बजाजी नाईक ( निंबालकर )–करेपठार ( पा। पुणेचे कारकून ) व
वेंकाजी जिवाजी हवालदार

विनायक उमाजी देशारी व देशलेखक व देशमुख. सिवाजी वलद गणेशभट सेकीन मोरेश्वर ( मोरगावचे इनाम चालविणें.)

शि. च. सा. २ ले. १६८ }
सु. १०८२ फ. १०९१ }  ( ४९ )  { श. १६०३ अ. आश्वीन वद्य १२
{ इ. १६८१ सप्टं. २८

दस्तक मो रहदारानी, चवकीदारानी, पतकीयानी कमावीस अकाती मार्ग वहत् मोरेश्वर

मो रा सिवजी गोसावी मा। मोरेश्वर यास सरकार राजश्री बजाजी नाईक साहेब लस्कर मो का हाटोळू गोसावी यासी खिलारपैकी धर्मार्थबुधीने गाई ७, बैल २, वाटी १, वासरु १ एकून ११ दिल्ही आहेत ते गोसावी घेऊन जातासी तरी यास वाटेस हरएक बाबे मुजाहीम न होणे. ( 'मुधोजी बणगोजी नाइक' अशा शिका व 'मोरतब' अशा समाप्ती शिक्का ).

रा. सं. २० ले. २७१
सु. १०८२ राज्यशक ८
+शाबान ११ दुर्मती मदवार
} (५०) { श. १६०३ आश्वीन शु. ११
इ. १६८१ आक्टो. १५

मोरेश्वर पंडितराय—गणोराम देशाधिकारी व देशलेखक प्रांत कुडाळ

वे. अनंतभट मा(हा)दे(व)भट कांदळगाव ता मसुरे यास दर माहा कोठीमार्फे मण ·॥।·।·५। जोवेरी भट ध्यान करतील तोवरी प्रतिवर्षी आदा करणें.

\+ सवाल पाहिजे.

इ. सू. १८१४ पृ. ३२८
रा. श. ८ दुर्मती रविवार
} (५१) { श. १६०३ कार्तीक शु. ६
इ. १६८१ नवं. ६

छत्रपती शंभु—कासी रंगनाथ देशाधिकारी व लेखक प्रांत जावळी

वे. रामभट गोपालभट अग्रहोत्री माभळेश्वरकर यांनीं सांगितलें आपले पिते गोपाळभट श्रीधरभट याजपासून महाराज कै. यानी मंत्र उपदेश घेऊन आपल्या अभ्योदयाकार्णे सूर्येप्रीत्यर्थ अनुस्ठान सांगितले. त्यास वर्षासन दानपत्र मोईन करून आमचे पिते यासि दिल्ही. तें दानपत्र व शुभाचे पत्र दाखविले. स्वामी भले थोर अनुष्ठाते सूर्ये उपासनी पद्महस्ती ऐसे जाणोन आम्ही स्वामीपासून मंत्र उपदेश संपादिला. वर्षासन होन पातशाही शंभर वजन टा ·।४ तूप ·।४ तेल; ( खंडी मण ) गळा नबसेर बारुले मापे खंडी ४ तांदूळ ४ नागली अरक्तवथे—अनुष्ठानसमई नेसावयास व असन पीतांबर, शाल, असन चंदन शुभ्र व अरक्त ८८५ ( शेर ) स्वामींचे वंशपरंपरेने आमचे वंशपरंपरेस मंत्र उपदेशहि करावा व दान उत्तरोत्तर चालवावे. अन्यथा करू तरी महादेव साक्ष. महाराज अबासाहेब कै. स्वामीनी करून दिल्हे ते आबासाहेबाचे संकल्पित आहे ते चालवावे हें आम्हांस अगत्य. हली हुजुर ऐवज न पावे म्हणवून नख्त व जिनस सुमेमबकुरावरी देविले असे.

ऐ. सं. सा. ६ ले. १
राजशक ८ दुर्मती मंदवासर
} (५२) { श. १६०३ कार्तीक वद्य १२
इ. १६८१ नवंबर २६

राजा शंभु छत्रपतीं—कृष्णाजी कासी

आश्वीन वद्य ७ चें पत्र काळ ( १६८१ नव. २५ शुक्रवार ) पावलें. हरजीराजे माहाडीक यांचे आज्ञेंत वर्तत जाणें. तुमची वृत्त पुणेची आहे ते अमानत केली आहे. तुमचे गोत्रजन हुजूर येऊन गैर वाका सांगोन वृत मोकली करवितील तरीं तैसीच आहे. पुढें तुमचा कोणी दाईज हुजूर आला तर्‍हीं त्याचे बोले मोकली करायाची आज्ञा होणार नाहीं. अमानतच आहे. येविसी तुम्ही आपकें समाधान असों देणें.

रा. सं. १५ ले. १४४ / मु० १०८२ जिलकाद २६ } (५३) { श. १६०३ कार्तीक वद्य १३ रवि. / इ. १६८१ नोव्हें. २७

बावाजी राजे घाटिगे देसाई—कारकून व मोकदम
कर्यात मळेवाडी　　मौजे तुळरवीरें

सदानंद गोसावी—आसाडा मौजे निंब पा वाई याती इनाम अवरा-मन्हामत या ठिकाण पेशजीचे मळा देवपूज व बाजे जमीन ते देविले असे. ते कीर्द करतील. हदमहदूद असेल ते दाखवावे.

कौ. इ. सा. ले. ९६ पृ. १०९ } (५४) { श. १६०३ / इ. १६८१

कुडाळ कसबा येथील सीन महवळ (=परीट) मिरासदार होता. इवा-लवार कुडाळचा मिरजाखान याणे परिटाचा सःथानाश करावा ऐसे योजिले. परीट पळोन गेला. दोन पिढि गेला. गावी १०।२० बरिसे कसबेमधे परीट कोणी नाहीं. तेव्हां दाद सामंत पहिले देसाई परुळेकर कुडाळास होते त्यानीं देशकास अर्ज करून मान महवळ परुळेकर यास आणून कसबेची मिरास स्वाधीन केली महवळकी चालऊ लागले.

रा. खं. २६ ले. ४५ / फ. १०९० } (५५) { श. १६०३ / इ. १६८१

बा(तु)ळोजी मोकदम मौजे नरसोजी चौ (जो) गला रंभापूर (रतनापूर) विठोजी शिंदे, रजाजी, बाघोजी राऊत मौजे भोंड पारगाव, (बो)रलें पा जामखेड समस्त रयत } —राजेश्री रुस्तुमजी राजेसाहेब भोसले

आम्ही सर्व (तुमच्या) जाहागिरींतले आहो, हें आम्ही पवित्र स्थळीं कबूल करतो की, तुमच्या योग्य वागवणुकीनें व न्याय्य बंदोबस्तानें राजी व उप-कृत आहोंत. आपण आपले धनी, मायबाप आहेत. यांच्या गुमास्त्याकरवी जुलूम जबरी झाली नाहीं. साहेबाचे पायासी जिवेसी राजी आहों. यास हिला-हरकत करूं तरी साहेबांचे गुन्हेगार.

शि. च. सा. खं. ७ / सु. १०८२ } (५६) { श. १६०३–०४ / इ. १६८१–८२

वाणिता हकदार पा वाई. एकूण आकार राजभाग पंचाकुई गला दसेरी बारके मापे खंडी १५३३६।।।२॥२ दर सदे रयतनिसबत गला खंडी ५ (देसाई देशकुळकर्णी, मोकदम कुलकर्णी चौगुला यांचे तपशीलासह)

शि. च. सा. ५ ले. ९७१ } (५७) { श. १६०३—०७
सु. १०८२ } { इ. ११८१--८५

विनायक उमाजी सुभेदार प्रांत पुणें इनामती खंडणी १०५ देशमूख, ९५ देशकुलकर्णी.

बाबाजी तानदेऊ सुभा श. १६०६ परगणा खराब, शाबदीखान पुणा येऊन ठाणें घातलें. दिवाणदस्तक, देशमूख होन १५२॥ देशकुलकर्णी होन ४७॥ सुभा दामाजी रघुनाथ सरसुमेदार पा मा।र खराब, खंडणी श. १६०६ प्रमाणेंच.

श्रीसां. ले. ५४ } (५८) { श. १६०४-०५
{ इ. १६८२-८३

बंधुवर्ग गणेश चाफळकर—दिवाकर गोसावी.

उधव गोसावी मठात राहणें. दिवाकर सर्वप्रमुख. इत्यादि ले. ५३ प्रमाणें पुढें क्रमांक ६१ पहा. )

श्रीसा. ले. ४९ } (५९) { श. १६०४-०६
{ इ. १६८२-८४

कल्याण नाम्ना--मोक्षभिया विराजित दिवाकर गोसावी

तुमचें पत्र पावोन अवगत जाहालें. श्रीसमर्थ आज्ञेप्रमाणें, वर्तावें हें उचित. वंशपरंनें तुम्ही संस्थान-कार्य करावे ऐसे बोलोन श्रींनी तांबूल दिला. ते अभिमानअक्रोध होऊन प्रवर्तल्यानें श्री दया करतील. धैर्य श्री भजनाचें न टाकणें. कलहामुळें श्रीच्या धर्मस्थापनेसी अंतर पडे ऐसे न करणें.

श्रीसां. ले. ५० व ५२ } (६०) { श. १६०४
{ इ. १६८२

बंधुवर्ग कल्याण व विठल—दिवाकर

श्रीचे स्थळचा सर्व पारपत्याधिकार दिवाकर गोसावी यांनी करावा येविषयीं पूर्ववृत्तांत—रा. छत्रपती शरीरवेथा कठीण ऐकोन श्रीचे सांगण्यावरून सातारांच्या दरवाजियास गेलों. त्या उपरी त्याच समागमे बिन्हाड न घेतां राजदरशनास गेलों, ते प्रसंगी उबरजेकडे धावणी होऊन गुरे वालून आणिली होती. ती सोनगावीच्या ११ गाई सवत्स राजश्रींनी दिल्या त्या सिरगावी ठेवून श्रीसमर्थास पारमार्थीस शिवथर प्रांती नवकवाडियाचा कोंड तेथें बांभळीच्या चौथरीवर बसके असतां दरशन घेऊन छत्रपतीकडील चमत्कार कौतुक प्रसिधी निवेदन केले. समर्थ बोलिले. हें प्रयोजन तुम्हास बोलिलें नाहीं. श्रीचे स्थळचा सर्व पारिपत्याधिकार दिवाकर गोसावी यास, तो दुरोबी मोहरा.

२

वैदिक, भला; आर्जव वृतीनें मागणें निस्पृहाचा धर्म नव्हे. ऐसी आज्ञा संवत्सर कार्तीक प्रतिपदा परिछिन्न जाली. इ. श्रीपृष्ठावरी हात ठेवून आज्ञा. चरेगाव, माजगांव, उंबरज. कोरटी येथील इनाम उल्लेख अधिकारी उल्लेख.

श्रीसां ले. ५१ } (६१) { श. १६०४–०६ | इ. १६८२–८४

(ले. ५० प्रो) दिवाकर गोसावी रायगडास. रघुनाथभट पंडितराय नवहस्त यास दिवाकरांनीं सर्व राजगृहींचीं कामें करावी ही आज्ञा. इत्यादि.

श्री सां. ले. ५३ } (६२) { श. १६०४ - ०६ | ई. १६८२ - ८४

श्रीसमर्थ शिष्य समुदाय, देशकुलकर्णी प्रां. सराळ पनाला वांह इ.—
समस्त हूजरात राजसभा धर्मसभा व बावास्वामी.
चाफळ उत्सवाचे तहपत्र. श्रीसमर्थांनी पदार्थाचा जाबता करवीला व धर्मादाय समर्पिला. दिवाकर गोसावी यानी मानमहत्व सुरलीत चालवावे. ऐसें असतां उधव गोसावी घालमेल करतात. विक्षेप करील तो संप्रदायवेगला जाला. मोहछायप्रसंगी समुदायमधून अवज्ञेन वर्तेल त्यास उठोन वेगळे बसावे लागेल निमित्य कीं श्रीचा द्रोह घडला. तरी श्रीचे आज्ञेचे पाळण होय. (क्र. ५८ पहा)

रा. खं. २६ ले. ४७ | जुलूस २५ सफर २१ } (६३) { श. १६०३ फाल्गुन शु. ९ | इ. १६८२ फेब्रु. २०

रावरूप वल्द सयाजी परसोजी भोसले, यांचे वकील—

परगणे बळगांवची देशमुखी, गंगा वाघ याचा नाश केल्यानंतर सम्राट-बाद शहाच्या कृपेने आमच्या मालकांच्या वडिलांच्या नांवें नेमली होती. मरहूम मुरशीद कुलीखान यांच्या कारकीर्दीत रसूम जप्त झाला. परसोजीस कांहीं देणें होते. त्यांच्या गुमास्त्यांचा अडथळा आहे. कांहीं वर्षे गंगा वाघाचा मुलगा जहागिरदारांच्या गुमास्त्यांचा ओळखीनें वसूल गोळा करतो. या कारणे आमच्या मालकाला आता काहीं देणें राहात नाहीं. देशमुखी व तिचा रसूम आमच्या मालकाच्या वडिलांच्या नांवें नेमला जावा आणि ५० स्वारांची जमीयत, मनसब कायम राहील तोपर्यंत ते सेवेस तयार ठेवतील.

ऐ. फा. सा. १ ले. ५९ | जुलूस २५ सफर २९ } (६४) { श. १६०४ अ. चत्र शु. १ | इ. १६८२ फेब्रु. २८

—मुख्तारखान

कास्वी नाहलच्या लढाईत विजयसिंह आपल्या जमातीसह कामास

आला. म्हणून तुम्ही नर्मदा उतरून त्या बाजूस जावें. काकरखानहि तेथें येईल त्यासह लढण्यास लागावें. आवास येथील जमिदार पर्वतसिंह हा तुमच्याकडे येतांच त्यास दरबारकडे पाठवून द्यावें. म्हणजे त्यास चाकरी मनसब देऊन परत पाठविलें जाईल.

श्रीसं. ले. ४७ } (६५) { श. १६०४ अ. चैत्र शु. १५
राज श. ८ दुंदुमी सोमवार ! } { इ. १६८२ मार्च १३

संभाजीराजे—वे. रा. दिवाकर गोसावी

श्रीस्वामी सज्जनगडी पूर्णावतार केला. ते स्थली हनुमंताचे देवालय करविले आहे. स्वामी असतां समुदाय होता तो सेवेसी असों देणें. आणि सुबासुबाहून धर्मादाये इनाम देविला तो आणऊन देवास व समुदायास पाववीत जाणे. यथाविध उछव समारंभ करीत जाणें. तैसेच श्रीरघुनाथदेवालय चाफळीं आहे तेथील नित्यपूजा रथोत्सव सनदे प्रमाणें मोईन व इनाम आणऊन येथासांग करीत जाणें.

श्रीसं. ले. ४५, ४६ } (६६) { श. १६०४ अ. चैत्र शु. १५
रोज, ८ दुंदुमी सोमवार } { इ. १६८२ मार्च १३

शंभु छत्रपती—कोनेर रंगनाथ देशाधिकारी प्रांत सातारा

ले. ४४ प्रमाणें व दिवींस खर्च लागतो, तो माहालीहून करणें. खासा तुम्हीच यात्रासंरक्षण करून समारंभ संपादीत जाणें.

श्रीसं. ले. ४४ } (६७) { श. १६०४ अ. चैत्र शु. १५
राज श. ८ दुंदुभी सोमवार } { इ. १६८२ मार्च १३

शंभु छत्रपती—कासी रंगनाथ देश्री व दे०क प्रांत जाउली

रामदासस्वामीनी पूर्णावतार केला. त्या स्थानीं श्री हणमंताचे देवालय करविले त्यासी व चाफळच्या रथोत्साहाकरता कर्नाटकांतून देवाच्या मूर्ति असतील त्यासी नियपूजेस व समारंभास व शिष्यसमुदायासाठीं धर्मादाय मोईन पेशजीप्रमाणें चालवून ती दिवाकर गोसाव्याचे विद्यमाने करीत जाणे.

पुरुषार्थ } (६८) { श. १६०४ चैत्र शु. १४
{ इ. १६८२ एप्रील १०

रामसिंहाचा पुत्र कृष्णसिंह म्ह. जयसिंग मिर्जाराजाचा नातू, औरंगजेबाच्या फौजेंत नोकरीवर होता. तो आपल्या पुत्रास—अकबरास—आपल्या विरुद्ध होऊन सहाय्य करतो अशा संशयानें त्यास म्ह. कृष्णसिंहास परिंड्याजवळ औरंगजेबानें ठार केलें.

रामदासराम. ४२ के.४२ }
सु. १०८२ रजर २५ } ( ६९ ) { श. १६०४ चैत्र वद्य १२
{ इ. १६८२ एप्रील २४

राघो विश्वनाथ सुमेदार व कारकून सुभाप्रांत चेऊल —बाळाजी कुलकर्णी मामले चेऊल

कौलनामा—तुम्हाकडे बाकी उतरत आहे ते धास्तीने रेवदंडा राहिले आहा. तरी सुखे घरी येऊन राहाणें. बाकी विषयीं मनास आणून विल्हे करून देऊन. एकंदर तसवीस लागो देणार नाहीं.

इ. सं; पे. द. मा. के १ }
शक. गुरुवासर } ( ७० ) { श. १६०४ वैशाख वद्य ७
{ इ. १६८२ मे १८

रा. राजा शाहू छत्रपती स्वामी शा. श. १६०४ दुंदुभी नामसंवत्सरे वैशाख वद्य ७ गुरुवासर सूर्योदयापासून घटिका ५४ जन्म. दिनमान घ. ३२ शततारका नक्षत्र, चरण. ३ रास कुंभ.

श्रीसा. के. ४८ }
राजश. ८ दुंदुभी भृगु. } ( ७१ ) { श. १६०४ ज्येष्ठ शुद्ध ७
{ इ. १६८२ जून २

शंभू छत्रपती—जिजोजी काटकर मुद्राधारी सज्जनगड

श्रीस्वामी याणी अवतार पूर्ण करण्या अगोदर आज्ञा केली होती त्याप्रमाणें राहाटी करावणे. भानजी व रामजी आणि दिवाकर गोसावी, उध्दव गोसावी, यांनीं न मांडणें. मुख्य मोहत्सव चापळीच होत जाईल. तुम्ही धाकमेळीत पडावया प्रयोजन नाहीं.

शि. च. सा. ६ के. १११ }
राजशक ९ दुंदुभी } ( ७२ ) { श. १६०४ ज्येष्ठ वद्य ३
सु. १०८३ जमादिलावल १५ } { इ. १६८२ जून १२

संभाजी—बापूजी त्रिंबक देशाधिकारी व लेखक प्रांत मलकापूर

तुळाजी देसाई निकम परगणे शिराळे हुजूर विदित केले कीं, आपली देशमुखी मिरासी असतां पा मारचे बिळासी तरफेचे १२ गांव ते सोमजी बांदल याणे बळेंच वारणेचे देशमुखीकडे कमाविशीस लावले. गतवरषी छत्र० स्वामी पनाळाहून पा मास आले ते समई स्वामीस हे वर्तमान विदित केले. स्वामीनी सदर देशमुखीचे १२ गांव वारणेकडे देशमुखीकडे चोटत होते तें सिराळेकडे लावणें आणि देशमुखीचा कारभार तुळाजीच्या हाते भोगवट्याप्रमाणें चेत जाणे म्हणोऊन कृष्णाजी भास्कर यास आज्ञा केली. व सामाजी बांदल यांस हरामखोरी केली म्हणोऊन सजा पावविला व वारणेची त्याची मिरासी देशमुखी दिवाणात अमानत केली. कमविशीस

तुळाजी कडू व खंडेराव पानसंबळ पाठविला. तो या १२ गांवास कथला करतो. तरी स्वामीनें आपलें पारिपत्य केलें पाहिजे. तरी तुळाजी कडू यासी कथला करावया गरज काय. रोखा देखत विळासीतर्फेचे गांव तुळाजीकडे देणें व त्याचें हाते कारभार घेणें.

शि. च. सा. १ ले. ६६ } (७३) { श. १६०४ आषाढ शु. ६
सु. १०८३ रजब ४ } { इ. १६८२ जून ३०

ता। निरथडी (पा। पुणें) ठाणे—मोकदम मौजे किकवी

शंकराजी नीळकंठराव यांचा इनाम कास रुके ८४॥ पडिक आहे. कीर्दीस उमेद धरली आहे. तरी लावणी दुमाले केलें असे. सुभाचें खुर्दखत सादर आहे. पेस्तर छत्रपती स्वामींचा हातरोखा आणितील तेणेंप्रमाणें विल्हे होईल.

शि. च. सा. ७ ले. ६३ } (७४) { श. १६०४ आषाढ शु. ११
सु. १०८३ रजब ९ } कौलनामा { इ. १६८२ जुलै ५

दिवाण सुभा विनायक उमाजी सुभेदार व कारकून सुभा पा। पुणा व महालानिहाय —महादाजी कमळाकर रबडे कुलकर्णी मौजे चिंचवड ता। हवेली पा। मजकूर

तुमचे बाबे देशमूख देशकुलकर्णी पा। मा।र मालूम केले कीं चिंचवडी मिरासीचा वाडा बापभावाबमेत होता. तेथें वाटणीनें आपलियास भोये बहुत थोडी येऊ लागली. म्हणऊन आपण कुनबावा सेत सवा १। खडी, वाडा ४९×६६ दिला. आबरांई नवी विहीर पाडून कराल त्यास दरें पेडास रुके ।॥· चोवीस, दर सदे पडलावणीस पेड ५ व दोाख दोणीं इ. चालवून धाक आदेशा न धरणें.

आठल्ये घ. इ. ले. ७ } (७५) { श. १६०४ श्रावण शु. ३
सु. १०८३ शाबान २ } { इ. १६८२ जुलै २७

देवळे ठाण्याचे अधिकारी—खोत, मोकदम व रयत तर्फ देवळे

आठल्ये यांचे उपाध्येपण गावगनाचे असता एकटा त्रिमलभटच भक्षीत असतो. तरी हरीभट यानें सुभा जाऊन सनद आणिली त्याप्रमाणें समस्त आठल्ये यांस हक दरगांवास लाहारी येक प्रमाणें आहे त्याप्रमाणें जारी करीत जाणें.

पे. फा. सा. १ ले. ५१ } (७६) { श. १६०४ भाद्र. शु ४
जुलूस २६ रमजान १ } { इ. १६८२ आगस्ट २५
हि. १०९३ } (शिक्केमोर्तब) {

परमेश्वराच्या व पैगंबराच्या कृपेनें नाहरखान गोरी याचा मुलगा जो

पारनेर परगण्याचा फौजदार आहे–अबुल करीम–ह्यानें पारनेर ( ज्या वेशीच्या डाव्या अंगाचा ) बुरुज बांधला.

शि. च. सा. २ ले. ३६९
सु. १०८३ रमजान ९ } (७७) { श. १६०४ भाद्र. शु. ११
इ. १६८२ सप्टें. २

नारो राम सुभेदार व कारकून —बकालानी देस तेरदळ व रायेबाग व महाकानिहाय सुभा ता। अजिरे पेठ हुकेरी व बाजे देहाय

कौलनामा येसा जे, सरकार अडगळ या विळायेतीमध्यें गांवगंना कितेक बैल आणून चारणीस घालीत होता. त्यास दरम्यान सा। मबकुरास बैल न पाठविता परभारा चारणीस घालीत आहा तेणे करून दिवाणचे हसिलास तट पाडिला म्हणून मालूम केले. तरी पेसजीप्रमाणें बैल कुल आवघेच पाठवणे आणि शिरस्तेप्रमाणें देत जाणे. याबरी या गोष्टीस दगावा काही येक लागणार नाही. खातिरजमा राखोन कुशहाल येत जाणे दरी बाब कौल.

शि. च. सा. २ ले. ३०५
धाक दुंदुभी } (७८) { श. १६०४ आश्वीन शु. ८
इ. १६८२ सप्टें. २९

गोसावी गंगाभारथी ( पूर्वील नाम —त्रिंबक नाईक वडाळकर व
केसाया नाईक  अनंत नाईक

अपुण गोसावि जालो असो. तुमच्या घरासी, द्रव्यासी, वित्तविषयासी तुम्हासी व आम्हासी अर्थाअर्थी समंध नाही. जर बोलो तर गुरुची दाही असे.

रा. खं. १५ ले. १४५
सु. १०८३ सवाल १५ } (७९) { श. १६०४ आश्वीन वद्य १
इ. १६८२ आक्टो. ७

—मोकदम मौजे ओझर्डे सा। हवेली ता। वाई.

तीर्थस्वरूप रा. अनंतागिरी गोसावी मठ श्रीसदानंद मु॥ निंब यास पेशजी तुम्ही काय देत होतेस ते काही दिवाणांतून नाहीं (तेव्हां) आताहि जे जसे देत असाल तसें देणें दुसरियानें फिर्यादी येऊं न देणें.

शि. च. सा. ७ ले. ६४
हि. १०९३ जिल्हेज ३
सु. १०८३ } (८०) { श. १६०४ मार्ग. शु. ४
इ. १६८२ नोवें. २३

सरकार फौज—

तुम्हे बाबे अमालानी हुजूर अरीजा लिहिला कीं, पटेल निपुत्रिक होता तो फौत जाला. बाबद कोण्ही पटेल नव्हता. कीर्दी माहमुरी जाहाली पाहिजे. येसियासी देसकुलकर्णी मबकुराने सदरहू पटेलगीस सिर्णी होनू १२५ कबूल

केले. पटेलगीचे मिरास दुबाला करून पटेलगीचे इनामतीस सेत, बाग व गदे शिा वकड व आयेपुके व आयेघात मोर बात व कठण व हारकाई, पसगी, पलगी, व पडद, बाजे हक कुलबाव कुलकानु बो भोगवटा साबिका मिरास पटेलगी मन्हामत केली. जमीन पडो नेदीता कीर्दी मामुरी करून सुखे असणें.

खं. १६ ले. २५ पृ. ४१ } (८१) { श. १६०४
मु. १०८३ } { इ. १६८२

विसाजी गोज प्रभु देश कुलकर्णी—राऊसाहेब देशमूख तर्फ तर्फ कानदखोरे कानदखोरे

इस्तकबिल बटाईपासून आपण चाकरीस गेलों. त्यावरी सु. १०८१ मिरासीस आलो. त्यावरी मागे तिमाजी व गदाजी तकसीमदार हृही देस-कुलकर्ण व गांवकुलकर्ण हकं उत्पन्न खादले. आपण आल्यावरी इहिदेचे साली दोणं चालवावयास साहेबाच्या मते कारभार सेवकाचे स्वाधीन केला. आपण आपला अगजोड असावा म्हणून आपला भाऊ (तर्फ चादवे) व विठोजी काका (मोसे खोरे) बोलाविले. केशोराम हवालदार व गदाजी प्रभू मुजुमदार ठाणे मजा विंझर येथें चाहुडीस साहेबा हुजूर दोही रमाल काकापुढें ठेविले. तुम्हास चालेल तो एक रमाल आपणा स्वाधीन करून घेणें. हृही दोही रमाल सेवकाचे स्वाधीन केले. इतक्यांत इसने तिमाजी प्रभूकडे लागले. साक मज-कूर सेवक साहेबास साक्ष करून गांवकुलकर्णे १६ व देसकुलकर्ण दोही काका स्वाधीन केली. विठोजी कथळा केला कीं, देश-कुलकर्णाचा मुशाहिरा १५३ पैकीं ५७ टके द्यावे.

श्रीसां. के. ४३ } (८२) { श. १६०३ पौष व. ९
दुर्मतीसंवत्सर पौष व. ९ } { इ. १६८२ डिसें.

[ ज्योतिर्गणितप्रमाणें ह्या वर्षी क्षय मास आहे व तो पौष आहे. करेजंत्री पहा ] समर्थांचा अंतकाळ प्रसंग सन्निध, म्हणोन संभाजीस त्यांनीं उपदेश केला.

कॉ. इ. सा. ले. ९७ पृ. १०९ } (८३) { श. १६०४
मु. सलास, दुंदुभी } { इ. १६८२

कानोजी काटकर— नारायण प्रभु सर देसाई प्रगणे कुडाळ

पूरवी आम्ही तुमचे तीर्थरूप तियापासून १०० होन घेतले, त्यास ते कैलासवासी जाहाले...इ.

आठल्ये घ. इ. ले. ६ } (८४) { श. १६०४
सु. १०८३ } { इ. १६८२

देवळे तप्याचे ठाणेदार दिवाण—मल्हार रंगनाथ पोतदार किले विशाळगड.

कौलनामा—मौजे सिपोसी तपे मार येथें मोहल व दाभोळच्या सीमेचे असे दोन परिये (ओढे) आहेत. तुम्ही मद्यागतीदार आहां. परिये मोडून सेत बांधणे. आम्ही, देसक, तेथें येऊन तेथील रयेत, मिरासी व गुरव, माहार ऐसे बोलावून हरदू जागे नजर गुजार करून पाहाता मोहलचा परिया गावचे नदीस मिळाला आहे तो मोडून उत्तरेस डोंगर आहे त्यांतून १४०० हात लांब; १८, १० हात रुंद; ५-७ हात खोल असे जमीन तोडून खणोन नदीसी मेळविला पाहिजे. माथा हाद व मूळ हाद ऐसे बहुत माटीचे काम दिसोन आले...

रा. खं. २० पृ. ७१,५० } (८५) { श. १६०४
फ. स. १०९२ } { इ. १६८२

दलेलखान बाहदूरखान आले यानी पडेगावी कोट बांधला. मुलूक वोस पाडिला ता स. १०९२ (पृ. ७१)

दक्षणचा सुभा नवाब खान बहादुर यांचा हरोल दलेलखान जाले. ते भिवरे अलिकडे बंदमवेसी करून मुलूक ताराज करूं लागले आणि पेडगांवी बहादुरगड बांधला (पृ. ५०)

रा. खं. १५ ले. १० पृ. ३४ } (८६) महजर { श. १६०४
सुा १०८३ } { इ. १६८२

संवाजी भिवजी चव्हाण पाटील मौजे कोणेगाऊ सुलतानजी पटेल जगदळे कसबे मसूर यानें महादजी सुलतानजी पटेल कसबे मसूर हे थोर नाईक यांस आपले शरीररक्षणार्थ आपले मिरासीपैकीं एक चावर खासगत ठेऊन उरेल जमीन चावर १।।। ठिकाणें ४ व वडीलपण होनु २० यास विकले पा मारचे देसक व बापमाऊ या विदमाने क्रयपत्र दिल्हें. व ठाणा राजमुद्रा साहेबसदर व देसक यांचा महजर महादाजीच्या, गावीचे बारा बलुते यांच्या संमतिनंतर केला. खासा रुद्राजीपंत देसकुलकर्णी यासी ·।।१४ ठिकाणे २ पहिलेच विकत दिल्हे ती त्यापासून मागोन घेतली व त्यास १ घोडा, सारंगा कि. होन १५० चा दिला. कागद रुद्राजीपंताच्या दस्तुरें अलाहिदा असे, कोनेर रंगनाथ सरसुभेदार यास हरकी १०० होन दोख, सरदोल ५० देशणीं २५ दिले खेरीज गावकरियास व परगणियाच्या पाटलास तभिका

दिल्हा. होन १०० संताजी चव्हाणकडे १ चावर राहिला तोहि ३० होन देऊन घेतला. खेरीज पोटखर्च जाहाला.

शि. च. सा. ७ ले. ६५ } (८७) { श. १६०४ पौष वद्य १४
सु. १०८३ मोहरम २७ } खंडणी कबूल कतबा { इ. १६८३ जाने. १६

हा बो मोकदमानी मौ. सेखापूर का नासरे पा माण. साहेबांचे बंदगीस केहून दिल्हा कबूल कतबा ऐसा जे, मौ. मारचा अहवाल खरीफ व रबीचे पेरणी जाहलेवरी मेहू पडिला नाही. जुजवी पीक जाहलें. त्यास तुर्फा लस्कर मोगलाई व संभाजी राजेचे घोडाराऊत फिरोन पीक गेले. रयत परमुलकास गेली. त्यावरी साहेबाचा कौल व रोटी घेऊन देसक येऊन गावावरी वस्ती करविली. कुलबी बांड राहिले. त्यास खंडणी केली दोनखत व मा व फाला कानूफाला गेरकानू व प्रभपटा व पायेपोसी व बेलकटी व सरखेली; गांवखर्च, मेहमानी, येगानी बलुते राणखा व वगाईत व मोव्हतर्फा व बाणी व वाणेबूड व राजिता बेगारी व अडपालीव मेठी ठाणे व हागदार व तंबाकू व पत्र फेणी, कुलबाब हसमकमखत येकूण खंडणी १७ कबूल असो.

सनदापत्रें पृ. १६२ ले. ३ } (८८) { श. १६०४ दुंदुभी माघ शु. ५
राजशक ११ रुधिरोद्गारी } { इ. १६८३ जाने. २२
सफर ४ इंदुवासर }

राजा शंभु छत्रपती—देशाधिकारी व देशलेखक प्रांत पुणें वर्तमान व भावी

श्रीदेवस्वामी वास्तव्य चिंचवड यांजकडे बागा व इनाम कारकीर्द निजामशहा व मलिकंबर व अदिलशहा व रा. महाराजसाहेब व के. स्वामी चालत आलें आहे. सबब श्रीस्वामी मौ मार पिढीदरपिढी राहोन अन्नछत्र, गरीबगुरीब व फकीरफकिराणा जो कोणी येतो त्यास अन्न उदक देत आहेत. याबद्दल गांव इनाम दिल्हा आहे. तेणे प्रो आम्हासहि चालवणें अगत्य आहे तरी तुम्ही सालाबादप्रमाणें चालवणें.

(ह्या पत्रावर जी राजशक व संवत्सरनाम व वार आणि मिती व मुसलमानी महिना दिली आहे ती मुळींच जमत नाहीं. राजशक ११ रुधिरोद्गारी दिला आहे. पण रक्ताक्षी येतो. ह्या वर्षात माघ शु. ५ स गुरुवार जंत्रींत येतो. आणि शिवाय मुसलमानी महिना रबीलौवल ३ हा येतो. तर हें सर्व विसंगत आहे. राजशक १० धरला तरी वार शुक्रवार येतो. म्हणून मुसलमानी महिना तारीख मराठी महिना वारमितीस जमतो तो शक संवत्सर धरून हा काल दिला आहे. रा. श. ९ येतो.)

शि. च. सा. २ ले. ३७२ } (८९) { श. १६०५ ज्येष्ठ शु. १
सु. १०८३ जखर २ }　　　{ इ. १६८३ मे १९

खान शर्जाखान—महानाड का पेठ अथणी.

मोगलाचे तहवेलीकरतां पेठ कसबे मजकूर जाळून फना होऊन खराब जाहाले. सदर पेठ जुजवी मामूर होत असतांना खेरतखान येऊन पेठ मारून खराब केले. यावर कावणी होत असता दुसरेने मोगलाचें तहवेली येऊन जे होते ते घर व मळगी जाळून खराब केले. याकरता ४ साले पेठ मार विसावणी नाहीसे जाले. सा माहानाडाचे दिलासाबद्दल ठाणा मुधोळासी आले. देसक व मिरासीदार यासी ७ साले कौल देणे. मिरे सुपारी दर गोणीसी मुठे २ लाभासी मुठे १ उगटासी मुठ १ व लवगा व पत्री जायेफल,गडच गुळखोबरे तांदुळ जिनसाना केणे जे धडेने जोका घेत होता तेची बा घेणे. जैन लोकानीं माहाजर प्रो चालावे. दिवाणात देबामध जो कोण वडीलपण करितासी त्यानेच जावे. जकायेती व आडाणी व बाजे कानू कदीमप्रमाणे घेणे नवी जिकीर करूं नये. उभामार्ग व आडमार्ग जकायती कदीमप्रमाणे घेऊं. आपुलेआपुले मधे झगडामांडण खुनखराब वगैरे कुल माफ. दरीवाल कौल. पानेचे नगासी जकाती होनु ८= यासी दिवाणासी होनु ८-। व हकदारास होन ८।. येकूण होन ८= येणेप्रमाणे घेऊं. याखेरीज येक पान दिवाण व हकदार घेणे निसबत नाही. पेठेमधे दुकानदारासी साविलवार घेऊ नये. गुन्हेगारासी सीर मारावे सिके जाहाले असेल तरी देव सांगून पाठविलीया सोडून देऊन. आबादानी करून सुखे असणे.

शि. च. सा. २ ले. ३७४ }　(९०)　{ श. १६०५ ज्येष्ठ शुद्ध १
सुा १०८३ जखर २ }　कौलनामा　{ इ. १६८३ मे १९

सर्जाखान—महानाड पेठ शर्जापूर कसबे तिरदळ.

कसबे पेठ अथणी असता दिलेलखानाचे तहवेली होऊन दौड केले. त्यातर्फे आम्ही होतो. अजीवास्ता तुम्ही पा तेरदाळाचे आश्रेयास आलेत ते अहवाल पा मारनिले कारकून हुजूर लिहिले की माहानाडाचे दिलासा करून पेठेचे रचणूक करावे. येसियासी सादेसी कौल पाठविले जे, उदमवेवसाव करून सुखे असणे. पेस्तर आम्ही ते तर्फेसी येऊन तमाम तह करून देऊन म्हणौन तरी माल मा ग्राहाबादे ये तर्फेसी आले ते धास्तीने तुम्ही जागा सोडून परागंदा जालेती हे अहवाल महमद सुबेदार येही लिहिले बराये मालुमती कौल सादर तुम्हासी केले. पा माचे व पेठेचे दस्तबारी बदल महमद सुबेदारास धणी करून जे काय ते कौल बोल देतील ते बाबे आम्हापासून फरक पडणार

नाही. समस्त माहानाडाचे मुदाबदल ठाणा मुधोळाशी येऊन दिलासा केले. सुबेदार, देसक, नाडगीर व हकदार याशी ११ साले कौल दिल्हे. गोणास जकाती (मीठ, सुपारी, म्हैस, बैल, तांबूळ, कापड, वैसक, छपाव, घास, कडबा, ककड, जायफल, लवंग, इत्यादि वस्तु आवरील कराची माहिती.) जैन कोक व हटगर वऱ्हाड केलिया व मयेत जालेया फळस ठेऊ नये. नवी जिकीर करू नये. दशावतार व बाजे खेल खेळावे. सालकेत देवरु येऊन वाचावे. पेठ मजकुरी सादिलवार करूं नये. पटणसेटी चिटी दुकानासी न लावणे. पेठ मारो कलागती केलिया देवास पाठवावे. दिवाण वाजीपुसी करूं नये. गुन्हेगार नफरासी सीर मारावे सिके जाले असेल तरी देवाने सागोन पाठविलेया सोडून देऊ हा कौल.

शि. च. सा. २ ले. ३७१ } (११) { श. १६०५ आषाढ वद्य ५
सु. १०८४ रजब १७ } (कौलनामा { इ. १६८३ जुलै ३

भगवंतराऊ सुमेदार व कारकून —सिवया मुछोडी व सा माहानाड
पा तेरदाळ पेठ शर्जापूर पा का मा

कौलनामा ऐसे, तुम्ही समस्त सालगुदस्ता शाहजादेचे तहवेली करतां समस्त माहानाड पेठ मा सोडून ठाणा मजकुरासी गेले. येसियासी साहेबी नजर इनायत करून ठाणा मा पावेतो जाऊन दिलासा करून पेठ मामूर करावी, म्हणोन इलतमेश केली. त्यावरून आम्ही, व देसक व नाडगोड, ठाणामासी येऊन माहानाडाचे मुदा काये म्हणोन विचारिले तुम्ही रा. जाखो-जीराजे कदम सुमेदार व कारकून ठाणामारचे विद्यमाने मुदा पेश केले त्याप्रमाणें कौल सादीर करावा म्हणून तपसीलवार साहेबासी लिहिले. साहे-बीहि कौल पाठविला. दिवाणीचे फर्मान, हजरत मदारुलमहामीचे व छत्रपतीचे कौल आणोनु देऊन, सर्व सरंजामी करून खातीरजमा राखावा. पेठ आबाद करावी. कौल प्रमाणें हकजवार पा मा देसक, नाडगीर, पटेल, कसबा-व देश–कुळकर्णी व बारा बलुते याचे निशाणानसी महाजरहि देऊ. विरत-मठास पाऊ प्यावर दर सवाद का मारपैकी दिल्हे. याप्रमाणें खुर्देखत आणून देऊ. हली मिसल दिल्हे. पेठ मारचे जे काय वस्तमाऊ व पैके गोपाळराऊ निा राजेसाहेब घेतले असेल व नेले असेल ते तमाम आणून देऊन. तंबाखू दर नगास ८= होन देणे, येक लावणी जकात देणे, फरोख्त जालिया त्या पासून घेणे माल घण्यापासून येक लावणीचे देणे. पेठ मारापासून परपेठेस नग घातलेया जकायती घेणार नाही. येक लावणीच देणे, तंबाखूजलीजचे दर नगास ८– देणे.

शि. च. सा. २. ले. ३७५ } (१२) { श. १६०५ आषाढ वद्य २
सु. १०८४ रजब १७ } { इ. १६८३ जुलै ३

यादपा जखापा देसाई पा तेरदल --सिवपा मुचकी व समस्त माहानाड पेठ शर्जापूर पा तेरदल.

साकगुदस्ता मोगलाचे तहवेली करता पेठ मार सोडून परागदा होऊन ठाणे मुधविलेसी गेले. समस्त देवाचे दिलासे बदल माहाराज रा प्रभू देवक पेठ मामूर करणें म्हणून हुकूम केले. ठाणाचे सुबेदार भगवतराऊ माधवराव विदमाने तपसील हाल कौल आणून देऊ म्हणून नेम करून ते बरहुकूम हजरत किबलगाह साहेबी दिवाणफर्मान, हुकुमतपन्हाचे कौल पाठविले. ठाण मजकूर थल विदमानें तमाम कौल दिल्हे. आम्ही समस्त मिरासीदारान कौल मा राहाटी चालून घेऊ. कोणाविसी अनमान न करता पेठ मा मामूर करून सुखे असणे. तमाम नाडगिराचे निधानानसी माहजर करून देऊ.

शि. च. सा. ४ ले. ७३७ } (१३) { श. १६०५ श्रावण शु. ११
सु. १०८३ साबान ९ } { इ. १६८३ जुलै २४

जावता मोईन. मोहनीबाबा, पेठ पाटगाऊ सुभा पो कुडाल. बा सनद मोईन, छत्र० शक ९ दुंदुभी भाद्र. व. १३ भोमवासर सालिना मोईन पाद. ४०० दर १। गेकून नियाणी होन ५०० ( नित्यपूजा, नैवेद्य, निमित्य-पूजा श्रावण सुध अष्टमी समाधितीथपूजा, येकादसनी, सहस्र भोजन, वस्त्रे, क्षीरापती, रात्रीपूजा, नेजदार=नेजा ( भाला ) दार; लिहिणार ब्राह्मण, कोठ-वळा, पुराणीक इ. ची नेमणूक ) पूजा करून श्रीपासी कल्याण इच्छिणें.

शि. च. सा. २ ले. ३७६ } (१४) { श. १६०५ श्रावण वद्य ७
सु. (१०८)४ साबान २० } { इ. १६८३ आगष्ट ४

साबाजी राजे घांटीगे—शिवपा मुचोली व समस्त माहानाड पेठ अथणी हली मुा तेरदल

मालोजी पोळ येही लिहिले व कृष्णाजी कमलाकर तुम्हापासी पाठविले होते त्यानी लेहून पाठविले त्यावरून समाधान जाले. तरी पूर्वीपासून पेठेचा अभिमान तुम्ही धरिला आहे. आम्हांसही भरंवसा तुमचाच आहे. साहेतेस कौल, हावरोला, पत्र पाठऊन देतो. व रा. सबाजी राजे याचाहि कागद पेठेचे मामुरी करिता आंणावया पत्रे रवाना केली आहेत. तेही येतील. पेठेवरी मार्ग पडोन आबा दानी केली पाहिजे. येणेकरून तुमचा नामोश आहे. कदीम जागा तुमचा आहे.

शि. च. सा. खं. ९ ले. ५९ } (९५) { श. १६०५ श्रावण वद्य १०
सु. १०८४ साबान २८ } { इ. १६८३ आगष्ट १२

केसो त्रिमल—बाबाजी महादेऊ देशकुळकर्णी वेऊळ.

पत्रदर्शनी स्वार होऊन आम्हापासी आपले माहालीची दस्त व समजा-विसीचे कागद घेऊन येणें.

रा. खं. १८ ले. ५७ } (९६) { श. १६०५ आश्वीन वद्य २
रा. श. १० रुधिरोद्गारी } { इ. १६८३ सप्टं. २७
सु. १०८४ सवाल १५ }

दुतसेटी सेटिया याचे नावें हिरोजी इंदुलकर याचे फर्ज मा बाकी वादत आहे. त्या पैा कोंडाजी दामोदर सबनीस विा फुटनाईक यास बदल मुशाहिराचे ऐवजी होन पा. १७ देविले. आदा करून जाब घेणे.

शि. च. सा. २ ले. १३७ } (९७) { श. १६०५ आश्वीन वद्य ७
सु. १०८४ सवाल २० } { इ. १६८३ आक्टो. २

अंताजी गोविंद हवालदार व कारकून काा सासवड } कृष्णाजी, गोविंद अजहत सबनिसी व चिटनिसी विा राजश्री पंताजीपंत

तुम्हास मुशारा पावला नाही म्हणून रुसवा करून घरास गेला आहां. येथें दिवाणकाम टाकून न पुसता घरास गेलेस. आम्ही माहालास येऊन ३।४ महिने जाले भेटीस येत नाहीत. तरी पहिलेपासून तुम्ही सबनिसीचे कामकाज करीत आले. आतां आम्ही आलो म्हणून घरीं राहिले आहां. तरी ऐसे न करणे. देखत कागद भेटीस येणे. मुशारा राहिला असेल तोहि विल्हे करून देऊन. तुमचेविशई रा. पंताजीपंत याणी लिा आहे. याकरता तुमचें चाल-वणे आगत्य आहे. तर लौकर येणे.

शि. च. सा. २ ले. ६७ } (९८) { श. १६०५ कार्तीक शु. ७
सु. १०८४ जिलकाद ५ } { इ. १६८३ आक्टो. १६

नीळकंठ मोरेश्वर प्रधान—बाजी घोळप हवालदार व कारकून किले पुरंदर.

तांह्मापासून किला घेतला ( श. १५९१ फा. व. १२ ) ते पासून वे. विश्वनाथभट व सखंभट ठकार यांस किल्यावरील ताशाची सेवां निळो सोनदेव यांनीं सांगितली. त्याउपरी किले मजकुरीचे मिरासीदार जोतिषी शिवभट व नारायणभट पुरंदरे ताशाची सेवा आपणच करूं म्हणू लागले. पण ते निळोपंतांनीं अमान्य केलें. पुढें कै. ( शिवाजी राजे ) किलियास आल्यावर त्यांनीं ठकारांकडील तास मना केला. पण पुरंदरे यांस

ताशाची सनद दिली नाहीं. पुनः भेटावें तों शिवाजी राजे कर्नाटकांत गेले. नंतर पुनः रायगडी जावे तों घडलें नाहीं. पुढें १६०१ मध्यें जाल्हनापूरप्रांते गेले व उपरी सवेच कै. केला. पण पुरंदर सारखा सरहद्दीवरील नामोशाचा किला तेथें तास पाहिजेच. वृत्तिवंताचें संस्थापन करणे हें स्वामीसही अगत्य. म्हणून पुरंदरे यांस ५० पातशाही होन सेरणी, देखील सरदेशमुखी, घेऊन ताशाची सेवा सांगितली. उभयतां पुरंद्ऱ्यास १५।१५ अशा ३० लारी देण्याचा करार. सुरनिसी वजावाटा करून उरले वेतन दरबार रवेसीप्रो देणें. सेरणी यंदा होन १० व बाकीचे ४० दरसाल ८ प्रो भटमजकुराचे हकी वजा करणे. सिंहगडाप्रमाणें दररोज तेल देत जाणे.—(ह्या पत्राची शेवटी दिलेली ता. ५ पण पत्राचे मजकुरांत आली आहे. ता. ७ ).

रा. खं. १८ ले. २५ } (९९) { श. १६०५ कार्तीक शु.१०
सु. १०८४ जिलकाद ८ } { इ. १६८३ आक्टो. १९

केसो त्रिमल—विनायक उमाजी सुबेदार व कारकून सुभा प्रा पुणे.

पा मा।रचे देशकुलकर्णी हुजूर येऊन विनंती केली देशमुखास व देशकुलकर्णीयास पेशजी रा. दादाजी कोंडदेऊ सुभेदार यीही इनामती खंडणी दर सालास दिधली होनु पातशाही ४०० देशमुख ३०५ व देश-कुलकर्णी होनु ९५ एकूण ४०० होनु खंडणीचा तह दिधला. त्याप्रमाणें गलबलिया आधी उसूल होत आला आहे. हाली १०।५ साले गलबला जाला आहे. माहाल खराब पडलां. जुलबी गाऊ वसाहत थोडे बहुत आहेत. त्यास आपणास व देशमुखास हकाचे दस्त बहुत थोडे होते. त्यास दस्त माफीक देशमुखास व आपणास पोटास देऊनु वरकड दिवाणात घेत आहेत. एणेकरून आपला अवकात चालत नाही. स्वामीची सेवा करावी लागत आहे. त्याहीमधें आपण वृतिवंत आहो. सेवा एकनिष्ठपणे करीत आहो. तरी जे वेळेस सारा परगणा कीर्दी होत होता. तेव्हांचा तह ४०० होन खंडणीचा. हाली परगणा खराब, वसाहती जुलबी, आपणासहि हक उसूल होत नाही. तरी दस्तरकम-प्रमाणे होते त्या हिसेबे चौ शा होनाची तकसीम बसेल ते देशमुखापासूनु व आपणापासूनु जे तकसीम ते घेतलियाने आपलाहि अवकात चालेल. स्वामि-सेवेस वृतिसंमंधे एकनिष्ठ सेवा करून म्हणून देशकुलकर्णियानी विनंति केली. ऐसियास हाली यांचा इनामती खंडणीचा तह केला. ऐन दस्त साल व साल होईल त्यास दस्तमाफीक चौ शां होनाची बेरीज दस्तांप्रमाणें बसेल ते यापासूनु घेत जाणे. हाली दस्तहि कमी आहे. ऐणेप्रो तह केला आहे. विसेष तोसीस न देणे. एविसी रा. कै. व रा. पंत वैकुंठवासी यांचीहि पत्रे माहालीच्या कारकुनास आहेती.

शि. च. सा. १ ले. ६८ } (१००) { श. १६०५ कार्तीक शु. ११
सु. १०८४ जिलकाद १० } { इ. १६८३ आक्टो. २१

नीलकंठ मोरेश्वर प्रधान—नागोजी बलाळ सुभेदार व कारकून सुमा प्रा माहालानिहाय प्रा इंदापूर व सुपे.

'ले. ६५ प्रो.' तिघांची पाटिलकी सुपे खुर्द येथील. तरी तशीच चालवणें. शंकराजी नीलकंठराऊ व हाऊजी धणगर यासी जगथाप नसता कथला करावयास समंध नाहीं. (मागील क्र. ४५ पहा)

रा. खं. १५ ले. १४६ } (१०१) { श. १६०५ कार्तीक वद्य १४
सु. १०८४ जिलकाद २७ } { इ. १६८३ नोवें ७

—मोकदम मौजे कविठे सा हवेली पा वाई

श्रीसदानंदाचा (मठ मौजे निंब) इनाम मौ मारी आहे. साल गुदस्ता चालिले आहे तेणेप्रमाणें चालवणें,-एक जरा उजूर न करणें.

इ. वृ. १८३३ पृ. ५५ } (१०२) { श. १६०५ मार्ग. शु. ७
व ,, १८३४ पृ. १५६ } { इ. १६८३ नोवें. १५

शिवराम (कल्याणि) एकनाथस्वामीच्या मुलीचा मुलगा—यानें गीताचंद्रिका मराठी केली.दीनदत्तपदांकितमुकुंद कवी काव्य करूं लागले.

शि. च. सा. २ ले. ३७८ } (१०३) { श. १६०५ मार्ग. शु. ८
सु. १०८४ जिल्हेज ७ } { इ. १६८३ नवं. १६

सर्जाखान—सिधापा सुभेदी व जिवाजी सोमाजी व समस्त माहानाड पेठ शर्जापूर मो पा तेरदल

तुम्ही पा मार पेठ शर्जापूर वसात केले म्हणऊन तुम्हांवरी मेहेरबानी नजर करून हुजूर बोलावून तुम्हास मुधोलाचे ठाणा इपतीदेपासून कौल मन्हामत केले. हालीही कौल दिल्हे. पेठ मा व मार्गानिहये पुंड व पाळेगार व असपाद लोकाचे तसवीस लागितील तरी त्यासी सजा दिल्हे जाईल. पेठा मारासी संभाजी राजेचे तसवीस लागो देणार नाहीं.

शि. च. सा. २ ले. ३७९ } (१०४) { श. १६०५ मार्ग. शु. ८
सु. १०८४ जिल्हेज ७ } { इ. १६८३ नवं. १६

सर्जाखान—सिधपा सुभेदी व जिवाजी सोमाजी (ले. ३७८ प्रो) पेठ व का अथणीहून मोगलाचे तहवेलीकरता तेरदाळास आला. तेव्हां

सिवराऊ सुभेदारास कौल देऊन पाठविलें कीं पेठ वसत करणे. तुम्ही पेठ सर्जापूर वसात करून, मळगिया बाधोन, मामूर केले. सालगुदस्ता शाहजादेचे लष्करीकरता पेठमार सोडून मुधोळास गेले. तेथेंहि पेठेबद्दल विचारले व तुम्ही सांगितलेबरहुकूम मुधोळथळ मार्फतीनें कौल दिल्हा. तरी आबादानी करून सुखी असणे. रयेबराबरी फारफेर होऊं देणार नाहीं. जैनानी नवी जिकीर करणे निसबत नाहीं.

शि. च. सा. २ के. ३८० } (१०५) { श. १६०५ पौष वद्य १
सु. १०८४ मोहरम १५ } { इ. १६८३ डिसें. २४

कर्जफतवा

आदिसेटी सेटीकर पेटा जोहरापूर—खंडोबा नाईक गो

पा तेरदाळचे महानाडसी होन २८०० सर्जाखानाशी आपण धणी होऊन महानाडसी साडिले असता महानाड पा मानी. बदरहू पैकमचे होन २११६८० निरवेष करून दिल्हे. बाकी होन ४६४ राहिले. ते करता खाने-साहेबानें तागाद लाविल. त्यासाठीं तुम्हापासून ते घेतले. त्यासी कलतर ५ प्रमाणें असे. मुा षादर्सा. चांदचे मुदतीसी नेऊ तरी पुढील चाद माहसी सवाफी घालून देऊ. यासी कही उजूर नाही.

शि. च. सा. ३ ले. ६४१ व } (१०६) { श. १६०५
५ के. ८२९ फ. १०९३ } { इ. १६८३

पा मनकुरीची देशमुखी देवकर याची पिढी दरपिढी असता सभाजी बल्द संभाजी भोसले-शिवाजीमहाराजांचा पुतण्या-यास विजापूर तर्फेनें जागीर होती. तेव्हां त्यानी देशमुखावरी धामधूम करून जोरावरीने देशखी घेतली. देशमुखास मारून बाहीर घातले. व जागीर होती तोवरी देशमुखी चालवली. त्यावरी पातशाही जाल्यावर पा मास जे जाहागीरदार आलें त्यानीं तनखियांत देशखी खात आले. पुढे सन माराकारणे जागीरदार हामीदुल्ला-खान जहागीरदार आले. त्यासी हुकूम आणिला कीं, देसमुखाचे मुलास वतन देणे. मग देशाडे, मोकदम, हाळीमवाली बोलावून हकीकत मनास आणून कदीम देशखाचे देशखी देणें. हा महजर.

रा. खं. २० पृ. ५० } (१०७) { श. १६०५
फ. १०९३ } { इ. १६८३

हजरत जिलसुभानी बदौलत दक्षणेस आले. तेथून (सुपा) ठाणे कसे मजकूर मानुरखान आले. ठाणे कायेम करून रसूलखान मयाणी यास ठेऊन गेले सन १०९३. याउपेरी फिरोजा रोजा हजरत बादशाहा तुळापुरास

आले ते समई जुलपुकारखान रायरी फते करून राजभीस बराबर घेऊन आले, हे समई कुलपरगणाचे जमीदार हुजूर तलब केले की तमाम मुलूक आबाद होए म्हणोन मुचलके लेहोन घेतले, म्हणोन तलबा केल्या. तेसमई...कुल मुक्कास सिरपाव देऊन कौल घेतला. तो महादाजी यमाजी वोकील दिवाणचे कचेरीस उभा राहिला कीं, सुपाचे देशपांडेपण आपले आहे.. लस्करहि कूच जाले विज्यापुरास चालिले. तों मेहेरचंद पेशदस्त दक्षण कचेरीचा त्यास खबर कळली कीं, देसपांडिया हमराही मधेच आहे असणू परगणियांत गेला नाहीं. मग चोपदार महसल लाविले आणि लस्करातून प्यार फोदी काढिले की परगण्यास जाऊन आबाद करणे.

शि. च. सा. २ ले. २७७ } (१०८) { श. १६०५ इ. १६८३

साबाजी राजे घाटगे-सिवसेटी मुचडी व समस्त महानाड.

अथणीचे पेठ मामूर करावी ऐसे आम्हासी गोसावी बहुत ( सांगितले अस)तां साप्रत दिपवाळी कारणें विवेक करू ऐसे बोलिला होता, तरी कोणेविसी आतां दिरंगावरी न घालतां दिपवाली कारणे दुकान मुस्तैद होऊन साऊकार सेटीकार येऊन आपला उदीम वेवसाव करीत येसे केले पाहिजे. येणेकरून तुमचे वचन सत्य होईल. आम्ही तो श्रीमहादेव भक्त अहों. जे तुम्हासी शफत पूर्वक बोलिलेस अतर पडणार नाहीं. तुम्हास खान अजमाचे पत्र प्रमान तरी पाठऊन देऊं. येथील वर्तमान राजकी येक प्रकार जाहाले आहे. ते परस्परे राऊ-जासहि श्रुत आहे. थोडियाच दिवसामधे पत्र पाठउनू देउनू.

शि. च. सा. २ ले. ३७३ } (१०९) { श. १६०५ इ. १६८३

सिदगौड भूपती देसाई वा पाटेल का अथणी } — सिवण मुछेडी वा समस्त माहानाड पेठ का अथणी मा। परगण तेरदाल

मोगलाचे गलबलेकरता तुम्ही वा समस्त देव आवघे मिलून पा मासी गेलेवरी हजरत खैरतखान सिद्दी यास मोकासा अर्जानी जाला, त्यावरी चेनपा हजरतसाहेबाचे भेटीस गेले. आपण पेठ मामूर करतो मुदे घातले, की सुपारी वा मिरे लामा वा उगट यासी येक गोणीस ८। येक उगट मुठीने देता जातो. आतां तेरदालमधे ते जाभउभट दोनी मुठीने घेऊ देऊ सालाबाद-प्रमाणे म्हणतात. ऐसियासी साहेबाने आपणावरी ८। येक पाऊ जोखून देवे सरिखे खुर्दखत करून दिल्हेया आपण जाऊन पेठ बिलाकुसूर मामूर करू देऊ म्हणून आम्हीप रमारे आइकलो. हे वर्तमान तुम्ही आइकिले असाला तरी

गोसावीयाने त्या गोष्टीवरी ना आणे. सालाबाद जधी पेठ जाहले तधीपासून लाभ वा उगट दोनी मुठीने देतघेत आहेती. तेथेची पेठेचे २वेश आहे. नवे जिकीर सोदीमधे बेसून मूठमार्दीनें चालून घेतले. आतांहि माछमाती करून खुर्दखत करून घेतले त्या गोष्टीवरी गोसावीयानें ना जाता सालाबाद जैसे दोनी मुठीने लाभ वा उगठ देतघेत आहेती तैसेच पुढेहि सालबाद चालेल. चालून घेणार आम्ही असो, दरमेने आम्हा वितरक्त नवे जाकीर केले होते चालू पाहतो की काय हे गोस्टी सर्वथा चालणार नाही. तुम्ही समस्त देशाचे समाधान करणे. यासी आम्ही चुकलेया श्रीसिद्धेश्वरदेवस्वामी साक्ष असो. सालाबादप्रमाणे दोनी मुठीने लाभ वा उगट जैसे चालिले आहे तैसे चालू.

शि. च. सा. लें. ३८४ } ( ११० ) { श. १६०५–०६ इ. १६८३–८४

अदिसेटी सेटिकार पेठ जोहरापूर-सिवमा मुचेडी वा जिवाजी सोमाजी वा समस्त माहानाड प्रा तेरदाळ.

पैकेसी गहुत दिरंग लावले. येथें खानसाहेबानें पैके आले काबून सरगिर्दीने करताती येस तरी होऊ नये. आतां गोसाव्यानें २८०० होन···पैकी ३५४ त्या वेगळ येथें रा रंगोपापंताचे १ शे, पैकीं होनु ५० योहूनमध्यें दिल्हे. वा खोजगिरी माहकदार बरोबर होन २६ वा रसद फेरमुबादल करून हुजूर पावन करिताना तुटी होन ३४ एकूण ४६४ इतक्यासी खानसाहेबाने बहुत तगादा काविल ते ( ले. १८० प्रो ) दिल्हे, त्या पैके बदल सोदागराने तातड लाविली. तेवदल तुम्हांजवळ पाचाडसेटीसी पाठविले. सदरहू पैके कळतर सहीत व रंगोपंताचे पैकीं ५० पाठविले पाहिजे. सोदागरचे पैकसी आम्ही चांदसी नाहीं दिल्हे म्हणजे सवाकी वर निसबतने होईल ते देऊ. चांद दोन दिवस असतां पाठऊनु दीजे. बळसेटीवरी होनु १०॥ ची हुंडी रोखा करून पाठविले ते पैके आम्हासी पावले नाही. मलिकभाईसी मासला होन १॥ देविले.

शि. च. सा. खं. ८ ले. ४६
पोर्तु. मराठा पृ. ७५
सु. १०८४ मोहरम २४ } ( १११ ) { श. १६०५ पौष वद्य ११ इ. १६८४ जाने. २

कविकलश—धर्माजी नागनाथ सरसुदेवार व कारकून सुभा प्रा फोंडे.

हजरत पीर अबदुलाखान कोट फोंडा, बहुत जागृत स्थळ. फिरंगियांनी गनिमाई करून कोटास वेढा घातला, कोट बहुत जेर केला, तेव्हां कोट मख- कूरच्या हवालदार, सर नोबत, सबनिवीस, नाइकवाडी, लोकीं प्रार्थना केली

कीं, गनिमाचा पराभव करणे. रा. छत्र. स्वामी विनंती करून ऊर्जा घाके-वारकी पोख्ती सरंजाम करून घेऊन. रा. स्वामीची फत्तेबाजी होऊं देणे म्हणोन नियत केला. त्यावरी रा. स्वामीचे स्वारी कोट मजकुरी होउनु फिरंगी गनीम मारून काढडले. रा. स्वामी जये आले फते जाहाली. ऐसी पिराची करामती. म्हणौनु तुम्ही व कोटकरी यांही छत्र. स्वामीस विनंती केली. त्यावरून नियत केला धर्मादाये देखिला. दर साल नव होन ५० रास ऊदफूल दिवा देखिल उरूस येकून नव होन २६ मुा मुजावर नफर सालिना होन नव २४ येणे प्रो सुबे मजकुरी ऐवज देविला.

सनदापत्रें पृ. १६१ } (११२) { श. १६०५ पौष वहुल १२
राजवाडे १० रुधिरोद्गारी } { इ. १६८४ जाने. ३ गुरु.

राजा शंभुछत्रपती—विठल शंकर देशाधिकारी प्रांत जावली

दत्ताजी केशवजी पिसाळ देशमूख तर्फ जोरखोरे यांसी के. स्वामींनी हकवतन करून दिल्हे आहे. त्याप्रमाणें मोईन चाकत आले. हली कुसूर होतो. तरी हे दिवसांत गनीम कोकणांत पैसाक. या प्रसंगें हशमाचा जमाव करावया देशमूख मानिल्हेस आज्ञा केली असे व पुढें कितेक काम याचे हातून घेणें असतां उगेच माणूस दिलगीर करावे आणि स्वामीकार्याचा नाश करावा हे कोण कारकुनी. हे गोष्टीनें स्वामीचा तरी फायदा? तरी कोठी इतकी गोष्ट नाही. ऐसे असतां असे करावया गरज काय? याउपरी देशमुख तरी रंजीस न करणें. त्यांचा हक साबाबादप्रमाणें चालवणें. कसूर काहीइतकी न करणें. पुढें बोभाट आल्यास स्वामी तुमची भीड धरणार नाहींत हें नेमस्त समजणें लेखनालंकार.

शि. च. सा. २ व ५ }
ले. २७१ व ले. ९४४ } (११३) { श. १६०५ पौष वा १२
रा. ख. १० रुधिरोद्गारी } { इ. १६८४ जाने, ३ गुरु.

शंभु छत्रपती स्वामी—देशमुखानी प्रांत वाई

सुलतान मांजम व शाबदीखान गनीम दोहीकडून कोकणात उतरला, याप्रसंगे हशमांचे बहुत प्रयोजन आहे. करितां रा. संताजी यमाजी सरगिरा + यांला नोंदचणी हशमाचा जमाव करावयाबद्दक बरघाट प्रांते पाठविले असे. ते सांगतील तेणेंप्रमाणे नोंदचणी करून पाठऊन देणे. हे काम बहुत नाजूक आहे; याप्रसंगी जरी हशमाचा पोख्त जमाव जाला तरी गनिमाचा काय गुमान लागला. बुडविलाच जातो. जमाव पाठविणें. स्वामी संतोषी होतील. माजीवरी स्वामीने तुमचे चालविले ते सार्थक या दिवसांत करून आपला मुजरा करून घेणें. तलाश तरतूद करून हशम पाठवून देणे.

श्रीसं. ले. ५५, ५६ } (११४) { श. १६०५ माघ शु. १
रुधिरोद्गारी इंदुवासर } { इ. १६८४ जाने ७

रघुनाथभट्ट नवहस्त—भैरवभट्ट महाबळेश्वरकर जामात व श्री संप्रदाई उपासक भक्तराव.

श्रीरामदासस्वामींनी दया करून श्रीरघुनाथ चाफळ येथील उपाध्यपण व पुराण ऐशा दोन्ही वृत्ती आपणांस दिल्हा. कन्यादानसमयींच्या संकल्पाप्रमाणें सांप्रत महायात्रेस आलेसमई या दोन्ही वृत्ति तुम्हास दिल्या. त्यास इनाम खिळाशी अर्धेबाबर व वर्षासन याखेरीज व राजपत्रेहि तुमचे स्वाधीन केली असत. हे दानपत्र श्रीचे माहात्म्यस्थळीं महापुरुष भलेभले. श्रीचे सांप्रदाई यांच्या विद्यमाने वंशपरंपरा दिल्हे.

शि. च. सा. २ ले. ११० } (११५) { श. १६०५ माघ शु. ७
सु. १०८४ सफर ६ } { इ. १६८४ जाने. १४

अबुल मुजाफर भदि०—भानजी देसाई पा कुडाळ

सुहूरसन सलास समानीन अलफ. हजरत शाहापनाह मूर्तजाखान गुदराणिले. तेवरून कौल हुमायून वुज सादीर फर्मादिलें असे. तुवा हे कौलनामावरून आपुले जातीर करार करून असणे वा मोकासाई याचे हक मोकासाईयासी वा रयेताचे हक रयेतासी पावणे वा हलालखोरी करून विलायेती पा मार मामूर वा आबादन करून वा कोणे बाबे कांहीं अंदेशा न करणे.

शि. च. सा. २ ले. १६९ } (११६) { श. १६०५ माघ शु. १४
सु. १०८४ सफर १३ } { इ. १६८४ जाने. २१

विनायक समाजी सुभेदार व कारकून प्रा पुणें. —जिवाजी नारायण हवालदार व कारकून ता करेपठार

रा. महादाजी गोसावी सेकीन मोरेश्वर याचा इनाम मौजे मजकुरी आहे. जिराईत हिवरटिके कास टके ८३॥ बागाईत पादरी देविका नजिक विघे ८६. साबाबाद तुमाजे चालत आहे. सालमजकूरी कीर्दी करितील म्हणून म्हणतावी. तरी यावत् आले आहे तियाप्रो साल मारी चालवणें.

शि. च. सा. ९ ले. ६० } (११७) { श. १६०५ माघ वद्य १४
राज्य. १० रुधिरोद्गारी } { इ. १६८४ फेब्रु. ५ भोम-
सफर २८ } { वासर

—चिमणाजी आऊजी

गनीम हबसी व फिरंगी यांनी कुदे, व (दा) पोळी व सिद्धकोळी—मामले चेऊल ही ३ गांवें मारून नेले. ते समयीं रयतीचा गला कूक छुटून नेला.

याकरतां रयत दिलगीर व परागंदा होऊं पाहते... चेऊळच्या हवालदारें हुजुर लिहिले. तरी तुम्ही मनास आणणें व हुजूर लिहिणे. लिहाल त्या प्रो त्याची विल्हे होईल. दादाजी कुलकर्णी याचे सेतचा गला मौजे कारले येथें होता तो सारास राजभाग प्रजभाग कुल घेऊन खर्च केला. म्हणोन दादाजीनें सांगितले. तरी राजभाग वजा देऊन प्रजभाग तितका दादाजीस परतोन देणें.

| | | |
|---|---|---|
| रा. सं. १६ ले. ४८<br>सुहूर २७ सफर २९ | ( ११८ ) | श. १६०५ फाल्गुन शु. १<br>इ. १६८४ फेब्रु. ६ |

( मोगल वरिष्ठ अधिकारी ) अमानतखान—परगणे नायनगाव सुभा वऱ्हाड येथील देशमूख, देशपांडे, मुकादम व इतर लोक.

हा परगणा आता भगवंत सिंग याच्या ऐवजी राजरूप वलद सयाजी भोसले याजकडे जहागीर दिला आहे. तरी त्या प्रांताचा कर त्यांजकडे द्यावा व त्याचे अधिकारीयांस त्यासाठीं नेमिलें आहे. ते तेथील प्रजा शेतींत गढून गेलेली व वसूल नियमित देणारी अशी ठेवावी. ४ क. २७ इ. रु. वसूल. त्यांचे वकिलाकडून २०० रु. घेऊन मुचलका घ्यावा व हुद्दा द्यावा.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ९ ले. ६१<br>सु. १०८४ रवल ५ | ( ११९ ) | श. १६०५ फाल्गुन शु. ६<br>इ. १६८४ फेब्रु. ११ |

दादाजी महादेऊ देसाई व —सुभेदार व कारकून सुभाप्रांत चेऊल देसकुलकर्णी मामले चेऊळ

माजी सुभेदार राघो विश्वनाथ व आपणामधे वर आकसी पडली होती. आपण चिमणाजी आउजी बराबरी माहागडीचे मुकामी गेलो. मामले चेऊळचे वर्तमान साकल्य विदित करून मामला करून द्यावा या निमित गेलो म्हणौन सुभेदार मशारनिल्हेने मागे आपले घर कैद करून आपले नगनगोटी वस्तभाव आणिली. हाली आपण स्वामीजवली वर्तमान विदित केले. राजश्री पंत कृपावंत होउन राजाज्ञा पत्र स्वामीस दिधले. कीं नगनगोटी देवणें. पैकी कितेक खर्च टेहू दिधले. ते स्वामीहीच वर्णून दिधले. त्यावरून वस्तभाव आणिली सुभा होती. ते देविले तिचपसील कठमाला, कारी, गळाण नस्त.

| | | |
|---|---|---|
| शीवां. ले. ५७, ५८<br>राब १० वधिठेद्वारी | ( १२० ) | श. १६०५ फाल्गुन वद्य ६<br>इ. १६८४ फेब्रु. २६ भौमवासर |

राजा शंभु छत्रपती—बेंकाजी रुद्र मुख्य देशाधिकारी प्रांत कऱ्हाड.

—अंबाजी मोरदेऊ प्रांत सातारा

श्रीदासनिर्मितस्थान श्रीरघुनाथ प्रा॰ चाफळ येथील प्रतिवर्षीच्या रामनवमी-यात्रा-समारंभास आऊन कुसूरकयला करू न देणे.

—श्रीदेवास का॰ चाफळ येथील इनाम सुमे मजकुरी आहे ते के. स्वामीसनदेने चालत आहे. त्याची विल्हे वे. दिवाकर गोसावीयाच्या विद्यमाने चालो देणें.

सा. सं. इ. ले. ११ } ( १२१ ) { श. १६०६ वैशाख शु. ३
सु. १०८४ जवल १ } { इ. १६८४ एप्रिल ७

कविकलश--भानजी गोपाळ सुभेदार व कारकून पा॰ कुडाळ.

पाटगांवीचे मुकामी जिवाजी राम चिटनिवीस विनंती केली कीं, आपला वडील पितांबर शेणवी यास अदिलशाहाचे कारकीर्दीस चिटनिसीबदल होन निशाणी ४४ व हरकारगिरीबदल ३६ एकूण ८० आणि इनाम वाडी व रावजें मौजे नेरूर व वाडी हुबरमळा मौजे अणव व कुलकर्ण माहाल जकात देखील बंदर वेंगुर्ले यास मुशहिरा तैनात सालास दर सदे होन १ व विस्वा हरीबलस केर्णे १ चरीस दर गोणीस १ रुका चालत आहे. ते हली साहेबास मुलूक मर्जानी जाला. पूर्वीची के. स्वामीचे वेळची सनद ४०० ची होती ( शक १५९१ श्रावण शु. २=१६६९ जुलै २० विद्यमान बाबाजी पुंडे ). पुढें पितांबर शेणवीचे जागी आपण चिटणिसीचे चाकरीस राहिलों त्यास वतन ५ होनाचा तह जाला. येणे करून अवकात चालत नाहीं. पहिले पालखी चालत होती तेहि राहिली. तरी सरंजामी आतां १०० होनाची केली ते आदा करून चिटणीसीची सेवा घेत जाणें.

रा. सं. २६ ले. ४९ } ( १२२ ) { श. १६०६ ज्येष्ठ वद्य ३०
जुलूस २७ जमादिलाखर २८ } { इ. १६८४ जून ३

( येतमादखान मोगल अधिकारी आसदखान )—देशमूख, देशपांडे, मोकदम व रायां, मुजारिया परंगणे कडेवळीत सर॰ अहमदनगर सुभे औरंगाबाद ऊर्फ दखन.

राजरूप वलद सयाजी भोसला ना॰ तलफ इजाफा व येवज जागीरा मोकरर सूद १ क. ५ इ. दाम.

[ त्या चिठीत सलास व १०९२ हा आंकडा देऊन आखर=जमादिउसानी २८ सन २७ दिला आहे. त्या फसलीसनाची सलास सनं व जुलूस २७ ह्यांचा मेळ बसत नाहीं. जुलूस २५ येतो. २७ धरून वरील काल दिला आहे. ]

राम. राशी ४२ ले. ४४ } ( १२३ ) { श. १६०६ ज्येष्ठ वद्य १०
सु. १०८५ जमार २८ } { इ. १६८४ जून १

नीलकंठ मोरेश्वर-हरि शिवदेऊ सुभेदार व कारकून ता। चेऊळ

चेऊळचे अदिकारी व देशमूख हुजूर आले होते त्यास रा. चिमणाजी आऊजी यानी जेणेप्रमाणें कौल देऊन संचणी केली आहे त्याप्रमाणें हे कबूल आहेत व कतबा लिहून दिल्हा आहे. अमानत गांव आहेत त्या गांवची लावणी संचणी करणे व बाजती वसूल जाला तो पेस्तर साकामधे मजरा देणे. सागरगडीहून ५० खंडी गला देविला आहे तो आणून रयतीस देवणे. लावणी संचणी होय ते करणें.

शि. च. सा. २ ले. ३८१ } ( १२४ ) { श. १६०६ आषाढ वद्य ४
सु. १०८४ रजब १७ } { इ. १६८४ जून २१

दिवाण परगणे तेरदळ-मोकदम कसबे तेरदळ.

दखीतील देसकानी पा मा येही हकतमेश केली कीं तेरदळमधील धर्जापूर पेठेंतील वीरत मठ महानाडानी नोबिना केला आहे. मठाचे निपादास्तीबदल जंगमास इनाम जमीन पाऊ चावर देखील पटीया कुलबाब कुळकानूसी दिधलीया निवादास्ती चालेल, तरी दिली असे. तुमाळे करणे. इनामपटी खर्चपटी घेणे निसबत नाहीं.

१८३५ इ. इ. पृ. १७७ } ( १२५ ) { श. १६०६ अ. आ. शु. ८
{ इ. १६८४ जुलै १०

मोरेश्वर पंडितराई—प्रांत राजापूरचे देशाधिकारी.

वे. हरिभट पटवर्धन पांवस हे ब्राम्हण योग्य धर्मादाय देविले. तांदूळ केली कोठी मापे ८१॥ अडीच मण. वेदमूर्ती क्षेम पावतील तोवरी देणे.

शि. च. सा. ५ ले. ८७२ } ( १२६ ) { श. १६०६ श्रावण शु. १
सु. १०८५ रमजान १ } { इ. १६८४ आगष्ट १

कविकलशछंदोगामात्य—देशमूख कानदखोरे.

साकगु॥ रा. छत्रपतींनीं बकाजी नावडकर यास तुम्हाकडे पाठविले होते. तुमच्या मुद्यामवाफीक सरंजामी जाली नाहीं, दिवगत लागली, म्हणून दिलगीर जाहले म्हणोन कळो आलें. त्यावरून आम्ही रा. छत्रपतीस्वामीस विनंती करून तुम्हास भेटीस यावयाची आज्ञा केली आहे. येणे. मुद्दा मनास आणून तदनुसार पारपत्य करून देऊ. वा

प्रगती अवघे वतनदार येकमते राहोन गनिमास हजा यासी, आपली तरफराजी करून घ्यावी.

पे. द. ११ ले. ४१ } (१२७) { श. १६०६ श्रावण वद्य १
सु. १०८५ रमजान १४ } { इ. १६८४ आगस्ट १६

हरि सिवदेऊ सुभेदार व कारकून— रा. बाबा (कवजीबाबा ?) सुभा माहाजानिहाय प्रांत येऊळ

देशक मामले येऊळ याचे इनावतीचे गांव आपले राज्याचे कारकीर्दी-पासून अमानतमुळे लागले दरत जमाबंदी होते. काही खराचे जमा होत नाहीत. असे असोन श. १५९७ मध्यें बहिरो त्रिमळ माजी सुमेदार यासी सनद व सीत घा मुलकाचे देशकमाराचे इनावतीचे खराचे जमा केले आहेती. ते १६४, ६५ पवरी सारी आतां बाकीस काढले. पुढे श. १५९८ मध्यें पेशव्यांनीं यासी सोडीची सनद घावयासी आज्ञा केली. लगेच कोल-दणतर्फेस स्वारी झाली व सनद देणे राहिली. आणि त्यामुळें बाकी १०।१२ वर्षे ओढत राहिली. तीन वेळ काहीं दस्त दिला पण सेरीकर बहुत जबुन झाले आहेत. शिवाय मुख्य की, आपले राज्यांत खराचे घावयाचा वहु नाहीं. कोन्ही देतले लिखेहि नाहींत. एका येऊळांतच हें नवे चालें आहे. तर सेरीकर सेवेसी आले आहेत. मनास आणून पारिपत्य करणार स्वामी आहेती.

पा. सं. २६ ले. ५० } (१२८) { श. १६०६ आश्विन शु. ४
जुलूस २८ जिल्काद २ } { इ. १६८४ आक्टो. २

(असदखान, मोगल अधिकारी)—परगणें धाराशिऊर सरकार नळदुर्ग सुभा औरंगाबादचे देशमूख इ.

परगण्याचा रबीच्या हंगामाचा वसूल १६ लक्ष ५ हजार मयावनजी वल्द राघलजी यांच्या जहागिरींत नेमला आहे. तरी बाबती हक, सारा, प्रामाणिकपणें व रीतसर हंगामाचे वेळीं त्यांना द्यावा. त्यांच्या सल्याप्रमाणें वागावें त्यांच्या गुमास्त्यांनीं शेतीची प्रगती व रयतेचा मान वाढेल असा प्रयत्न करावा.

पे. फा. का. ३ ले. ८६ } (१२९) { श. १६०६ कार्तिक वद्य १०
हि. १०९५ जिल्हेज २४ } { इ. १६८४ नोव्हें. २२

खिदंपूर आदिलशहा—श्रीनिवास वेंकटाधरी देसाई परगणे गदग पातशाही काम शीतस मास झाले आहे. तेव्हां स्वार व पायझोक यांच्या जमावावर एका विश्वासूक मनुष्यास पाठवून निशा व्यक्त करावी. प्रमचे

करतां पोषाख पाठविला आहे. त्याच्या स्वीकारांत स्वोत्कर्ष समजावा. याजसाठी कृष्णो चिमणाजी पंडीत सर दबीर, मख्दूम खुर्द व खवास याव पाठविले आहेत.

सनदापत्रें पृ. १५७ ले. ४४ } ( १३० ) { श. १६०६ पौष शु. ४
राजशक ११ रक्ताक्षी } { इ. १६८४ डिसें. २९

यादी वे. शा. सं. रामचंद्रभट केशवभट पंडित, उपनाम पुरोहित, कौशिक, ऋग्वेदी, वेदाध्याई, आश्वलायन, यांचे पिते केशवभट महाराज राजश्री थो. कै. स्वामीसंनिध होतें. त्यांचे हातून दानाध्यक्षपणाचे प्रयोजन महाराज घेत होते. त्याज उपरी कै. स्वामीहि दानाध्यक्षपणाचे प्रयोजनघेऊन चालवीत होते. कै. स्वामीनी तीर्थरूपाचे मुखे रामायण पुराण श्रवण केले. श्रवणाची श्रांगता दक्षणा भूमिदान ता. संगमेश्वर प्रां. राजापूर येथें कोंड ५ शेते ठिकाणें ३ येकूण भूमीमहसल दाभोळी लारी १६०० धारादत्त दिल्हे.

शि. च. सा. ३ ले. ६४३ } ( १३१ ) { श. १६०६
फसली १०९४ } { इ. १६८४

—अखार देशख, गोविंद कान्हो, गोमाजी मुल्हो, देशपांडे पा इंदापूर.

मलारी चोपदार मिर्धा याने बारामती कचेरीस कागद लिहून दिल्हा.

रा. खं. १५ ले. १४७ } ( १३२ ) { श. १६०६
सु. १०८५ } { इ. १६८४

दवाजी पाटील मौजे देगाऊ ता सातारा—रा. आनंदगिरी महंत

कतबा दिल्हा ऐसा जे, दाहा साल मुदल मण ८२ घेता त्याची वाढीस वट मण ८३ देऊं. बिवे ८१० खरीदीचे राहिली असे.

सा. सं. इ. ले. १३-१५ } ( १३३ ) { श. १६०६-०७
{ इ. १६८४-८५

( महंमद ) शिकंदर आदलशहा-खेमसावंत सरदेसाई परगणे कुडाळ महालानिहाय. सर जमीनदार

तुम्हावर बादशाहा कृपा जहाल होऊन तुमची अर्जी विदित जाली. मव्हिकार्जित बादशहाचे चाकरीवर आला आहा. तुम्ही कोणते तन्हेने राजा

संभाजीशी ममता राखून मोगल याबरोबर मैत्री न ठेवावी-कुमकेकरता तुम्ही बादशाही फौजेत येऊन पोहोंचणें. कोणी चांगला मनुष्य रवाना करणें. हस्तपंजे बादशहाचे करून व पोषाख रवाना केला आहे. तो घेऊन चाकरीवर खंबीर राहाणें (१५). बादशाही जाग्यांत शोवेसी हजर जाहाले त्याकडे कृपा-दृष्टीनें तमाम परगणे घाटाचे पायाखालील पो कुडाळ वगैरे बक्षीस इनाम करून दिला. मौजे मसुरा वगैरे १३ गांव व हक काजिमा कदिम आद लखान अमलात हिंदवीत लिहिल्याप्रमाणें दिले असे. ज्यावेळीं घाटावरून फौजा येतील त्या समई हजर राहावें आणि मार्गानें रहदारीस हरकत न होई असा बंदोबस्त ठेवावा.

| | | |
|---|---|---|
| ऐ. फा. सा. ३ ले. ८७<br>हि. १०९६ सफर ५ | (११४) | श. १६०६ पौष शुद्ध ६<br>इ. १६८५ जाने. १ |

शिकंदर अदिलशाह—श्रीनिवास वेंकटाद्री देसाई परगणे गदग.

जमशीदखानानें विनंति केल्यामुळें आणि रुद्रो चिमणाजी पंडीत सर दबीर याचा अर्ज आल्यामुळें स्वतःची निष्ठा व चाकरी व स्वतःच्या मुलाबरोबर स्वार व पायलोक यांच्या जमावासह हुजूरकडे पाठविणें. सरदारकीहि दिली आहे. त्यांतच उत्कर्ष आहे.

| | | |
|---|---|---|
| ऐ. फा. सा. ३ ले. ८८<br>हि. १०९६ रबल ३ | (११५) | श. १६०६ माघ शु. ५<br>इ. १६८५ जाने. २९ |

सिकंदर आदिलशाह—श्रीनिवास वेंकटाद्री देसाई गदग

(ले. ८६, ८७ म्ह. (११४) प्रमाणें व ) नवीन जिंकलेल्या प्रदेशांत जागिरीची व्यवस्था होईल.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १५ ले. ११<br>रा. श. ११ रक्ताक्षी<br>सु. १०८५ रबल ५ | (११६)<br>निवाडा | श. १६०६ माघ शु॥ ७<br>इ. १६८५ जाने. ३१ |

माहादजी पा जगदळा कसबे मसुर तर्फ उंबरज व संताजी पा घाडगा मौजे सिवडे व वराडे तर्फ उंबरज यांची सितोजी व भाऊ सट-वोजी भोसले यांजविरुद्ध तक्रार कीं, मौजे कोणेगव्हाण सिरवडे सिवडे व वराडे ता मासर येथील सेते भाते १०० व ४१॥, चोरली व चारली, मालिस्त करून नेली, पाचा आकणीच्या सोपयाची लाकडे तुळया खांब, कण्या इसणी; कडबा, १२ इ. तुरीचे व बाजे हर जिनसीचे कूट व कदई नेली, गुरु करून अंगावरील वस्ता कुडकिया जोड, कोचकी, सेला, तरवार; तांबवी

पासोडी; पाउसाळियाचा घराचा छाकर भारे २००; नेके व माळ्या दोन जाळविल्या पेवें गल्लियाचीं शाळे खोळुके नवशेरी खंडी २॥ नेली अशी कलमें ७. तरी कविकलश छंदोगामात्य आणि सर कारकून यांणीं सदरेस बैसोन निवाडा केला कीं, देशाधिकारी व पारपत्यगार देशक देशांणीं ता मारचे वतनदार यांनी चोरले किती जाळलो किती, वस्ता अंगावर कोणकोणत्या होत्या माला बांधला तेव्हांचे सुतार असतील त्यास विचारून कलमाचे कलम गोही साक्षीनशी शिक्यानशी सर्व खबर शफतपूर्वक, हकहिसाबी मनास आणून बदनामी न ये, निर्वाह होय, असे आकस कोसीस न करता परनिष्टपणें कळवावें. आकस कोसीस दिसून आली तर स्वामी मुलाहिजा करणार नाहीं येसे बरें समजोन लिहिणें म्हणून आज्ञा.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १५ ले. १० रक्ताक्षी शु. १०८५ | ( १३७ ) साक्षपत्र | श. १६०६ माघ शु. १० बुध इ. १६८५ फेब्रु. ४ |

सटवोजी बाबाजी भोसले—

महादजी सुलतानजी पाटील कसबे मसूर याच्या बापभावाचा गाव सिरवडे (ता उंबरज) येथें आपण सेतें केली होती, पटेल मजकुराची मिरासीची सेतें घेतली होती व पटेलगीस कटकट केली यामुळें महादजी व आम्हांमधें कुसूर पडोन कोणेंगावा आपण महादजी वरी चालोन गेलो व गर्दी केली. पुढें महादजीनें हें रायगड येथें गान्हाणें नेलें म्हणून आपणांस कविकलश छंदोगामात्य व सरकारकून येसे सदरेस बसोन मनसुफी केली. तरी आपण गदर केली, सेताचा आबारा केला, बेरणकाडी पांघुरणें लाकडे नेली हा नसताच कथला आपण केला, पेस्तर करणार नाही. केला तरी दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा अन्याई.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ९ ले. ६२ शु. १०८५ रवल १६ | ( १३८ ) | श. १६०६ माघ वद्य २ इ. १६८५ फेब्रु. ११ |

चिमणाजी आवजी—दामा(दा)जी कुलकर्णी मामले चेऊल.

रंगाजी सबनीस याणी कागद पाठविला. त्याचे उतर पाठविले. त्यावरून कलो येईल. तुम्ही यावयासी इतकें दिवस विलंब लाविला. याउपर लश्कर येणें.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. २१ ले. ६९ श. रक्ताक्षी रविवार | (१३९) | श. १६०६ माघ वद्य ७ इ. १६८५ फेब्रु. १५ |

कानोजी राजे शिरके—रुद्रभट गिजरे कऱ्हाड.

आम्ही कृष्णा-ककुध्नती संगमीचे तीर्थपुरोहितपण तुम्हांस दिले असे. तुम्ही भीस अभिसेख करणे. प्रतिवर्षी वरसासन होन ७ देऊन ते मशूर आशीर्वाद देणे आमच्या वंशपरंपरेनें तुमचे वंशपरंपरेनें चालविणें.

ऐ. सं. सा. ५ ले. २९ राजशक ११ रक्ताक्षी रविवासर सु. १०८१ रबल ५ } (१४०) { श. १६०६ फाल्गुन शु. १ इ. १६८५ मार्च १

मोरेश्वर पंडितराऊ—रंगो विश्वनाथ देशाधिकारी व लेखक प्रांत कऱ्हाड

वे. नरसीभट शेषभट मुंज्येमणी वस्ती कऱ्हाड याश धर्मदाय तांदूळ केली कोठी मापे मण रकु जोखले देणे मण ॥· दाहा प्रति वर्षी देणे.

रा. खं. २६ ले. ५१ जुलूस २८ रबर ६ } (१४१) { श. १६०६ फाल्गुन शु. ७ इ. १६८५ मार्च २

रुस्तुम वलद सयाजी यांच्या वकिलाने अर्ज केल्याप्रमाणें परगणें जामखेडें सरकार अहमदनगर येथील मुकदम त्यांच्या मालकांना (रुस्तुम सयाजी यांस) वहागिरी वतनाची चालु रकम व बाकी चार वर्षांत देत नाहीत. तरी वहागीरदारानी सरकारी अदालतीच्या रस्तानें तक्रार दूर करावी.

शि. च. सा. २ ले. १०६ शक रगताक्षी } (१४२) { श. १६०६ फाल्गुन वद्य २ इ. १६८५ मार्च १२

रा. येसवंतराऊ भाऊजी राव भांग्रें—सोनप्रभु धर्माधिकारी भागरेंवाडी पा कोतुळ

नासीक तीर्थ पुरोहितपण बेहोम नासीक गोदावरी काठचे दिले. त्याच्या बोधास मानिवीत हे सत्य (पडकी व साकरवाडीकर भांगरे.)

पे. द. ३१ ले. ४४ सु. १०८५ रबर २५ } (१४३) { श. १६०६ फाल्गुन वद्य १२ इ. १६८५ मार्च २१

कविकलश छंदोगामात्य—बाबाजी तानदेऊ सुभेदार व कारकून प्रांत पुणें.

मोरो विठल देशकुलकर्णी प्रांत मावळ यांनीं सांगितले की, (छत्रपती) महाराज व स्वामी (शिवाजी राजे) यांचे कारकीर्दीत देशमुख व देशकुलकर्णी पा मावळ यांचा हक व इनामती कुमाके करून दिवाणात इनामती खंडणी पा होन १०५ व १५ असे घेत असत. आति वर हक इनामतीचे

इस्त कमतर पडले तर त्याप्रमाणांत देशाकडून व देशांगीकडून खंडणी घेत. हाली प्रा मार खराब पडलें आहे. तर दस्तमाफीक खंडणी घ्यावी. एकारे महाराज साहेबाचे व कै. स्वामीची आज्ञा पत्रें भवतीक ते रुजू पाहून हाली राजश्रीकडून सनद सादर आहे तेणेप्रमाणें वर्तणूक करणे.

सनदापत्रें पृ. १९२ ले. ४ } ( १४४ ) { श. १६०६ फाल्गुन वद्य १४
सु. १०८५ रबिलावल २७ } { इ. १६८५ मार्च २१

गंगाधर मोरेश्वर प्रधान—बाबाजी तानदेऊ सुभेदार व कारकून प्रांत पुणें.

मोरो विठल ( होनप ) देशकुळकर्णी प्रां मजकूर हुजूर विदित केले की, प्रांतमारी आपला हक काजिना व दस्तमल व कतबा इनामती गांव मौजे न्हावी व जमीन गांवगला व धीरचे वणचराई वनाचा व नावा, टोकरे, झाडझाडोरा महत कदीम चालत आहे. तेणेप्रमाणें कृपाळू होऊन ताजी सनद सादर केली पाहिजे म्हणून विनंति केली. तरी बाबहाय कदीमपासून तागाईत सालगुदस्ता भोगभोगवटा चालिला असेल तो मनाव आणून चालवणें.

शि. च. सा. ९ ले. ६१ } ( १४५ ) { श. १६०७ चैत्र शु. ११
सु. १०८५ जवल ११ } कौलनामा { इ. १६८५ एप्रील ६

हरि सिवदेव सुभेदार व कारकून—खोत, पाटील, रयत, मोकदमर सुमा महाकानिहाये वा चेऊल रयत मामले चेऊल

तुमचे बाबे देवक मामले मजकूर सुमा येऊन मालूम केले जे, मामले मजकुरी रयतेवरी किलेफ बाबे बहल जालें आहे. रयेतेमधे काही उधार राहिला नाही. रयत कुल जमा होऊन हुजूर पारपत्याकारणे जात आहे. तरी अवी मुगास महिना दीड महिना राहियेला. हंगामी रयेती हुजूर गेली म्हणिजे थोडा तरी एक महिना पारपत्या कारणे पाहिजे. तेये रयत गुंतोन राहिली म्हणिजे मागे…बुडाली. कीर्दीस धका. तरी मुदा मनाव आणोन रयत समजाऊन कीर्दीस लाविली पाहिजे. त्यावरून मुदा मनाव आणावया कारणे देवकमार तुम्हाकडे पाठविले त्याबरोबर लेहून पाठविल्या मुदाप्रमाणें कौल सादर केला.—नारळ व सुपारीचा दस्त आबांचें ( श. १६०५ ) चेच पाहणीमुळे घेतले पाहिजे, बागायेत, जिरायेत, राजमाग इ. इ. बद्दल कलमें ७

रा. सं. २६ ले. ५२ } ( १४६ ) { श. १६०७ चैत्र वद्य १
सुहूर २८ जवल १५ } { इ. १६८५ एप्रील १०

मुकबिलाखान—महंमद कासीम

सरकार अहमदनगर पैकी नादनबचा राहणार दत्ताजी वकील याचे करवीं कळलें की त्याचे मालक रुस्तुमजी यांचेकडे जमिनीबाबत ५०० रु. देणे असून ते देण्यांत दिरंगाई होत आहे. तरी चौकशी करून खरी माहिती व निकाल द्यावा.

रा. खे. २६ ले. ५१ } (१४७) { श. १६०७ चैत्र वद्य ८
जुलूस २८ जवळ २१ } { इ. १६८५ एप्रील १६

रुस्तुम वलद सयाजी यांनी सरकारी हुकुमावरुन महंमद कासिम व फौजदाराचे नोकर यांस पकडून आणिलें होते. ते म्हणतात मला धर्म-घातान्वयें पकडले व मी त्यांच्या स्वाधीन झालों.

पि. द. सा. १ ले. ७४ } (१४८) { श. १६०७ वैशाख शुद्ध १
जु. १०८५ सफर १ } { इ. १६८५ एप्रील २६

खंडो नारायण सुभेदार—गोविंद रघुनाथ सुभेदार
प्रांत मुजफळगड व कारकून प्रा गदग

केंचणगौडा पाटील मौजे सावसी प्रा कुंदगोळ याणे हरामजादगी केली होती. याबद्दल त्यास अटकखाना ठेविला. त्यासी करारवी होनु पा ५०० घ्यावे, पैकी १ शे होनु वसूल जाला. बाकी ४०० त्या उसलाबदल २।१ वरसे नजरकैदी अटकखाना ठेविला. नफर मार बहुत हलाख जाला, उपाय काही उरला नाही. म्हणून आपले पाटीलगीची चउथी तकसीम नरसिंगराऊ रामाजी यासी विकत देऊन होन पा १५० घेतले. इनामती जमीन मार दहा व हकवर्तना व फसकी फळगी व खालसात जमीन देखील मुमाला करून दिली आहे. तरी तुम्हीहि पाटील मजकुराचे पाटीलगीची ४ थी तकसीमेचा मामला लावणी संचणी, कीर्दमामुरी, वरकडी गावीचा कारभार याचे गुजारतीने घेत जाणे.

पि. द. सा. १ ले. ६४ } (१४९) { श. १६०७ ज्येष्ठ वद्य १
जु. १०८६ रजब् १६ } { इ. १६८५ जून ९

हरि सिवदेऊ सुभेदार कारकून—रायाजी सबल प्रभु हवालदार
सुभामहालानिहाये प्रांत वेऊळ  मामले वेऊळ

तमीज जमीबदल देखल मामले मजकूर बरहुकूम सनद होन पा १२ देसाई अधिकारी कुळकर्णी मायेकी ४ प्रो रास असेत. मामलेमजकुरी बाकी देखल मजकुराचे निा असत. त्यापैकी आदा करणे आणि वाजमजकुरीचा आकार गुदस्ताचे बेरजेत ज्याजती होये ते गोष्टी करणें.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १५ ले. १२<br>रा. ( १२ ) क्रोध ( न )<br>शुा १०८६ | ( १५० )<br>निवाडा | श. १६०७ ज्येष्ठ वद्य ११<br>इ. १६८५ जून १९ |

माणकोजी राहूजी जगदळा पटेल मौजे शिराळे ता उंबरज आणि शिवाजी व नरसोजी नाइकडा कुणबी मौजे मजकूर यांमध्ये मो मारल्या निमे पटेलगीचा वेव्हार लागला असतां माणकोजीचा भाऊ माहादजी याने हुजूर विदित केलें कीं, आमची ग्र. जगदळे यांची वृत्ति कदीम; नाइकवडा हाइनी कथळा करतो. तरी बरहक निवाडा व्हावा. त्यावरून कोनेर रंगनाथ मुख्य देशाधिकारी प्रांत कऱ्हाड यांस आज्ञा-पत्र सादर झालें. मग दोघांचे राजीपणें राजीनामे व नंतर जमान कतबे लेहून घेतले. हमशाही गावीचे मोकदम, मौजे मजकुरीचे बलुते ऐसे पुष, कसबे पेठ तर्फ कोळकी येथें जमा करून श्रीकृष्णेची क्रिया व सत्य पाळून आपले वेताळीस स्मरोन गोही देणे म्हणोन त्यांस सत्य घातलें. त्यांनीं जी साक्ष दिधली ते साक्षपत्र माहालीहून चैत्र व. ११ स आले व चैत्र वद्य १४ ची मुख्य देशाधिकारी कोनेर रंगनाथ याची चलर छत्रपती स्वामीस आणिली. जगदळे व नाइकडे उभे करून विचारिलें. मोछतसर कुणबी येही तकीरा दिधल्या. त्यांत जगदळे पाटील खरे व नाइकडे कुणबी खरे. तकीरा दफ्तरी लिव्हे कापिल्या. जगदळे व नाइकडे दिव्हाळी गेले. तेच दिवशीं नाइकडा कुणबी पळाला. त्याचा जमानदार हि गैर हजीर जाहला. मग जगदळे तकीरा हुजूर घेऊन जगदळे खरे असे साक्षपत्र, चलर, करीना व भोगवटा पाहून जगदळेच खरे पाटील. नाइकडे कुणबी खोटे, ते दूर केले. जगदळे यास हरकी होन २५ पा नाइकडे गुन्हेगारी होन पा ५० देखील हर देशमुखी करार केले. हे निवाडपत्र सत्य.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. २ ले. १९७<br>राज्याभिषेक १२ क्रोधन सोमवार | ( १५१ ) | श. १६०७ आषाढ शु. २<br>इ. १६८५ जून २१ |

( संभाजी छत्रपती व निळोमोरेश्वर—कृष्णाजी कंक पदाती नायेक यांचे शिक्के ) सेवक राज्यमंडळ

मशारनिलेचा बाप कृष्णाजी येसजी कंक याचे हशमाची हवाले होती. त्यावरी फोंडियाच्या कोटास फिरंगियानी लगट केला तेव्हां रा. स्वामी राजापुरीहून स्वार होऊन फोंडियासि गेले. ते वख्ती खाशीवरी गनिमासी गांठी घालून धुंस बहुतच केले. ते वख्नी जखमा लागोन बरतर जाला म्हणोन घरास जावया आज्ञा दिल्ही. घरास जालियावरी जखमा फुटोन मयत जाला. त्याचा लेक मानिले त्याचें नांव कृष्णाजीच ठेविले आहे. तीन वरुषांचा मूल

आहे. त्याच्या नावे सुभा चालवावा आणि लोकांच्या जमावास बाबुजी फंक आहे त्यास कारभारी करून ठेवावा. म्हणोन येसजी फंक याणि विनंती केली. त्यावरून स्वामि कृपाळू होऊन कृष्णाजी फंक स्वामिकार्यावरी पडला याकरिता याच्या लेकास सुभा दिल्हा आणि लोकाचा जमाव करावा, हमेशा चाकरीवरी असिले पाहिजे, म्हणोन बाबुजी फंक थोर मावलियांत होता तो माकुल पाहोन कारभार चालवावयासि दिल्हा. वेतन दोघांस मिळोन करार केले. सालिना होन पादशाही निवळ ६००—कृष्णाजी, कृष्णाजी फंक याची सुभाची आसामी चालवावी. चाकरीस्यास होये तोवरी परवेठे देणे. सालिना होन २०० यासी चाकरीचा खिरिस्ता नाहीं. परवेठी तैनाती घ्यावी. पोतदारी मात्र धरावी. नानपरवेसी सुभा—बाबुजी फंक यास वेतन सालिना होन पा ४०० साला बातीस २०० चाकर १४ यो—१५० मोर्ह १०, १० दिवटिये १ यो, २० अफ्तागिऱ्या व नेजदार नफर २ येणे प्रो तैनाती केली असे. यासी घटाघाट व दंडक प्रमाणे धक्का करून उरल वतन घेत जाणे. बाबुजी फंकास चाकरीची मोईन केली आहे. त्याची हजरी पाहोन धमा सुा तीक होन मुजरा होणे.

| | | |
|---|---|---|
| कं. १५ ले. ११५<br>शक १२ क्रोधन<br>सु. १०८१ रजब १० | (१५१) | श. १६०७ आषाढ शु. २<br>इ. १६८५ जून २३ |

—येसाजी फंक सरनोबत व कृष्णाजी येसजी फंक पदाती नायक

या दोघानी फौजाचे स्वारीस फिरंगीयासि गाठी पडिली तेव्हां बहुत कस्त केली आणि गनीम मारून काढिला. ते वख्ती दोघाजणांहि जखमा लागोन चकचूर जाले. कठीण जखमा राजश्री स्वामीनी दृष्टीनें पाहिल्या आणि घरासी जावया आज्ञा दिल्ही. त्यावरी कृष्णाजी फंक याच्या जखमा फुटोन घरी मयत जाला. हाली येसाजी फंक हे हुजूर येऊन आपले वर्तमान विदित केले. त्यावरून हे कामाचे, मर्दाने, स्वामिकार्यावरी तत्पर; आणि याचा पुत्रहि स्वामिकार्यावरी मयत जाला. फौजाचे बकसीस द्यावयाचे होते म्हणोन [illegible] मजकुरी पारितोषिकाची मोईन केली होन पादशाही बेरीज दोन सहस्र—साला येसजी फंक सरनोबत होन १०००, कृष्णाजी फंक स्वामिकार्यावरी पडिले म्हणोन १००० येणेप्रमाणे एकसाला ये वर्षी परितोषिक द्यावयाचा नियत केला असे.

राम. दासी ४२ के. ४५ } (१५३) { श. १६०७ ज्येष्ठ—आषाढ
सु. १०८६ रजब } { इ. १६८५ जून—जुलै.

नीळकंठ मोरेश्वर—गौली बाजे खूम मामले चेऊळ

कौलनामा, तुम्ही रयतपणा करावया चुकविता. तरी कोणे बाबे धक अंदेशा न धरणे—तुमचे बाबे चिमणाजी आऊजी यास लिहिले. ते कौलबोल देतील. त्याप्रमाणे आम्ही चालऊन. कीर्दी मामुरी खुशहाल होऊन करणें.

रा. खं. २६ ले. ५४ } (१५४) { श. १६०७ अ. श्रावण वद्य १
हिजरी १०९५ साबान १३ } { इ. १६८५ जुलै ६

—परमानंद वल्द मानजी तोथा रा. नारनूल

रु. ३९५ अलमगिरी हे दावल वल्द आदम दीन यांचे देणें देण्या करता शामदास वल्द मोहनीदास यांचे मार्फत घेऊन पावलो. बरीक इसमाचा रंग गव्हाप्रमाणे पीत, कपाळ रुंद त्यावर आठया, उंच, दाढी, दोन्ही कानास भोकें हा शपथ घेऊन म्हणाला कीं, रकम मिळाली.

सनदापत्रें पृ. १६४ ले. ६ } (१५५) { श. १६०७ आषाढ वद्य ३०
शक क्रोधन. भौमवासर } { इ. १६८५ जुलै २१
सूर्यग्रहण सु. १०८६ साबान २८

शिवाजी विठल मुजमूदार—वे. तोरवणभटपुत्र शंकरभट जोशी, किल्ले शिकंदर ऊर्फ बदामी आश्वलायन शाखा, मौद्गल्य गोत्र

महापर्वणी पुण्यदिनीं किल्ले मजकुरी अगस्ती तीर्थी श्रीभूतेश्वरसंनिधानीं तुम्ही महासंकल्पविधानपूर्वक सांगितलेवरी सत्पात्र, साधु, वृत्तिनिष्ठ ब्राह्मण पाहून श्रेयस घ्यावें, पुण्यसामग्री संचित व्हावी, म्हणोन आमचे इनाम उमली गांव मौजे तोरे भास्करापुरीं खालसा जमीनपैकी किल्ले मजकुरीचे शिवेस लागले होते. कजेनवेंची गणेशानजीक मसवपटी ।।· तुम्हास हदमहदूद चालोन कुळबाब कुलकानू वेठबेगार हुगी (गव्हाची खीर) पंचबळी, बलुते देखील धारादत्त करून दिल्हे. तुमचे परंपरे स्नानसंध्या करून आम्हास वेदोक्त आशिर्वाद देऊन कल्याण इच्छून सुखी असिले पाहिजे. या धर्मकार्याचे वृत्तीस चातुर्वर्णांचे जन नष्टपण करून इस्कील व नवीन कानू जो कोन्ही करील त्यास त्याचे वर्णाश्रमाची व मातृपिताची आण आहे.

रा. सं. २१ ले. ५ } (१५६) { श. १६०७ श्रावण शुद्ध १
शक रक्ताक्षी सौम्यवासर } { इ. १६८५ जुलै २२

रंगोबा व नरसोबा व—मातुश्री कृष्णाबाई व विष्णुभट व बासु· सोमाजी नायक मावळंगकर देश मद सफरे पुरोहीत.

देशमुखी व सरदेशमुखी संगमेश्वर माहालची व मामले प्रभावली व मामले दाभोळ या वतनाची वहिवाटमध्ये अर्जक कोण पुरुष, त्यापासून वंशावली कैसी चालिली, त्यावरून कृष्णाबाई याणीं व उभयता भट गोसावी यानी सांगितले [ तें वृत्त, अपूर्ण. ]

ऐ. फा. सा. २ ले. ४२ } (१५७) { श. १६०७ भाद्र. शु. १
हि. १०९६ सवाल १ } { इ. १६८५ आगष्ट २२

[ मिरजकिल्यामध्यें पब्लिक स्टोअर्स इमारतीच्या मागें भिंतीस टेकून ठेवलेली शिळा. त्यावरील लेख. ]

परमेश्वराचा प्रसाद व कृपा यामुळें जुनी मशीद ८१६ तील ती शिकंदर कादिरी यांच्या कारकीर्दीतील असदखानानें पुनः बांधली.

सनदापत्रें पृ. १६३ ले. ५ } (१५८) { श. १६०७ भाद्र. शु. १
सुा १०८६ सवाल १ } { इ. १६८५ आगस्ट २२

अज दिवाण कसबे नवलगुंद—मोकदम मो। नवलगुंद

सनदसुभा तेथे लिहिले, लखवा लिंगपा देसाई मामले तोरगल यानी विनंती केली कीं, गतवर्षी सुलतान तारा मोगल लष्करासमवेत येऊन कसबे मजकुरी मुकाम करून घरें, वाडे व पेठ मोडून जाळून तलफ केली. त्या बराबरी गावांत साक्षांत देवस्थान तेहि छिन्नभिन्न केले, थोर देवालये होती तीहि मोडून तलफ केली होती. त्याकरतां गावांत मरग सुटला, माणसें मरूं लागली. रयत लोक व दिवाण लोक व वाणी वळूंज गावी राहेनासे जाहलेवरी, गांवे हुगी घालून आवंतुक देवताचें स्थापन केलें. ग्राम देवस्थानाच्या दिवसापासून पांढरी वसली. त्या दिवसाच्या स्थापनेच्या पुरातन स्थळेस मूर्ती होत्या, त्या दुरात्म्यांनीं विछिन्न केल्या. त्यांची स्थापना झाली पाहिजे. महाराज राजश्री महाराष्ट्राजा आहे. देवस्थानें छिन्नभिन्न असों नये. या कारणें देवालयें बांधावीं. उरजा चालवावी. ह्याव आपण व स्वामी मिळोन जें करणें तें करीत आहों. तूर्त नवलगुंदा सारखे गांवांत देवस्थान देवळेंच नाहींतसें झालें आहे. ऐसियास हुगी चालवे समयी श्री देवस्वामींची स्थापना करावी. देवळें इमारती बांधाव्या. तूर्त मूर्ति स्थापना करून पूजा चालवावी; नित्य पुराणश्रवण चालावें. त्यास एक भला ब्राह्मण योग्य पाहून दोनी मार इनाम अकरामराहमत करून देऊन पुराण श्रवण चाले ते करावे आणि वरकड देवाची उरजा चालवावी ऐसें वचन गुंतलें आहे. ऐसियास वेद० वेंकटीभट काशिनाथ भट वाराणशीकर बहुत योग्य भले आहेत. यांसी पुराणाबदल खालसात इनाम हुलमार २ देऊन

चालविलें पाहिजे. तेणेंकरून देवस्थानाची स्थापना होऊन शांत होईल... म्हणोन विनंती केल्यावरी वस्तुता विचार मतेंहि पाहतां हिंदुकीची गोष्टी खरींच. उदंड खर्चवेच महाराजांचे दरबारांत होऊन जातो, अगर पड जंगलहि पडतें. त्यापरीस श्रीचे उरजें अर्पित राजगृहांतून जरी वेच जाहाला तरी 'ज्यांचें नांव त्यांचें पुण्यें' महाराज छत्रपतीसाहेबांस श्रेय येईल. ऐसे पाहून हुलमार सर्व मान्य कसबेपैकी मशाती ३६ बिघेचा मार हुमाला करून दिल्हे असे. तुम्ही कारकून हाल व इस्तकबाल व नाडगीर कसबे मजकूर ग्रामस्त यानीं चालवणें.

भीसा. ले. ५९ } (१५९) { श. १६०७ आश्विन शु. १
सु. १०८६ सवाल } { इ. १६८५ सप्टं. १९

रघुनाथ नारायण हणमंते अमात्य —सुभेदार व कारकून सुभा कऱ्हाड

रा. दिषाकर गोसावी विदित केले कीं, गोविंद गंभीरराउ यानीं उचापती केली. त्यास तारले व नानेघोळ येथील ऐवज देविला आहे. तो ज्याचा त्यास देववणें. १८ सूम वाणी बकाल श्रीचे यात्रेस येतात त्यास जुलूम उचापती करावया गरज नाहीं. असें रा. साहेबाचे शासन असे. रयत लोकास रंजीस होऊं न देणें.

रा. खं. १८ पृ. ८१ } (१६०) { श. १६०७ आश्वीन शु. ११
सु. १०८६ जिलकाद ९ } { इ. १६८५ सप्टं. २८

नीलकंठ मोरेश्वर —दतसेट सेट्या

तुजकडे हरकी बा। इमारती किले पुरंदर बा। सेरणी बाकी वोढत आहे. त्यापैकी मुशाहराबदल देणे. शामजी केशव दफ्तरदार किले अहिवंतगड पा। होन २० आदा करणे पावलियाचा कागद घेणे—वरात.

शि. च. सा. २ पृ. २३४ } (१६१) { श. १६०७ आश्विन वद्य ३
{ इ. १६८५ आक्टो. ५

शिवजी जेधे मोगलास मिळोन कारीची व आमचे माहालातील गुरे वळून नेली मुलुखास उपद्रव देऊन उदूवस केला. मग संताजी निंबाळकर हवालदार किलें विचित्रगड व गडकरी व सर्जाराव एकत्र होऊन विचार केला की, मुलकाचा बंदोबस्त कोणे रीतीने होतो ! हवालदारे सला दिली जे, तुम्ही शिरवळास मोगलाकडे जाणे आणि शिवजी वगैरे यांचा खाजाब करून मुलखाची वसाहत होय तो अर्थ करणे. त्याजवरून सर्जाराव शिरवळास जाऊन अविंधाची भेट घेऊन सर्व हकीकत जाहीर केली. त्याजवरून शिवजी वगैरे यास मोगलाने दूर करून गावगनाची वसाहत करावयाची आज्ञा केली.

त्यावरून मुलखाची वसाहत झाली. हे वर्तमान संभाजीराजे यास कळलें. त्यावरुन सर्जाराव मोगलाकडे गेले ऐसे जाणोन महाराजानी इतराजी केली. तेव्हां संताजी निंबाळकर हवालदार यास पूर्वीची सर्व हकीकत ठावकी होती. त्यानी महाराज याना सर्जारावाविषी पत्र लिहिलें जे शिवजी जेधे मोगलाकडे गेले त्याने महालात उपद्रव करून मुलूख बेचिराख केला. सर्जेरावाची गुरेढोरें वळून नेली. सबब मुलखाच्या बंदोबस्तास सर्जाराव गेले. त्यास महाराज यांनी कृपाळु होऊन अभयपत्र पाठविले पाहिजे. त्यास महाराजानी शब्द काढून उत्तर लिहिले आणि हुजूर येणे ऐसी आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें सर्जाराव दर्शनास गेलें. मागे मोगलाने किल्ला रोहिडा घेतला. ती मसलत सर्जाराव यास सांगोन आज्ञा देऊन रवाना केले. आज्ञेप्रमाणे कारीस येऊन मुलेमाणसे यास ठिकाण धरवेना. हे जाणोन वाई देशात जांबळीस नेऊन ठेवली. आणि आपण लोकांचा जमाव करून किले रोहिडा हस्तगत केला. मग माहाराज रा. संभाजीची भेटी घेतली. बहुत मेहेरबान होऊन सर्जाराव यास शिरपाव दिल्हा. काहीएक दिवसानंतर या प्रांती औरंगजेब पादशाहा यांची मोहीम झाली. तुळापूर येथें पादशहा याचा मुकाम होता तेथे महालो महालचे देशमूख व देशपांडे गेले. ते समयीं सर्जारावहि गेले. तेथें कपलाखान (?) वगैरे मुत्सदी यास नजर व अंतस्थ देऊन निरोप घेऊन घरास आले. मुलखाची वसाहत केली. तेथें खर्च पडिला. तो आमचे वडिलानी पदरचा दिला, दुसऱ्या कोणी दिला नाहीं. पातशहांचे पुत्र शाहाबकल व अजमतारा यानी कसबे शिरवळी येऊन मुकाम केला आणि सर्जाराव व बाळाजी नाईक खोपडे देशमूख तर्फ उत्रोली यास बोलाविले की, किले रोहिडा घेऊन देणे. त्यावरून सर्जाराव बोलिले जे, आम्ही जमीदार, तेव्हां हा मनसोबा आम्हांस कैसा होईल ? मग बाळाजी नाईक याणी कबूल केले कीं किला घेऊन देतो. व सर्जाराव याची बापगूद (?) केली. त्यावरून सर्जाराव यास अटकेत घालावे ऐसा ठराव दरबारात जाहला. हे वर्तमान सर्जारायास कळताच रातोरात निघून कारीस आले किल्यास दाखल केले. मागे बाळाजी नाईक खोपडे यानीं स्वारी घेऊन किल्याखाली आले. गडकरी हरजी पवार याचे डोचके कंकरीजवळून कापून नेले आणि किल्याभोवता वेढा घालोन अंबरखान्याजवळ मुकाम करून राहिले. आणि सर्जाराव यास आणावयाकरतां चार भले लोक पाठविलें. त्यावरून सर्जाराव याणी दुखणियाचे मिष घेऊन आपले पुत्र मताजी नायक याजला बरोबर देऊन सलूख वरकरणीचा करून पाठविले. तदनंतरी मताजी नाइकास जमाव सुधा येऊन त्यास सांगितले कीं, किल्यास मोर्चे लावून लढावे. तेव्हां मताजी नाईक मुळीच्या बेताप्रमाणें मावेची लढाई करू लागले. इकडे सर्जाराव याणी किल्यास बातमी खबर

हुशार असणे, अवसान न सोडणे, ऐशिये रीतीची बरचेवर खबर शिवोजी आधव हवालदार यास पोहचवीत गेले व किले मजकुरी गला बेगमीस पाठ-वावा म्हणोन मौजे चिखलगांव येथें आपका खासगत गला होता तो परभारा गडकरी यास सूचना देऊन घेऊन जाणे, ऐसी बातमी खेळविली. वगैरे गावगनाचा गला नेणें ऐसे सांगितले. त्यावरून दरवाजाबरोबर उतरोन गला घेऊन गेले. तो खर्च वेच शिवजी व चांदजी वगैरे यानी दिल्हा नाहीं. व मसलतेसहि सामील जाहले नाहींत. पुढें पातशहा यानी पुरंदर वगैरे किले हस्तगत केले. ते समयी सर्जाराव यानी पुरंदरचे कोळी व बेरड यास आणोन आपल्या जवळ ठेऊन घेऊन आपले पदरीचा खर्चवेच देऊन किले पुरंदर हस्तगत करून साहेबचाकरी करावी म्हणोन मसलत करोन सरकारची कामे-काजे उमदी धरून करावयाचा निश्चय केला आणि वतनदाराचाहि बंदोबस्त जाला पाहिजे म्हणोन.

रा. खं. १५ ले. ३४२ क्रोधन } ( १६२ ) { श. १६०७ आश्विन वद्य १
रा. श. १२ जिल्हेज १ } { इ. १६८५ आक्टो. ५

शंभु छत्रपती— सर्जाराऊ जेधे

तुम्हीं संताजी निंबाळकर मुद्राधारी विचित्रगड यासी पत्र लिहून मुद्दा सांगोन पाठविला कीं, आपला भाऊ शिवजी जेधा याणें हरामखोरी करून सिरवळास गेला त्याणे आपली गुरेढोरे वळून नेली. पुढें आपणास बरे पाहणार नाही याबदल आपणहि उठोन सिरवळास आलों आहे. ऐसि-यासि आपण रा. स्वामीच्या पायाजवळी एकनिष्ठच आहे. स्वामी कृपाळू होऊन, आपले वतन देशमुखी आपले स्वाधीन करतील आणि अभय पत्र सादर होईल तरी आपण सेवेसी एउनु एकनिष्ठ होउनु सेवा करीन म्हणून. तरी तुमचा मुद्दा माहाले हवालदार एही स्वामीचे सेवेसी हुजूरास लिहिला. त्यावरून हे आज्ञापत्र तुम्हास लिहिले आहे. तरी आधी तुम्हीच सरासरी हराम-खोरी केली की वतनदार होऊन इमानेइतबारे वर्तावे ते गोष्ट न करितां स्वामींचे अन्न बहुत दिवस भक्षिले त्याचे सार्थक केलेत की स्वामीच्या पायासी दुर्बुद्धि धरून दोन दिवसांचे मोगल त्यांकडे जाऊनु राहिलेस. तुमचा भाऊ शिवजी गनिमाकडे गेला तो आम्हास बरे पाहे ना. ऐसे होते तरी तुम्ही स्वामिसंनिध हुजूर यावे होते. म्हणिजे तुमचे इतबारपण कळोन एकनिष्ठता कळो एती. ते केले नाहीं. तरी बरीच गोष्ट जाली. या उपेरीहि गनिमाकडे राहाणेच असेली तरी सुखेच राहाणे. तुमचा हिंसाब तो काय! ए क्षणी स्वामी आज्ञा करितात तरी गनिमादेखील तुम्हास कापून काढवीतच आहेत हें बरें समजणे. दुसरी गोष्ट की, तेथे राहाणेच नाही. एकनिष्ठेने स्वामीच्या पायजवळी वर्तावे ऐसे

असेली तरी तुम्ही परभारे मुदे सांगोन गडकिलियाकडे राबिते काय म्हणून करिता ! हे गोष्ट स्वामीस मानत नाही. जो राबिता करणे तो स्वामीकडेच करून हुजूर वर्तमान लेहून पाठवावे. स्वामी तुमचा मुदा मनास आणून आज्ञा करावयाची ते करितील. तरी ऐसी गोष्ट करावया प्रयोजन नाही. हुजराती खेरीज दुसरीयाकडे एकंदर राबिता न करणे. जे वर्तमान लिहिणे ते स्वामीस लिहित जाणे. तुमचे ठाई एकनिष्ठताच आहे, ऐसे स्वामीस कळलियावरी जे आज्ञा करणे ते करून आज्ञापत्र सादर होईल. तेणेप्रमाणे वर्तणूक करणें.

शि. च. सा. ६ के. ४६७ } (१६३) { श. १६०७ कार्तिक शु. ७
फ. १०९६ जिल्हेज ५ } { इ. १६८५ आक्टो. २४

—विसाजी माणकेश्वर देशपांडिये पा अकोले.

तुमचे वडिलाचें सेत मौजे धुगोऊ व मौ वासेर याचे सिवेसी आहे. ते कीर्दी करणे, व तुम्ही म्हटल्याप्रमाणें सात साला इस्तावा बिल मक्ता दर चाहुरी रुा ६० (८।१६।२४।३२।४०।४८ व ६० या) प्रमाणें देणें. यासिवाय वाविजवार व पटी वगैरे बाबती व वेठीबिगार जेवा आवा तुम्हीं न देणे.

शि. च. सा. ६ के. २३ } (१६४) { श. १६०७ कार्तिक शु. १४
सु. १०८६ जिल्हेज १२ } { इ. १६८५ आक्टो. ३१

किले सिकंदरगड ऊर्फ बादामी—माकदम व कुळकर्णी व रयानी स्याचे दिवाण मौ हुलगुळी सा बळगानूर किले मार.

श्रीनिवास वेंकटाद्रि देसाई पा गदग व नाडगौडा किले मार याची निवेत साहेब कामावरी साबीत दखोनु मौजे मजकूर कुळबाब कुल कानू इनाम मन्हामती केला.

रा. सं. २३ ले. ५५ } (१६५) { श. १६०७ कार्तिक शु. १४
शुलूस २९ जिल्हेज १२ } { इ. १६८५ आक्टो. ३१

—पर. नसिराबाद सुभा खानदेश येथील देशमूख, देशपांडे, मुकादम इ.

परगण्यांतील १५ लक्ष दाम सय्यद शेखानाच्या जहागिरींतून माकोजी वल्द ठोकोजी यांच्या जहागिरींत रबीच्या हंगामाच्या आरंभापासून नेमण्यांत आले आहेत. तरी दिवाणी व इतर हक त्यांना द्यावे. त्यांच्या सल्यानें वागावें व त्यांच्या गुमास्त्यांनीं प्रजेस राजी ठेऊन शेतीची भरभराट करावी.

भीसां. ले. ६०, ६१, ६२ } ( १६६ ) { श. १६०७ कार्तीक वद्य २
रावपक १२ फोयन इंदुवासर } { इ. १६८५ नवंबर २

राजा शंभु छत्रपती—रंगो विश्वनाथ दे०री प्रांत कऱ्हाड व कवि-कलश छंदोगामात्य, व अंबाजी मोरेदेऊ दे०री प्रांत सातारा

श्रीफळ श्रीरघुनाथ यांजेचे नंदादीप, लिहिणार व अफराद यांचे वेतनाची मोईन पेशजी सादर आहे. त्याप्रमाणें ऐवज तुम्ही पावीत नाहीं. गावोगाव बराता करता पण ऐवज पावत नाहीं. एकच गांवावरीं सरस पाहून ऐवज नेमून देणे. सिंगणवाडी येथें सारे ऐवजाची बरात पावावी. उरला ऐवज दिवाणांत घेणें. दिवाण लोक वाणियाजवळून उचापती करतात ते वास्तीने यात्रा मोडो पाहते, ऐसे न करणे. तुम्ही जाणे. दिवाकर गोसावी—हस्ते पूर्वी-प्रमाणें मोहोत्सव चालवावा. उधव गोसावी मर्घेच नसते कथले करावयास संमध नाहीं. शाहापूर येथें रामदासमठासनिध हनमंताचें देवालय आहे. व गोसावियाचें इनाम आहे. ते उत्पन्न वाहागांवचा पाटील कृष्णाची व पुजारी भक्षतो. तरी बरजोर ताकीद करणें आणि पाटलाने खादले ते इनाम वेरीज त्यापासून घेऊन दिवाकर गोसावीयास देणे. कसबे परेली येथें श्रीकडील काही तृण व काष्ठाची मोईन आहे ते पावीत जाणे.

ऐ. व. ११ अं. ३ पृ. १७ } ( १६७ ) { श. १६०७ कार्तीक वद्य ९
जुलूस २९ जिल्हेज २२ } { इ. १६८५ नोवें. १०

( औरंगजेब )—रावराजे महालोजी बहादर घोरपडे (मुधोळ)

सैन्यासह बादशहाकडे यावें. सय्यद अलीमुहमद उमराव याजला याजसाठींच पाठविलें आहे.

शि. च. सा. ५ ले. ८४२ } ( १६८ ) { श १६०७ कार्तिक वद्य ११
सुहूर १०८६ जिल्हेज २४ } { इ. १६८५ नोव. १२

तकरीर कर्दे का म्हेसवड पा माण दहिगाव हाजीर मजालसी धर्माजी देशमुख का वेळापूर याणे मारेकरी नफर तिघे पाठविले. ते उमाई अवा-जीचे वाडियात होते. बुधवारी बाजाराचे रोजी रात्री कोटाचे दिंडीचा दारवटा खणोन ढलविला. इतक्यांत रजपुताचे चौकींतील रजपूत जागा जाला, त्याने गुल केला. त्यास धोंडमार करून ते उमाईचे वाडियांत दडोन राहिले. दुसरे रोजी सांजेस अवाजीने लोणारा पाठवून आपणास – पारनाईक मांग बोलावून

नेले. आपण गोंवणीच्या झाडाखाले बेसलो. तेथें सदरहू नफर होतें. त्यांस रात्री तारतखानाचे दिशीने बाहीर काढून बनाचे वेसीने बाहेर पातले. यावेरी देवाचा मगारा, माल व माहरी मनपुरें ठेवली; हे गोष्टी नो बकावी म्हणोन क्रिया घेतली.

शि. च. सा. २ ले. १७१ } ( १६९ { श. १६०७ मार्ग. शु. ६ शनिवार
रा. श. १२ क्रोधन } -७० ) { इ. १६८५ नोवें. २१

शंभु छत्रपती—अंबाजी संयदेव देशाधिकारी प्रांत वाई

प्रा मारीचा मुकद्दमाचा तहरह छावणीसंचणी प्रा मनकुरीचे देशमुखाचे मते करीत नाही. येणेकरून कितेक रयेतीचा दिलासा राहात नाही. हे गोष्टीने गैर फायदा हो(तो). तरी येसी गोष्टी सर्वथा न करणे. जो तहरह करणे तो देशमुखाचे मते ( करावा ). मुलूक मामूर होये तीं राहाटी करणें.

[ हाच कागद शिवचरित्र साहित्य खंड ५ मध्यें लेखांक १४५ हा पुनः आला आहे. व तो ओसडें येथील संग्रहांतीलच आहे. त्यात 'मजमूचे' व देशमुलीचे 'मक्ते' असे शब्द आले आहेत. पण या खं. २ ले. १७२ शीं ताडून पाहतां ह्या शब्दांचें वाचन व मुद्रण चुकीचें झालें हें सांगता येतें. खं. २ मधीलच वाचन दुरस्त आहे. ]

भे. व. १ पृ. १६० } ( १७१ ) { श. १६०७ मार्ग. शु. १३
सुलस २९ मोहरम ११ } { इ. १६८५ नोव्हें. २८
हि. १०९७ }

—मुल्ला अबदुल्ला मौजे उंबरे

उंबरे येथील मशिदीची खिताबत=पुराणिकी—सर्वेच कजायत=काजीपणा व मौअज्जद = प्रार्थनानिमंत्रकी असे तीन अधिकार दिले आहेत. फर्मान लेखक महमदस्तान वाकेनिवीस.

सनदापत्रें पृ. ४८ } ( १७२ ) { श. १६०७ मार्ग. शु. १३
शक क्रोधन शु. १०८६ } { इ. १६८५ नोवें. १८ शनि.

गणेश जनार्दन कुलकर्णी —दामाजी व गोविंद खंडेराव
मौजे चन्होली तर्फ हवेली　　लिंगरस मो. व तर्फ मजकूर

उगह्यापासून फर्ज मुद्दल रु. ६७६॥ आम्हमुलें प्रवर्तसंबंधें घेतले. त्यास द. मा. द. स. व्याज रु. ५ प्रमाणे ३३॥। मार्ग. ते ज्येष्ठ शु. १३ सदा महिने

ही मुदत मुदतीनंतर मुदत फलांतर बाद. न देऊं तरी कुळकर्ण तुम्हांस दिलें. ( पुढें हे कुळकर्ण लिंगरसाकडे गेलें. )

| | | |
|---|---|---|
| शा. स. द. के. १२<br>सु. १०८६ मोहरम १७ | ( १७३ ) | श. १६०७ मार्ग. व. ३<br>इ. १६८५ डिसें. ४ |

खेम सावंत भोसले—धाणी महानाड परदेशी
सरदेशाई पा कुडाळ उदमी तळघाट.

मा शिवाजीराम चिटणिवीस पा मार पाठ विस्वा या फर्मान व कुर्दलवडे मोकाशाई घाट चालिले आहे. अलीकडे शिवाजी राजे याचे कारकीर्दी-मध्यें चालिलें. हलीहि दर गोणीस एक वेलास पलमरीव हसबमवाफिक ८१ रुका मारनुलेचे कमाविसदारापाशी देणें.

| | | |
|---|---|---|
| भीशां. ले. ६३,६४<br>सु. १०८६ मोहरम २९ | ( १७४ ) | श. १६०७ पौष शु. १<br>इ. १६८५ डिसें. ११ |

गोविंद पुरोत्तम सुमेदार व—मुकुंद शंकर हवालदार व
कारकून प्रांत जाऊळी कारकून सा सोनाटसोळसें

—कमाविसदार, मेटकरी घाटकुंभारला.

(ले. ६० प्रो) सदरहू मोहनचा ऐवज क्या गांवी चाक तेथें कुसरियाची बराव न करावी. म्हणजे ऐवज पावेल. छत्रपती स्वामीस विशेष पुन्य आहे, म्हणून घाट मबकुरी पातशाही होन १०० रास देविलें. आदा करीत जाणें. या उपरी तुम्ही फुगोन रोखे गावावर कराल आणि हुजूर बोभाटा येईल म्हणजे तुमचे मुलाहिजा होणार नाही. ताकीद असे. ( मागील क्र. १६६ पहा ).

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ३ ले. २४<br>सु. १०८६ सफर १ | ( १७५ ) | श. १६०७ पौष शु. २<br>इ. १६८५ डिसें. १७ |

सर्जाखान—कारकून व देशाई व नाडगीर किले सिकंदरगड उर्फ बादामी

श्रीनिवास वेंकटाद्री नाडगौडा किले मजकूर हे दिवाणीचे काम करीतच आहे व हाली पवाडी नाईक देशाई किले मा यानें हरामखादगी करून दिवाण सिलायेतीची कीतेक खेडियात ठाणें घालून मजबूद केले होते. तरी तुम्ही आपुले बाती मदत पाठऊन देशाई माराचे ठाणें ऊठाऊन दिवाणीचे ठाणे

घातले ऐसे हुजरी व कारकून किले मार येथे लेहून पाठविले. येसियास मौजे बुलगवी किले मार देखील नख्त हुमाले करणें.

भीशा. ले. ६५ } (१७६) { श. १६०७ पौष शु. ५
सु. १०८६ सफर ४ } { इ. १६८५ डिसें. २०

ता मेढचे दिवाण—सायगावचे मोकदम ता मार

देवस्थान मुकाम चाफल व रामदासस्वामी किले सजनगड दोही स्थली नित्य पूजा व मोहछाव होवयास अंतर पडो लागले. संकल्पसिद्धीस गेला पाहिजे. याकरता मौजे सायगाव दिला असे. तेथील जो दस्त होईल त्यापैकी ४३०॥ ८ टके नख्त व गला देन जिनस ४॥१॥१८= गहू, भात बारीक ५८३ तूप, तेल वगैरे भीकडे देविले असे. वेटबेगारी भीकडे.

शि. च. सा. ९ ले. ६५ } (१७७) { श. १६०७ पौष शु॥ ६
सु. १०८६ सफर ५ } { इ. १६८५ डिसें. २१

निळकंठ मोरेश्वर-रायाजी सदक प्रभु हवालदार व कारकून मामले चेउल

बाबाजी ( दादाजी? ) महादेऊ देसाई व देशकुळकर्णी मामलेमजकूर याणी विनंती केली कीं, सालगुदस्ता, खंडोजी मोहिता सेवक राजमंडल याणि रामनाक भंडारी प्रज मौ। गोठी ता। बासणगो याजकडे राजदीचा राजभाग बाकी देणे असता दरम्यान खंडोजीनें त्याचे टोणगे दोन ...१० मण घेऊन गेला. उपरी रामनाक चिमणाजी आवजी यासी फिर्याद जाहाला. खंडोजी मोहिते याचे मुशाहिराबदल लेहोन बाबाजी कुळकर्णी यासी मजुरा देणे.

इ. वृ. १८३४ पृ. १४४ } (१७८) { श. १६०७
फ. १०९५ } { इ. १६८५

पाटोयाचे देशपांडे
अबदुल सलाम ऊर्फ चिंतामणीराम फौत ( मृत्यु ) जाले.

इ. वृ. १८३४ पृ. १४४ } (१७९) { श. १६०७
फ. १०९५ } { इ. १६८५

शके १६०७ क्रोधाब्दे सातोत्तर। तैं टीका शिवरामेश्वर।
कोनरी बाबा सादरें। आज्ञा विचार लेखकु ११२
पूर्णानंदाचे शिवरामस्वामीकृत अध्यात्मरामायण.

१८१७ इ. पु. १११ } (१८०) { श. १६०७ इ. १६८५

मोरेश्वर पंडितराव—रंगो विश्वनाथ देशरी व लेखक प्रां. कऱ्हाड वे० नरसिंभट शेषभट मुंजेमणी यांस ते योग्य विद्वान धर्मादाय तांदूळ मण १, जोंधळे मण १० प्रतिवर्षी देवणें.

शि. च. सा. २ ले. ३९४ पो रसर ५ } (१८१) {

अली कुतुबशहा तख्त गोलकोंट शेर भागानगर तेलगण } —पातशाहा तख्त दक्षण, धार विजापूर

साहेबानके दिलपरी सुणाकर हामारी दिलकी मादमी दूर होकर गै. हामारेवर दिलीका पातशाहा हजरत अकबर जलालदीन हुकूम करकर राहा. पातशाहा भाकर तख्त दोलताबादमे भकर उतऱ्यो है. ऊने हमणेकू कतबत शुरू किया है. उसके श्रोगान हजरत मीर दौलत मुरगी हेजीब भेज दिया है. उनो भाकर हमणेकु बोलता है, हम दखणकी पादशाहीपर हुकूम के ये है मराठे छत्रपत सबापर नजर किये है. च्यारो लाख घोडा ताराछु करवा दिलेलखान वा रणमस्तखान राहा चेलके ये है. ते हमणाकू तुमरे घोडा फौजा नालबंदी दिये तो खूब है. नै तो; तुमपर राहा चल दते है. हामारेपर बातने करकर बोलत है उस बातकू हम जबाब दिये है हमारी पादशाही वा दखणमेकी पादशाही जुदी नै. उनोकू हुवा तो हमनेकु हुवा. वो खबर सुणकर मोगल ख्याल देकर आया है. हमारे पयोपर बहुत कुच मुस्तैदी खूद तुम इस बातकू कुच दिलगीर न होणा. देख-णेकु नै तो फिलबत लिखकर भेज देणा है. हम खर्च कुच पैसे भेज दिये गै. हजरत सर्जाखान खलदकू दिलासा देकर राहा चल सुरु करकर आपणा बोला, लेयाकर वखत है लोते हजीर है. उनोकू दिलासा करकर सर्जाखान सरसुभा देरकर मोगलापर हुकूम करणा है. माहाराज छत्रपती संभाजी राजे पादशाहा जुही उनोकु येक कतबत वा हेजीब भेज देकर उनोका कुच घोडा मगाकर मोगलापर ख्याल देणा. गनीमकू मारकर फना करणा है. हम साथ कंबर बखत है. कलबरगेकु भावे है. तुमं कमर बदकर भाणा है. उस तर्फेसु संभाजी कमरबस्त होकर आवा है. तीनो जब मिलकर मोगलाई लेणा है तो कुच तुमारी पादशाहीका... होणा है. नै तो मुल्कल खराब होता है. साहेब न पस हमारा हेजीब माधयराऊकू तुमारे पेश भेज दिये है. उनो बहुत कुच बयाण बोले दिलकू मालू [म] होवेगा. साहेब वास्ते कुच १।२ मेवा, घोडे

१।२ हथी ४, सारिंगी घोडी ६ भेज दिये है. वो तुम कहेनापासे कहमणसे खिजमतमे हाजीर है. हुकमतपन्हाः मसूदखानकू खर्जेकू देकर कोटमे रखणा. इस वखतमे इतनाही पकडे तो कुच ज्योर देत है. तुमारे कोट बकषी छोडणा करेंगा. संबाजी राजे याने च्यार हिशे करक्या घोडेकी सचणी किया है. उनोपर दिलीका पादशहाका फर्जंद तारालू कर गया है. सुफचयानी मादमाहाम हजरत शाहाजादेने हमणेकू कितावत लिखते. हम दिली फिर कमरबंदवे है. हमकू मिलकर मोगलाई...तो बहुत कुच तुमारी नामोश होती है...हम तुमारे खलबत मे है. इस बरहुकूम हम कारबार किये है इताना हमार फते- बाजी हुये. पीछेलसाहेब कू अमारी बेटी देकर दोस्तीका अमल करेकू इस बातपर तुमारा भला येक अदमी भेजे देकर मजबूदी काम करणा है. तुम बडे बुजुरककार है. साहेब नजर करकर भला येक हेजीबकू भेज देणा है. उनो संगत दोनी बात करकर कुच पैशे भेजे देयेगा. दखणकी पादशाहीकी खिज- मतकु रहते रहत है. कस्तवानी मुरीदनखान बहलूलखान बडा हजीर है. उसकुच दिलाशा करकर रखणा है. कलम तुजाई प्यारी दिलपानी तुरी हाक रखे है. वो उसे है. तुमतर्फे करनाटकी राजे राचेवाल है. उस तर्फेलू इशेम आये तो बी कुच जोर होता है. हम तो पेस छत्रपती संबाजी राजे यान मातुल रामचंद्रपंत हेजीबकू भेजे दिये.

शि. च. सा. २ ले. १८२ व }
सु. १०८६ ले. १८३ }
(१८२)
फौलनामा
{ श. १६०७
{ इ. १६८५

मकबुलखान सुभेदार महाकानिहाय मामले बंकापूर —सिवया मुछडी इत्यादि ५६ व्यापारी मंडळींची नांवे (सराफ, नाईक, तेली, तांबोळी, बागवान, पुजारी, समस्त माहा- नाड थळ, परस्थळ उभा मार्ग छपन देश हाये. पेठ नवाब, अबदुल रौनगर मामले मजकूर.

जकातीचा तपशील. पेठेसी कौल सा साल; धावेसी व खपरेल परासी पाच साल; वतन पराम तीन साल, कौल भरिलेबरी दिवाण व समस्त माहा- नाड व नाडगीर बैसून कूल पाहून कुलप्रमाणें बिराड बांधावे. मिरासदारासी वर्तना करून घ्यावे. गवत व भूस जिनस यादी जनावराबरील यादी, मांडण व्यवस्था, इतर पेठेचे संबंध इ. इ.

लं. १५ ले. ४४५ }
सु. फ. १०९५ रजब ४ }
(१८३)
{ श. १६०७-८ ज्येष्ठ शु. ५
{ इ. १६८५-८६ मे. २८,१७

देशमूख देसपांडे पा चाकण—मोकदम कसबे इंदोरी

वे. केसवभट ब्रह्मे याचे सेत का मार इनाम आहे तेयाचे सांभाळी करणें.

सं. १५ ले. २८० } (१८४) { श. १६०७ ज्येष्ठ शु. १
शु. १०८६ रजब ५ } { १६०८ " ७
{ इ. १६८५ मे २१
{ १६८६ मे १८

शंकराजी नारायण—कृष्णाजी दादाजी प्रभु देशपांडे सबनीस व आमनीस ता कोक हशम ता हुजरात मौजे कारी वगैरे कोरळ चौकी व लिंड ता रोहिडखोरे.

मावळप्रांती गनिमानी धाक केली म्हणोन समजले त्यास कोरळसिंड व ढवळा घाट व मांढरदेवचा सडा येथील जागा जागा चौक्या घालून गनिमाची खबर ठेऊन कमकसूर खास बातमी पावती करणें. + राजगडी फळविताव, तुमची कुमक रोहिड वगैरे जागाहून होईल तुम्ही सिरवळी मर्दमुत्र चांगली केली हे खबर येथे समजली. या वेळी गनीम नामोहरम सर्वांनी करावा. तुम्ही जमेदार व सरचाकर माहाराजाचे वेळचे (नामोश) करोन दाखवतील हा भरवसा आहे. बहुत काय लिहिणे.

शि. च. सा. ९ ले ६६ } (१८५) { श. १६०७-०८
शु. १०८६ } महजरनामा { इ. १६८५-८६

मामले मूर्तजाबाद ऊर्फ चेऊल. पेसजी सन सबासामधें श. १६०४ विठोजी बापूजी, गोंदोबा नारायण इ. पांच जणानीं आपली वाडी सूर्याजी बिसाजी प्रभु वस्ती तपे अस्टमी यांसी विकत दिधली. याची किमत चौकचारें देशमूख, आगरनाईक, सावा हरदू वाडीचे खावंद चारी कोन वाडीचे हिंडोन मुद्दमाण पाहोन केली. वाडी खराबा माट १२५ लाहारी मधुरी. आपले निशाण करून दिधले. हे खती सजणाजी होता त्याची अब- काद लाहान नादान. पुढे दाने जाहाले. मग वाडीमधे पदरीहून मबलग पैका खर्च करून विहीर पाणी केले, आबादानी केली, नवे घर बांधले. बसात केली. येसियासी सूर्याजी प्रभु रोजगाराबद्दल रायेगडास गेले. तेथें शिवाजी प्रभु वाडीची मनसुबी सांगो लागला. ते मनसुबी पंत न्यायाधीश यांजवळ गेले. तेही बात पाहोन शिवाजीस आज्ञा केली कीं, तुवा जाऊन तुझे वारिसदार आहेत त्यांचे गळा पडणें. शिवाजी म्हणो लागला, आपले तक्षीमदारावर बाकी होती. सूर्याजी प्रभूस चेऊलची मबमू होती. येन्हे शुलमे वाडी विकत घेतली.

सूर्याजी बोलिले जुलमे विकत घेतली नाही. यावरी जिवाजी चेडली येऊन तकरीरा जुलमे वाडी घेतली म्हणोन घेऊन हुजूर गेला. मोगल सन खमसामधे (श. १६०६) कोकणामधे येऊन लूट नागावा केला, धुधक जाहाली. सूर्याजी म्हणतो, वाडी जुलमे घेतली नाहीं, वाडी पाहिजेत तरी चौकचारे किमत ठरेल ती देणे, वाडी घेणे. मामले मजकुरी येसवंतराव अनंत सुभेदार होते. त्यावरून त्यासी बोलाऊन नेले. पुढें मनसुबी बजावा माहाले विमत म्यान· बंक हुजरी लोक येही हाजीर मबालिसी बैसऊन मनसुबी आरंभिली बता· वरील दोस, भले लोक हमशाई यासी मनास आणिता आत्मसंतोषे विकली हें खरे जाले. सूर्याजीनें सुखे पुत्रपौत्रानी उपभोग करावा. विठोजी वगैरे अर्धा· अर्धी समंध नाही.

| | | |
|---|---|---|
| १८१५ इ. वृ.<br>पृ. २४७ व २५४<br>शक क्रोधन<br>सनदापत्रें पृ. १६१ ले. २<br>फ. १०९५ रुमाल ५ | (१८६<br>-८७) | श. १६०७ माघ<br>शुा ७ बुधवार<br>इ. १६८६ जाने. २० |

| | |
|---|---|
| येसाजी वलद संताजी व देशमुख<br>विठोजी „ बाबाजी „<br>नारोजी चंद्रस देशपांडे<br>बाळाजी बापूजी „ समस्त<br>मोकदम परगणे चाकण— | —कपेश्वरभट सिद्धेश्वर-<br>भट ब्रह्मे उपाध्ये<br>कां चाकण |

दंडवत अनुक्रमें नमस्कार,

साल गुदस्त पर्जन्य मुतलक गेला यानिमित्य किलेदार व फौजदार साहेबी फर्माविले की, कां व पां मजकुरचे ब्राह्मण मेळवून अनुष्ठान करऊन पर्जन्य पडे ते करणे. मग हनुमंताचे देवळीं अनंदगिरीचे मठी हरिकथेस मंडप दिला व मुख्य महंत आले. कथेस प्रारंभ होतांच पाऊस पडला.

११ दिवस समस्तांनीं अनुष्ठान केले. परंतु पर्जन्य न पडे. त्यावरून व्यंगोक्ति केली कीं, मुख्य महंत आग्रहामध्यें आणिले पाहिजे. त्यावरून स्वामीस आम्ही अनुष्ठानाच्या ब्राह्मणांस आणिलें. स्वामीनी हनुमंताचे देवळी आनंदगिरीचे मठी हरिकथेस मंडप देण्यास आज्ञा केली. हरिकथेचे साहित्य केले. स्वामीनी कथा आरंभिताच पर्जन्य अहोरात्र पडला. पुरे पुरे केलें. स्वामीचे उतराई व्हावे म्हणून परगणे मजकुरी दर गावांस टकाशाई व धान्य केली मण करून दिले, ते चालवू ही ब्राह्मण्याची आण असे.

रा. खं. १० ले. २५९ } (१८८) { श. १६०७ माघ शु. ७
शक क्रोधन बुधवार } { इ. १६८६ जाने. २०

तिपाजी राजे पांढरे—वे० दामोदरभट धर्माधिकारी पुणतांबे

तुम्हास तुमचे स्थळचे तीर्थ उपाधीक दिल्हे. तुमच्या गांवास आलिया पूजन तुमच करावे, उपाधीक तुम्हास द्यावे. आपले वंशीचे येतील त्यानी तुमचे घरीं राहावे.

रा. खं. ८ ले. ४० } (१८९) { श. १६०८ चैत्र शु. २
शक क्षय भोम } { इ. १६८६ मार्च १६

उपाध्ये व मोरेश्वर पंडितराव—देशमूख देशपांडे व ज्योतिषी व उपाध्ये व समस्त वेदमूर्ति. वस्ती कसबे हरसूल प्रांत अवरंगाबाद व समस्त महाराष्ट्र कोंकण-देशस्थ विद्वद् वैदिक गृहस्थ

गंगाधर रंगनाथ कुलकरणी कसबे हरसूल हा ब्राह्मण मोगलापासी सेवेसी होता. मोगली यावरी बळात्कार करून बाटविला. भ्रष्ट करून ३ महिने बंदखानी ठेविला होता तेथें यवनासी अन्नोदकसंसर्ग घडला. नंतर बाग भागव अडीच सही मनसब देऊन चाकर करून ठेविला. पांच वर्षे चाकरी केली. स्नानसंध्यादिक कर्मे करिता न ये. यास्तव राहिले. पांचा वर्षांत अन्नोदक संसर्ग केला नाहीं. दौलत असतां भाग्याचें सुख टाकून, अंतःकरणीं अनुताप मानून, आपले जातींत यावें, यास्तव छत्रपती स्वामीपाशीं रायगडास येऊन एक वर्ष दरबारीं प्रायश्चित्त द्या म्हणऊन सरकारकून, न्यायाधीश व उपाध्ये व दानाध्यक्ष, व भलेभले ब्राह्मण व समस्त आपले ज्ञातीस धरण येऊन प्रायश्चित्त मागत होता. त्याउपरी रा. समस्त राजकार्यधुरंधर वर्णाश्रमधर्मप्रतिपालक छंदोगामात्य स्वामी यांस वर्तमान विदित जालें. यांहीं ब्राह्मणाचे कष्ट व अनुताप बहुत देखोन छत्र० स्वामीस वृत्तांत विदित केला. छत्र०नीं प्रायश्चित्त द्यावयासी आज्ञा दिल्ही. त्याउपरी आम्ही छंदोगामात्यांचे समेसी विद्वद्वैदिक ब्राह्मणांचे संमतीने मिताक्षरादि. निबंध पाहोन प्रायश्चित निर्वाह करून प्रायश्चित्त संकल्प सांगोन श्रीत्र्यंबकेश्वर यात्रेस पाठविला. तेथें श्रीगिरिप्रदक्षिणा १६० व दोनी यात्रा चतुर्विंशत्यब्द प्रायश्चित्त पूर्वोत्तरांगसहित गंगाधरें केलें. श्रीक्षेत्री समस्तधर्माधिकारी आदिकरून ब्राह्मण संमतीनें तीर्थविधी करून, शुद्धिभोजन अन्नप्रसादपंक्तीस घेतला, म्हणऊन श्रीक्षेत्रीचीं पत्रें घेऊन आम्हापाशीं आला पत्रें दिलीं. उपरी प्रायश्चित्त यथाविधी निर्गमिलें. ऐसें वर्तमान छंदोगामात्य

गोसावी यांसी विदित केलें. त्याहीं पत्रें मनास आणून कारकून-न्यायाधीश यांच्या अनुमतें आपले पंक्तीस भोजन देऊन शुद्धिपत्र देणें ह्मणऊन आज्ञा केली. त्यावरून शुद्धिपत्र दिले. हा ब्राह्मण शुद्ध संव्यवहार्य जाहाला यासी अन्नोदकादि व्यवहार यथापूर्व करीत जाणे. जो कोण्ही याच्या ब्राह्मण्याविषयी संदेह मानील तो देवब्राह्मणद्रोही, महापातकी जाणीजे. (साक्षी पंडित शास्त्री अष्टप्रधान)

शि. च. सा. २ ले. ७५ } (१९०) { श. १६०८ चैत्र शु. ५
सु. १०८६ जवळ ४ } { इ. १६८६ मार्च १९

गोविंद रघुनाथ सुभेदार व—गुडपगौडा देसाई व देसकुलकारकून सुभा प्रां गदग कर्यात पा मुळगुद

रा. खानगौडा देसाई पा लक्ष्मेश्वर येंही येकनिस्टवीने माहाराज राजेश्री छेत्रपतीसाहेबाचे कार्येभागास वर्तणूक करून मसलहत केले, माहाराजसाहेब हरुषीत होऊन मौजे नरतीबुा पा मार इनाम करून दिल्हे. दुवाळा करून दीजे. असल परतून दीजे.

रा. खं. १८ ले. २७ } (१९१) { श. १६०८ वैशाख शुा १
धाक धय } { इ. १६८६ एप्रील १३

रिणको मोकदम व समस्त दाहीजण—धनको धर्मोजी कासार कसबे मौजे वाघोली ता हवेली तळेगाऊ

तुम्हापासून घेतले कर्ज रु. १५० यासी व्याज द. म. द. से. ५ रु. प्रो देऊन हे लिा सही. यासी उगवणीस दत्ताजी पा व जावजी सा व कृष्णाजी सा लाडजी सा यासी गहाण आपली मोक. + + +

रा. खं. १८ ले. २८ } (१९२) { श. १६०८ वैशाख शुा ११
फ. १०९५ जमर१० } { इ. १६८६ एप्रिल २४
जुलूस २९

—देशमूख देसपांडे व मोकदम सेटे, महाजन प्रा पुणे

आमची स्वारी प्रा मजकुरी एउनी तुम्ही भेटावयासी न आलेती एसे सुस्त आणि पा मार कारवाके अमल होत नाही. काकसे फैल टाकीत नाहीं तरी हे खूब नाही. पा मा तहसील मवकग राहोनी तुम्ही तगाफली करिता. तरी पैसे शुा निा तुम्हास देणें लागतील. आता हजती दस्तगाहासीपवत माहा वेद मुकतान पुढे पाठविले आहेती तरी तुम्ही सामानसीर राहाणे.

आम्ही या मास स्वारी करून येतो तोपौतो तयारी करून ठेवणें तगाफल
केलिया आपले केले पावाल. खबर +++ असे.

रा. सं. २० के. २० } (१९३) { श. १६०८ ज्येष्ठ शु. १
फ. १०९५ जमादिलवल २९ } { इ. १६८६ मे १३

मोकदम पणदरे (पा सुपे)—साहेब

कतबा लेहून दिल्हा, जे, आपणावर साहेबाची बाकी रु. १८ राहिले.

ते ८ रोजी पाठवून देऊन हे सही.

शि. च. सा. ९ के. ६७ } (१९४) { श. १६०८ ज्येष्ठ शु. ७
शु. १०८६ रजब ६ } { इ. १६८६ मे १९

नीळकंठ मोरेस्वर—दादाजी महादेव देसकुलकर्णी मामले येऊल

बसेर पाठवून लिहिले की, आपणावर राजाज्ञाकडून १२५ होनाची
बरात आली. अफराद येऊन आटाभाट केली. तरि मनारोखा पाठविला
पाहिजे. तरि अफरादास मनारोखा पाठविला असे. काही आदा न करणे.
बरातच बजिनस पाठवून देणे.

रा. सं. १५ के. १४१ } (१९५) { श. १६०८ ज्येष्ठ वा १
शु. १०८७ रजब १५ } { इ. १६८६ मे २८

बाजी घोलप हवालदार व—बाजी सर्जाराऊ देशमूख
कारकून किले पुरंदर ता रोहिडखोरे गोसावी.

पत्र पाऊन वर्तमान कळो आले. लिहिलें की, 'आपल्यास बहुतच फार
अटक केली होती त्यास दुसरेच बाहेर पडिले आता काय विचार करावा तो
लिहिला पाहिजे. तरी उत्तम गोष्ट बरीच केली. आता रा. छत्रपती स्वामीचे
भेटीस जाऊन आपले ऊर्जित करून घेतले पाहिजे. राजश्रीचे दरशण होताच
बरीच सरंजामी होईल जाणिजे.

शि. च. सा. ६ के. ४१ } (१९६) { श. १६०८ ज्येष्ठ वद्य १
शु. १०८७ रजब १५ } { इ. १६८६ मे २८

रखमाजी बाबाजी सुभेदार व कारकून—मोकदम, कुलकर्णी मौजे
सुभा महाकालिहाये प्रांत कोपल • गुडलानूर प्रा मार

मा। हणमाजी वनवरस देसाई देशर्णी किले मा।र. साहेब कामावरी येकनिस्ट असोन कारभार करून एकनिस्टा दाखविली. याबदल मेहरबान होऊन मौ मा।र देशकुलकर्णकीस इनाम उमली कुलबाब कुलकानू देखील दिधले असे. दुमाले करणे. याचे रजेमधे अवत जाणे.

शि. च. सा. ५ ले. ११३
सु. (१०) ८७ साबान २३ } (११७) { श. १६०८ आषाढ वा। १०
इ. १६८६ जुलै ५

मफाजी देशरक्षक सुभा जुन्नर—येसाजी गोविंद सर सुभेदार ता। संगमनेर

मा। रेवादास गुबराबाबती पैके रुपय ४८२॥ बाहदेंप्रमाणे आपण देऊन गुजराथी लिगाड लाविले न पाहिजे.

ऐ. फा. सा. १ ले. ६६
हि. १०९७ रमजान ११ } (११८) { श. १६०८ श्रावण शु. ११
इ. १६८६ जुलै २३

फर्मान—नेगोजी, मुकुंदजी, विठोजी, रौळोजी व तुकोजी यशवंतराव घोरपडे.

तुम्ही पाठविलेला अर्ज पोहोंचला. तुमच्या शिपाईगिरीची, व प्राणार्पणाची हकीकत वाकेनवीसांच्या अखबारांवरून कळली. तसेंच व्यंकटी हगरस कुलकर्नाटकच्या हकिमांचा सर शुरु यानेंहि तुमची वार्ता लिहिली. तरी सदर व्यंकटी जो तुम्हास दिलासा देईल तो हुजूरचाच जाणून त्याच्या सांगण्याप्रमाणें चाकरी काम प्राणार्पणापर्यंत करावे त्यांत तुमचा उत्कर्ष होईल.

श्रीसं. ले. ६६
राजशक १३ सोमवासर
सु. १०८७ रमजान २२ } (११९) { श.१६०८ श्रावण वद्य १०
इ. १६८६ आगष्ट १

—पारपत्यगार व लेखक ता। मेढे

राजाज्ञा जे, चाफळ श्री रघुनाथ व सजणगड श्रीस्वामी यांस सुभा जावळी सायगाव व वकात--ऐवज मोईन करून छत्रपतींची सनद असतां सदर मोइनीमधून चिठीमसाले म्हणून कौल बरात करून ऐवज घेऊन नेता. तरी ही पाळमेल करायास गरज काय? फिरोन बोभाट आलिया ताकीद होईल.

शि. च. सा. ५ के. ९९४ } (२००) { श. १६०८ भाद्र. शु. ११
सु. १०८७ सवाल ११ } { इ. १६८६ आगष्ट २१

दामाजी रघुनाथ सरसुमेदार व—हवालदार व कारकून ता
कारकून प्रा पुणे व माहाये करेपठार

मुरारी खंडेराव भगत मुा जेजुरी याचे पुत्र भैराळ गोसावी यानी विदित केलेप्रमाणें त्यास त्याचे जमीन जिरात निवघाट कास टके ।· बारा व बागाइत फुले व आंबराई चिंचा बाबळी अनार इ. बाजे साडोरा नख्त मख्ता टके ४० व ठाणपट्टी, पायेपासी, खर्चपटी, सरदेशमुखी व सराफी वगैरेसह (शहाजी) महाराजापासून चालत आहे ते चालवावें.

शि. च. सा. २ के. १९२ } (२०१) { श. १६०८ आश्वीन शु. ७
क्षय संवछर } { इ. १६८६ सप्टं. १४

नारबा नायक फोंडेसरदेसाई—फोंडे सुमेदार ज्ञानलिंगयन
वरिगे दळवई

नायकाचा मुतालीक बाबुल सेणवी याने विना करून घेतला, जे आपला देसाई स्वस्थानचे सेवेठाई एकनिष्ठ चालिला. आपणास चाळोन आलें हक इनाम इ. गैरवारसाचे दुंदाईमुळें सद्या तैकूब आले. त्यामुळे आपला देसाई परमुलखी जाऊन होता. त्यास सुमेवील कौल पाठऊन फोंडस आणिला. अतास माहाराजसाहेब कृपाळू होऊन पुरातन प्रमाणें देसाई याचे देसगत चालवावयासी आज्ञा द्यावी म्हणून सेणवी यानी विनंती केली. त्यावरून देसगत चालो देणे. त्याचे घरचे वारीस यांस घरास नि।। होन १२५ नायकास ताकीद करून देऊस (देण्यास) लावणें.

शि. च. सा. ४ के. ७१८ } (२०२) { श. १६०८ कार्तीक शु. ४
राजशक [१] ३ क्षय इंदुवार } { इ. १६८६ आक्टो. ११

राजा शंभु छत्रपती—नीळकंठ नारायण देशाधिकारी व देशलेखक
प्रांत कुडाळ

पाटगावी परमहंस मौनी गोसावी होते ते मृत्यु पावले. कै. स्वामी असतां मठ बांधोन दिल्हा. नंतर गणोराम देशाधिकारी यांनीं विदित केले, त्यांचे स्थळी मोहोत्सव चाले ते केले पाहिजे. म्हणोन ५०० होनाचा निर्वाह केला. सांप्रत सुरुतगिरी मठी आहेत. या वर्षापासून ज्याजती २०० होन नि।। द्यावयाचा निर्वाह केला. मोहोत्सवधर्म चाले ते करणें.

रा. खं. १५ ले. १४८ } (२०३) { श. १६०८ मार्ग. शु. २
फ. १०९६ जिल्हेज ३० } कौलनामा { इ. १६८६ नोवें. ७

—आनंदगिरी गोसावी मठ
सदानंद का निंब ता मार पा वाई

तुमचे वाचे तुळाजी पाटील मोकदम कसबे निंब मालूम केले की गोसावीयाचे बुद्दामत चाकत आले तैसे चाळविलें पाहिजे. तरी तैसे चालेल सुखे राहणें. शक न धरणे, हरी वाच कौल.

पे. फा. शा. १ ले. ७५ } (२०४) { श. १६०८ मार्ग. शु. १५
जुलूस ३० मोहरम १२ } { इ. १६८६ नोवें. १९

—देशमूख, मुतसद्दी, पटवारी, सेट महाजन, परगणे बिदर सुभे बिजापूर.

आमच्या कानीं आलें कीं, तुम्ही परगण्याच्या रयतेसह आमच्या विजयी सैन्याच्या आगमन-निर्गमनामुळें आणि शत्रु-सैन्याच्या भटकण्यामुळें निराश्रित व परागंदा झाला. तरी तुम्ही आपल्या मूळ वतनावर येऊन आपापल्या चाकरींत गढून रयतेस दिलासा देऊन रयतेकडून शेतकाम करवावें, आणि जेणेकरून परगण्याची आबादानी, भरभराट होईल, जिराअत उत्कर्ष पावेल तें प्रयत्नपूर्वक करावें.

रा. खं. ३ ले. ५६० } (२०५) { श. १६०८ मार्ग. व. ४
सुा १०८७ मोहरम १७ } { इ. १६८६ नोवें. २४

धनाजी हरभी व जानोजी तुकोजी—धनाजी जाधव तथा शिवाजी सोनजी रेवजी पटेल मौजे बोरगांव जाधव मौ. माजीगाऊ

केहून दिल्हा कागद ऐसा जे, शाक मलकुरी मुलकांत दुकाळ पडला; आपणास एक दिवसाचे आवयास नाहीं. म्हणवून आम्ही तुम्हापाशी येऊन आपल्या आत्मसंतोषे आपले खाता तकसीमपैकी तकशीम घेऊन आपणास वाचविलें पाहिजे. ऐशियास तुम्ही उत्तर दिल्हे जे, तुमचे वतनभाऊ व बारा बलुते यांच्या विद्यमाने पैके देऊं त्याबारसी तकसीम घेऊं इ. इ.

शि. च. सा. ५ ले. ७११ } (२०६) { श. १६०८ पौष शु. ९
फ. १०९६ सफर ७ } { इ. १६८६ डिसें. १३

—प्रो बरछीचे अधिकारी

मौजे धर्मपूर येथें १ चाहूर जमीन गवडकाडी व मोजब सनद

सुराबखान मरहूम दिल्हे ते दासो दिगंबर पंडत गोसाई यांचे वंशपरंपरा बहागीरचे येवजी इनाम आहे; ते चालवणें.

को. इ. सा. २ ले. १५
सु. १०८७

(२०७)

श. १६०८
इ. १६८६

जाबिते वतनदार तो पेडणे सुभा ता भीवगड

बा तह हुबरात १२२६||| निशाण होनु पैकी वजा येसाजी जसवंतराव (ही पदवी आहे) देसाई परका होऊन कुडाळकर देशकास भेटला. सबब वतन होन ६०० वजा. पैकी मा इलेचा बंदा गोदजी नाईक तो येऊन भेटला त्यास सालिना देणे यंभर. नाडकर्णी, देसाई कसबा, भिकाजी नाईक सांवळ देसाई ता'मजकूर, देसाई मांद्रे, धारगळ, पारसे, यांच्या कदीम रकमांची नोंद.

शि. च. सा. ५ ले. ८००

(२०८)

श. १६०८
इ. १६८६

महजर-खुदादावदीयान, कारकुनान, कानगोयान, देशमुखान, देशपांडियान, पाटलान, पटवारियान, वो देवराव लोमटे रविराव मोकदम कसबे आंबेजोगाई येथील मावकी करतां कजिया उत्पन्न जाला. शिकंदर बातशाहपर्यंत गेला. बादशहा बोलले की भाऊबंद व गोत घेऊन येणे. ते आले. त्यांस बादशहा म्हणाला खरा कोण व खोटा कोण. अपूर्ण

रा.खं.१८ ले.५७
रा. श. १३ क्षय
सु. १०८७

(२०९)

श. १६०८
इ. १६८६

दत्तसेट सेटिया याच्या नावे हिरोजी इंडलकर याचे कर्ज बा हमी गोपाळसेट सेटिया हुजूर दसरी घेटत आहे. त्यापैकी म्हणोन राजपत्र.

रा.ख.१८ पृ.७९
रा. श. १३ क्षय
सु. १०८७

(२१०)

श. १६०८
इ. १६८६

गोपाळसेट सेट्या याचे नावें वराता. त्यांत अन्वय कीं, हिरोजी इंडलकर याजला कर्ज बा हमी तुजकडे हुजूर दफ्तरी घेटत आहे त्यापैकी.

रा. खं. १५ ले. २१५ }
सुा १०८७ + २५ }　　(२११)　　{ श. १६०८
{ इ. १६८६

शंकराजी नारायण सचीव—दादाजी नरसप्रभु देशकुलकर्णी ता
भोर व उत्रोळी तर्फे रोहिडखोरे

रा. स्वामीची आज्ञा माहाली माहालची जप्ती हकदाजिमा व इनामती व इसाफतीची बाकी ठेणेप्रमाणें तुमचे वतनाची हरदू खोरियाची गावगनाची बाकी मशारा तर्फ मारचा वसूल घेतला हे विदित जाले. या कामास स्वार पाठविले आहेत. मशाला रु. २५ आदा करणे.

रा.खं.१८ पृ.७१ }
माघ शु. ६ भानु. }
रजब ४ }　　(२१२)　　{ श. १६०८ माघ शुा ६
{ इ. १६८७ जानेवारी ९

कोल विा दंडपाणी सेवक याजकडील तकदमा होन पा १०० देविले असेत. हरदू ऐवज हुजुर पोहचऊन देणे. या कामाचा नफर विा दंडपाणी हेव. कयेदार यांस ४ होन देविले असेत.

शि. च. सा. ९ ले. ६८ }
सु. १०८७ रजब ५ }　　(२१३)　　{ श. १६०८ माघ शु. ७
{ इ. १६८७ जानेवारी १०

जिवाजी हरी सुभेदार व कारकून—देशमुख, अदिकारी, देशकुलकर्णी
सुमा किलेहाय तर्फ सुधागड　　व रयेत मामले घेऊळ

तुम्ही रायाजी सदक प्रभु सुभेदार मामले मजकूर व दत्ताजी विठल मजालसी सुमा याजबरोबर आपला मुदा घेऊन पाठविला तो आवघा आम्ही रा. मुधोजी गे सरसुभेदार नामजाद प्रांत घेऊळ व नरसों सुरों सुभेदार मामलेमजार वैठोनु कलामाचे कलम मनास आणून कौल तुम्हांस सादर केला. तेणेप्रमाणें तुम्ही येऊन गावाचा गाव मामुरा करणे, कीर्द...बेगमी करून... वाजवर स्वामिकार्यास हरकत किलबा सर्वथा न करणे. तुम्हास वरातदाराचा तगादा होता तोहि दूर केला. वरातदार तगादा लावणार नाही. हर एकविसी तुमचे चालऊनु.

इ. सं. गो. इ. सा. पृ. १ }
शा. श. भौम दिन }　　(२१४)　　{ श. १६०८ माघ शु. १५
{ इ. १६८७ जानेवारी १८

श्रीशंकराचार्य शृंगेरीमठ—अंतरज (कोकण) मसगुंद

(सर ज्योतिषी यांच्या धर्माधिकारत्वाबद्दल, पौरोहित्याबद्दल तसेच त्यांच्या निर्दोषत्वाबद्दलचें संस्कृतमध्यें पत्र.)

रा. खं. १८ पृ. ७९ }　　(२१५)　　{ श. १६०८ माघ वद्य ११
　　　　　　　　　　　　　　　　{ इ. १६८७ जाने. २९

देणे रदकर्ज नरस सेट उधाप्पा बकाल पेठ पाचाड कर्ज जमा पेठा हाय नजीक रायगड बा बखेर कारकून पेठमार छ २२ जवल तकदमा होन पा। ६० देविलें असेत आदा करणे पावलियाचा जाब घेणे; या अन्वयें धरात.

रा. खं. १५ ले. २८१ }　　(२१६)　　{ श. १६०८ माघ वद्य १४
सु. १०८७ रवल २७ }　　कौलनामा　　{ इ. १६८७ फेब्रु. १

नीलकंठ मोरेश्वर—सर्जाराऊ जेधा

तुम्ही गनिमाकडे जाऊन सेवा करिता. कोण्या भरास भरून गेलेत? बरें जे जाले ते फिरोन न ये. परंतु मुसलमानाची सेवा करतां तुम्हास कष्ट होतात. सांप्रत स्वामीचे सेवेसी येऊन कार्यभाग करावा. कष्टाची मुजरा होईल. सरफराजी करून घ्यावी. म्हणून कलो आले. तरी तुम्ही कदीम लोक, तुमचा भरवसा, रा. स्वामीचे बहुत अन्न भक्षिले आहेत. क्रिया धरुनु आणि याच-याचे केले तरी बहुत उत्तम केले. कदाचित गनिमाकडे गेले होतेस, त्या गोष्टी करिता यावयाचा अनमान कराल तर सरवस्वी न धरने, बेशक येणे. तुमचे बरे करणे मुमे होऊन सर्फराजी करून बहुत चालऊन. अंतर न पडे. समाधान असो देणे. आणि येणे. दरीबाब कौल असे. आज्ञाप्रमाण मोर्तब.

रा. खं. १८ पृ. ८१ }　　(२१७)　　{ श. १६०८ फाल्गुन शु. १
सु. १०८७ रवल २९ }　　　　　　{ इ. १६८७ फेब्रुवारी ३

कोंडाजी भोसले सर हवालदार—दुतसेट सेटया

इमारती किले पुरंदर

पावती—तुझे व जावसेटीचें भांडण. त्याचा नेतोजी राजे पालकर हवालदार किले मार ख्यानी निवाडा केला. व तुला सेटेपण देऊन सेरणी होन ५० बांधिली. ते जमा करून कारखाननिसीकडे बाकी ओढत होती. त्यावर किला आर्वामध्यें मोगलास दिल्हा. मोगलापासून रा. के. स्वामींनीं घेतला. अनाजी दत्तो मुरनीस यानी बाकी मनास आणून जिल्हेज १९, खमसामध्यें सनद चालती केली ती सीतामध्यें हुजरून बरात चालविली. सदरहू १३ रु. ७७॥ टके खुर्दा १५४८६ जमा जाले.

भीसं. के. ६७, ६८ फ. १०९६ रखर २४ (२१८) श. १६०८ फाल्गुन वद्य १० इ. १६८७ फेब्रु. २७

—सौ. रा. बाईसाहेब वाफळ. मोकदम कौ मसूर.

यात्रेस व खिंगणवाडीचे इनामास अभय असे. आमचे तर्फेने कोणी बाटे जाणार नाही. गावोगावी कागद पाठऊन यात्रेकरी बोलवून समारंभ करणे. देवाचे इनामस्थळ तुमचे आधीन आहे. प्रसाद पावला. मसूर येथील इनामापासून मोकदमानी पैसें घेतले म्हणून कळो आले. तरी ते फिराऊन देणे.

शि. च. सा. २ ले. २२२ सु. १०८७ रखर २९ (२१९) श. १६०९ चैत्र शु. १ इ. १६८७ मार्च ४

नीळकंठ मोरेश्वर—बाजी सर्जाराऊ जेधे देशमूख तर्फे भोर तर्फ रोहिडखोरे.

तुम्ही मुदा येकनिस्टता धरून आपले वृत्तीवरी यावे, सेवा येकनिस्टतेने करावी, मुलेमाणसे कबिला आणावा, अभये देऊन मस्तकी हात ठेऊन सेवा घ्यावी म्हणून कितेक वजेने सागोन पाठविला. तरी बहुत बरें. याहून काय बरें आहे. तुम्ही आधीच या प्रांतीहून नव जावे आणि गेलेस तरी ते सर्व अन्याये तुमचे, तुम्ही येकनिस्टता महाराज राजश्री स्वामीचे पायासी धरून आलिया माफच केले असेती. तुम्ही रा. स्वा. च्या अभयपत्राचा उजूर कराल तरी सहसा न करणे. तेहि पत्र अणून देउनु. तुम्ही आलियाने तुमच्या कबिल्याची, खायाखर्चाची विले मामला करूनु. देउनु. तुम्हांपासी जे लोक असतील ते घेऊन कबिलासह येणे. कबिला रोहिडागडी ठेऊनु तुम्ही आम्हापासी श्रीवर्धनगडी भेटीस येणे. भेटीनंतर तुमचा मुदामवाफीक सरंजाम अवघाच करून, तुम्हा बराबरी लोक येतील त्यांची विले करून. अभय असे. अन्याय कुल माफ असेत. येविसी आग्हास रा. पंत के. पंताचे पायाची आण असे. हा कौल.

रा. खं. १८ पृ. ७८ सु. १०८८ जवळ १६ (२२०) श. १६०९ चैत्र वद्य २ इ. १६८७ मार्च २१

दामाजी रघुनाथ सरसुभेदार याचा दतसेटी एलसेटी याचे नावाचा हकाविसी आहे यास श. ११०० पावेतों वर्षे ९७.

रा. सं. १८ ले. ५७ जवळ ३० भानुवासर वै. शु. २ } (२२१) { श. १६०९ वैशाख शु. २ इ. १६८७ एप्रील ३

मोरो भास्कर कारखाननीस किल्ले सिंहगड तकदमा होन पा। १५ देविले असत. आदा करणे पावल्याचा जाब घेणे, या अन्वये वराते

सं. २० ले. २१२ सु. १०८७ फ. १०९६ } (२२२) { श. १६०९ वैशाख शु. ३ इ. १६८७ एप्रील ४

होनाजी बाबाजी नागोजी बाबाजी—त्रिंबक काकाजी राघो काकाजी देशकुलकर्णी का सांगोला पा। माण

आपणास काळ कठीण पडला, पाठी कोन्ही नाहीं. यास्तव तुम्हापासून आत्मकार्यालागी घेतले होन ५००. घेऊन कर्याती सांगोलाचे देशांचे ४ थी तकसीम दिली. म्हणजे ऐन हक ४५ होन त्यांमध्ये ११।. गांव तोडून वाडेगाऊ ३, चिंचोळी २, पेठ वजिराबाद १ असे ६ आणि सोनंद ३, माणेगांव १ मडासिंगे होन २ पैकीं १ असे ५। मिळून ११। इनाम चाबूर ॥. १२॥. पैकीं चौथी तकसीम बिघे १८ तुम्ही खावे. व दर मोठेस मीठ ।. होन ८।. जुतेजोडा इ. जे उपेंद्र होईल ते चौथे; वृत्तीमुळे टका पडेल तो चौथा तुम्ही द्यावा. नवी वृत्ती साधेल त्यांतील निमी देऊ. सदरहू ठाणाचा महजर करून देऊं.

रा. खं. २१३ रखर १ ( ले. २२२ प्रमाणें ) ,,

का। भाळवणी, म्हैसवड, कासेगाऊ हे आपले वतन. पण एरी-सदार रेटून खातात. याकरता तुम्हास पाठीवा केले असे. आम्ही तिन्ही वतनाची देवखव करावी. तुम्ही पाठी राखावी. दरबारखर्च करून वतन सोडवावी व मग त्यांतील निमे देऊं. मान, नांव, बिकलम आमचे व दमाल मान तश्रीफ निमे तुमचे

शि. च. सा. १ ले. ६९ राब. १३ प्रभव गुरुवार जखर ४ सु. १०८७ } (२२३) { श. १६०९ वैशाख शु. ६ इ. १६८७ एप्रील ७

नीलकंठ मोरेश्वर यांची राजाज्ञा—बाजी घोलप मुद्राधारी व लेखक किल्ले पुरंदर

वे. शिवभट पुरंदरे यांनी विदित केले कीं, पूर्वी कै. स्वामीनी आपले पिते (दादंभट) व चुलते रामभट यांसी श्रीपुरंदरेश्वर व केदारेश्वर यांचा

प्रत्यही अभिषेक करावयाची आज्ञा केली होती व प्रत्येकास प्रतिवर्षी होन ५ पा। पोतांतून पावत आले. त्या उपरी पुरंदरगड मोगलास देवविला (श. १५८७) त्या दिवसापासून अभिषेकाची मोईन पावत नाहीं. तरी देव जागृत स्थान नंदादीप नैवेद्य चालत आहे आणि अभिषेक मात्र चालत नाहीं. तरी केदारेश्वराकडे नारायणभट व पुरंदरेश्वरास शिवभट अभिषेक करतील व स्वामीस आसीर्वाद देतील. मोईनहि देत जाणें. नैवेद्य भटगोसावी यांचे नियमाने करून समर्पित करावा. गुरवाकडून न करणें. पेस्तर स्वामीची सनद सादर होईल.

रा. खं. १८ ले. ५७ }
वै. शु. ६ जखर ४ }
गुरुवासर }

(२२४)

{ श. १६०९ वैशाख शु. ६
{ इ. १६८७ एप्रिल ७

तुम्हा चुलता गोपाळ शेट—असें ज्यालती लिहिलें आहे. या देणे वर्षासन त्र्यंबकदेव गोसावी किले राजगड यास तकदमा होन पा ७५ देविले ते आज्ञा करून जाव घेणे; या अन्वये वरात.

रा. खं. २० ले. २१ }
फ. १०९६ अखेर साल }

(२२५)

{ श. १६०९ वैशाख
{ इ. १६८७ एप्रील मे

सुभे औरंगाबाद ऊर्फ दखन मधील पा—सुपे—याचा सेख महमद बकर दिवाण या मार्फत तहसील बा। हवेल वसूल ६५५७॥ गांवे २८. (सामराज काटे देशमूख यांची मुद्रा.)

खं. २० ले. २६० शक प्रभव }
फ. १०९७ साबान १२ ! }

(२२६)

{ श. १६०९ ज्येष्ठ शु. १
{ इ. १६८७ मे २

महिमाजी राजे वलद — वे. रा. दामोदरभट धर्माधिकारी
माणकोजी राजे सिंदे पुणतांबे

तुम्हास पुण्यस्तंभीचे पुरोहितपण दिधलें.

० साबानाची १२ ता. ही या पत्रावर कां आली ?

रा. खं. १८ ले. २९ }
फ. १०९७ }

(२२७)

{ श. १६०९ ज्येष्ठ
{ इ. १६८७ मे

बाद जालीक जागीर तुळोजी शिंदे जागीरदार पा पुणे सालगु॥ सन हजार १०९६ बा। तुमार रु. २१७॥।= रासपैकी बजा सालगु॥ माबकाते

विठल गंगाधर सेखदार व कारकून गुमास्ते मा।इले बा शाळ देहे बाद इ. रु. १०८।।।≡ राख.

इ. इ. १८३७ पृ. ३०० }
हि. १०९८ रजब २६ } (२२८) { श. १६०९
{ इ. १६८७ मे २९

सेखनिजाम हा संभाजीस संगमेश्वरी पकडणारा ह्यास औरंगजेबानें (तकरीबखान नव्हे) मुकरबखान असा किताब दिला. मुस्ताइदखान कृत मआसीर अलमगिरी.

शि. च. सा. २ ले. ७६ }
मु. १०८८ रमजान } (२२९) { श. १६०९ आषाढ
{ इ. १६८७ जून जुलै

रायाजी सामराज—खानगौडा देसाई पा। लक्ष्मेश्वर व नाडगौडा किले कोपल

तांम्रानी विजापूर घेतले आणि कोपल भुजबलगड प्रांतीं तांम्राची ठाणी येउनु कितेक मुलूक कबज केला व कितेक गड पालेगारानी घेतले. रजबखान याणेही कितेक माहाल कबज करून ठाणी गडकोट घ्यावे येसी धम करूं लागला ते प्रसंगी किले कोपल व किले बहादुरबंडा हे दोन्ही किल्याची बहुत जबुनाई जाली होती. तेथामध्यें तुम्ही आपणाकडून कांहीं गला दोही किल्यावरी घातला. दोही किल्याचे हशम होते ते कितेक पलोन गेले. म्हणून तुम्ही आपणाकडून हशम पाठऊन मजबुदी केली. स्वार ठेविले. आणि छत्रपतीच्या पायासी येकनिस्टता धरूनं हें केलें. त्या उपरी आमच्या लश्कराच्या फौजा घेऊन आम्ही आलों. आणि किल्यांची बेगमी करावी तसी केली. तुम्ही बहुतच येकनिस्टपणें वर्तोन दोन्ही किल्यांची मदती केली येसे पूर्ण कळों आलें. त्यावरून कृपाळू होऊन अलवंडी किले कोपल हा गांव म-न्हामत करून इनाम दिला.

ऐ. सं. सा. खं. ५ ले. ३८ }
स. १०९७ जुलूस ३१ रमजान ९ } (२३०) { श. १६०९ आषाढ शु. १०
{ इ. १६८७ जुलै १०

सुंदर पाटील, मना चौगुला व समस्त }
रयत मौजे बोसीतूर पा। आसेर } —फौजदार परगणे असेर

वायेदा लिहून दिल्हा जे, साहेबाचे फौजदारीत आमची ढोरे म्हेसी वगैरे चरतात. ऐसियास आपुन रुपये मा। रु. २५ कबूल केले असेत. आपनास ठाणेदाराचे नावे परवाना होये की याना जंगलात ढोरे चरू देने. जे वेलेस परवाना आम्हाजवळ पावे ते वेलेस पैसे बिला उजूर देऊन.

रा. खं. २० ले २१४ } (२३१) { श. १६०९ आषाढ शु. १४
शक } { इ. १६८७ जुलै १३

पांडुरंगभट बिन नागोहरि—बाळकृष्णभट नागेशभट काळे आपणास न पुसता आपली व आपाजी शिवाजीची तकसीम मिरासी करून दिधली काय सबब. आपणे व बापाने ते सेत केले नाहीं. रायाजी जनार्दन जागिरदार यांपासून पैका न घेतां उगेच लेहून दिधले. तेधवा त्रिंबक वाडिवा व निरा आराध्या बोलिला जे त्याचा भाऊ भिकाजीची आमची आणभाष जाली आहे. आम्ही दिधलियाने तिही दिधलेंच आहे. त्यास याच्या दोन्ही तकसिमा येही दिधल्या नसता आपण स्वहस्त केले तरी महाराजे याचे यासी फिराउनी दीजे. मार्गेस्वरी पौर्णमासीचा वाइदा केला असे. यासी चुकोन तरी आपला बाप नागो हरी सोडउनू घेईल.

रा. खं. २० ले. २२ } (२३२) { श. १६०९ श्रावण शु. १
शक प्रभव } { इ. १६८७ जुलै ३०

मालजी रामजी यादव—गोपजी रागोजी यादव
मोकदम माळशिरस मौ माळशिरस

वृत्तिपत्र दिधले जे काळ थोर पडला, गांव खराब जाला, कितेक सुजोन मेलो, कितेकाची घरे बुडाली, कितेक उठोंन देसावरी गेली, आपला लेक रामाजी व सुभानजी देसावरी पोटासाठी सुजोन मेला. आपली बाइल मरोन गेली. आपण व सून दोघे उरलो. अन्न मिळेना, हातपाय सुजले कोण्ही हाती धरीना. मग आपणापासी मोकदमीच्या सनदा, व वतनाचे कागद होते ते दरम्यान बुडतील म्हणून हर कोण्हास नाक नागर शेत घर देण्यापेक्षा तुम्ही आपला बाप भाऊ तैसाच आहेस म्हणऊन देशमूख व देशपांडे व गावीचे जे कोण्ही वाचली आहेत त्यांचे गोहीनसी व हमशाही गावीचे मोकदमाचे गोहीनसी आपले वडिलाची मिरासी हक लाजिमा आहे तो तुम्हास दिधला असे. जोवरी वाचोन तो अन्न वस्त्र देणे. मेलियावरी मुठीमाती देणे आणि वतन मिरासी खाणे. आपणास वतनास संबंधु नाहीं. आपले भाऊबंधु, आपला लेक वांचोन आला तरी त्यासी संबंधु नाही. काळीवरी पांढरी तोवरी वतन खाणें. हिला हरकती करील तो दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा अन्याई (५ गोही.)

सनदापत्रें पृ. १६६ ले. ८ } (२३३) { श. १६०९ श्रावण शुा ६
राजश १४ प्रभव गुरुवार } { इ. १६८७ आगष्ट ४

राजा शंभू छत्रपती—सुभेदार, जुमलेदार, कारकून, हवालदार, सारगीर, अफराद, बाजे लष्कर, हुजुरात, सुभे हाय व हशम,

मो. चिंचवड प्रांत पुणे हा गांव श्रीदेव यांकडे चालतो. तेथें आपल्याला कांहीं उपद्रव देऊं नये अशी स्वामींची पहिल्यापासून आज्ञा. असे असतां तुम्ही रहदारीस नाहक दरपत्ती करता, उपद्रव देऊन धामधूमहि करितां. रयतीकडून गैरसनदी मनास येईल ते मागत होता म्हणोन कळों आलें. तरी हे ढंग स्वामीस कैसे मानो पाहतात. याउपरी ही बदराहा वर्तणूक केलिया तुमचा एकंदर मुलाहिजा होणार नाही. जो धामधूम करील त्यास स्वामी जिवेच मारितील. हें जाणून मौजे मजकुरास तसदी न देणें. ताकीद असे.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. २६ ले. ५६<br>फ. १०९७ सवाल ९ | (२३४) | श. १६०९ श्रावण शु. १०<br>इ. १६८७ आगष्ट ८ |

—राजेसाहेब

साल गुदस्ताप्रमाणें या वर्षी आवर्षण झालें आहे. सर्व प्रजा हवालदील आहेत. इकबालपनाह मुनाशी यांच्या इष्ठोत्पत्तीस हें सर्व आलें आहे. आपल्या रकमेची तरतूद जहागिरीतून व हंगामाच्या वेळेपर्यंत होईल. जहागिरीबद्दल इतर कांहीं मनांत आणूं नये.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १५ ले. १४९<br>रा. श. १४ प्रभव | (२३५) | श. १६०९ श्रावण वद्य १०<br>इ. १६८७ आगष्ट २२ सोम |

शंभु छत्रपती--येसाजी मल्हार देशाधिकारी व देशलेखक प्रांत वांई

श्रीसदानंदमठ कसबे निंब यासी कै. स्वामीच्या वेळेपासून अन्नछत्राबद्दल ऐवज चालिला आहे. स्वामीनेही आज्ञा केली. सांप्रत कारकून हेंगे करितात. म्हणून आनंदगिरी याणी लिहिले. तरी मधें ऐवजाचे कुसूर करावया काय गरज. तरी सुरती न करणे मोईन चालो देणे. धर्म-कार्यास खलेल न करणे.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १५ ले. १३<br>श. १६१० प्रभव<br>सुा १०८८ जिलकाद ७ | (२३६)<br>क्रयपत्र | श. १६०९ भाद्र. शु. ७ रविवार<br>इ. १६८७ सप्टेंबर ४ |

बाबाजी गंगाजी व माणकोजी रावजी—महादजी सुलतानजी पाटील जगदळे व माहादजी नरसो व पाटील जगदळे सूर्याजी बापूजी पा जगदळे शिरवडे

१०

तुमचा आमचा मूळ पुरुष व घराणें एक. तुमचे वाटणीस मसूर व आपले वाटणीस शिरवडे. तुम्ही राजगडास ( रायगड, खं. १५ ले. १० पृ. १२ ) गेलेवी. मावे हरबाजी अजहत देशमूख यांच्या पाठिराखेमुळें नाइकवडे कुणबी यानीं आमच्याशीं पटेलगीसी कथळा केला. नाइकवडे आपणासी रेटेनात. दुसरियाने येऊन पटेलगी जोराबारीनें घ्यावी ! मौजे मारची पटेलगी निमे तुम्ही खावी व नाइकडियासी वाद सांगावा. आपण पाठी राखावी. ऐसा तह करून वाद सांगितला. नाईकडे दूर केले. ते प्रसंगी हरखीचे आमचे वरील होन ५० तुम्ही दिल्हे व पोटाकरतांहि होन ५० दिल्हे. याबदल वडील-पणाची पानतश्रीफ, माहारनागर, हदमहदूद पांढरीवरी जे उत्पन्न येईल ते निमे दोनी ठाई तारोतार वाटून द्यावे. गांव समायीक लावावा. त्यासी फावेल त्याणें लावणी करावी. एकाची मोडी एकावरी न घालावी. आपल्या माऊ-पणामध्यें दुसरें दिशों न द्यावें, आपण आधीं पान व नागर घ्यावें, मागे तुम्ही; बाबाजी पाटिलाची विल्हेच्यानी हरकती केली तरी बाबाजीनें सांभा-ळावें. माहादाजी पाटिलाच्याने आपले सांभाळावें. हिला हरकत कोणी करणार नाही. श्रीची व वडिलाची आण.

शि. च. सा. ६ ले. ७८ } ( २३७ ) { श. १६०९ कार्तिक शु. २ नंतर
हि. १०९९ जुल्स ३१ } { इ. १६८७ आक्टोबर २८ ”

नुरुद्दीन—मामले बंकापूरच पेठेचे अमलदार व देशमूख देशपांडे

सैद आदम करीम सर्जा व खानगौडा लक्ष्मेश्वर सरनाडगौडा सर-कार मामले मजकूर व गैर माहालानिहाये यानी सरकारचे फौजाचे सामील होऊन पादशाही कामावरी रुजुवत जाहालेबदल यावरी मेहेरबानगी फर्माऊन याचे वतन सोगूर हें इनाम गांव आणि इनाम जमीन बमोजीब देसाई मामले मार व वर्तना व गैर साबक सरनाडगौडकी ता पेठ कसबा, कोटिगेरा व आमदकणा केचकेरा, काजीपूर, येतमादपूर, इभराईमपूर देखील सी मबरे दुमाला करून दिल्हे.

ले. ७९ ( ले. ७८ प्रमाणें ) पादशाही किलेचे गिर्दनवाई गनीम येऊन ताख्ततारास करिता वख्ती तुम्ही आपले जमाऊ समेत येऊन गनिमास तंबी पोहाचाविलेवरी. इनाम दिले.

शि. च. सा. ६ ले. ७७ } ( २३८ ) { श. १६०९ कार्तीक शु. २ } नंतर
हि. १०९९ जु. ३१ नंतर } { इ. १६८७ आक्टोबर २८ }

नुरुद्दीन—सैद आदम करीम सर्जा व खानगौडा लक्ष्मेश्वर सर-नाडगौडा बंकापूर वगैरे महालानिहाये

तुम्ही पादशाही कामावरी रुजवात राहोन हमेशा गनीम आले वख्ती कुमक पोहचाऊन खिजमत केले. बजल पेठ कसबा येतमादपूर, कोटिगेरा व आमदकणा व कचणकेरा, पेठ इभराईमपूर दो सीमबरे तुवाका करून दिले. तरी इनाम जमीन बमोजीब देसाई मामले मार व वर्तना व गैर साबक जेणे बमोजीब चालत आहे तैसे आपुले मिरास भोगवटा करून पातशाही कामावरी साबूत कदम राहाणे व चीनवल व गैर साबकबमोजीब भोगवटा करून घेणे.

शि. च. सा. ९ ले. ७१ } (२३९) { श. १६०९ कार्तीक शु. ४
सु. १०८८ मोहरम ३ } { इ. १६८७ आक्टो. ३०

(ले. ७० प्रमाणें) रयतेस कौल, देशमुखांनीं सांगितल्यावरून दिला. —घरटका, मीठटका व बाजे बाबती व महसूल माफ केला पाहिजे. तरी मीठटका घेऊन घरकड येक साला माफ. १ कोटवाडा खासगीमधे येक दोघ सोनार धरून नेऊन तकदमा अगाऊ पैसे नेले आहेती. तरी जाले ते जाले. याउपरी तसवीस लागो देणार नाहीं. १ शाहारामधे दिवाण लोक कामे करवितावी त्याची मशाखत देत नाही. तरी ताकीद करून मशाखत देववून १ दारी एक दोन माड आहेवी. साहेबीबदल मामुरी देणे माफ केले पाहिजे. तरी येक साला देणे माफ. १ वेट बेगार रायगड, खादरी, कुळावा, सागरगड, पदूमदुर्ग हे आमच्याने करवत नाही. तरी शाहाराखेरीज दुसरे जागा तुम्हा कोन्हास पाठवणार नाहीं. १ शाहारातील आम्ही सोनार मुलकात फिरावयास जातो. भलताच किलेकरी व नामजाद लोकामधेच धरून, धासदपट करितो, कांही दाणादुणा रुका अडका असतो तो घेऊन जातो. ते माफ पाहिजे. तरी दरम्याने तसवीस लावील त्याचे ठावठिकाण हुजूरेच ठाई पाडूं. मामलास येणे पारपत्य होईल. १ आम्ही शाहारात मामूर जालियाने वस्ती करून उदीम चाले ते माफीक खंडणी पाहिजे. तर बहुत बरे. येण्हेचप्रमाणे. चालऊन. येण्हेप्रमाणें कौल असे येण्हेप्रमाणेच हुजूर राजश्री पंत स्वामीचे सेवेस बखेर सुभास लिहून कौल आणऊन.

शि. च. सा. ९ ले. ७० } (२४०) { श. १६०९ कार्तीक शु. ४
सु. १०८८ मोहरम ३ } कौलनामा { इ. १६८७ आक्टो. ३०

दिवाण मामले मूर्तजाबाद ऊर्फ चेऊळ—सराफ कसबे चेऊल तुमचे बाबे देसक मामले मजकूर मामला येऊन मालूम केले की सन सीतामधे गनीम राजापूरकर येऊन शाहार जाल हाल करून गेले. ता मजकूरचे सराफ परागंदा होऊन जागाजागा गेले. तरी साहेबी सराफावर मेहेरबानी करून मकसूदप्रमाणे कौल दिलिया सराफ शाहारामधे जाऊन ताफा मामूर करितील म्हणोन

कौल. १ उदीम मशाफीक बारमाही उसूल घेऊन साल मजकुरी देणे माफ. १ दिवाणाकडे मामलाकडे कर्ज असत आहे ते हातीं आलियावर उदीम व्यापार करून साहेबाचा ताफा मामुरा करूं. तरी हिसेब मनास आणून साल मजकुरी विल्हे करून देऊं. १ आम्ही पोटाचे दाणे तगाव्याबदल ठेविले होते ते दिवाण लोकानी नेले. तरी बाजे लोकांचे नेले, त्याची विल्हे करून त्याप्रमाणें तुमचीही विल्हे करू. १ घरटका, मीठ, दारमाड याचे देणें याची तसवीस न लाविली पाहिजे. तरी मीठटका घेऊन घरकड साल मजकुरापासून माफ. १ शाहार मामुरी जाहलियावर वस्ती करूं. हर कोण्ही सराफ म्हणोन कर्जवाम उसनपावनें मागेल. तरी कर्ज कोणी नेदावे. दाट जोरें कोणी कर्ज मागेल त्या हुजरून ताकीद करऊन.

सदरहूप्रमाणें कौल असे. सुखे शाहारात घरे बांधोन बसाहती करणें. येणेप्रमाणें मकसुदाच्या तालिका हुजूर लिहून राजश्री पंताचा व सुभेदाराचा कौल आणून देऊ.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. १ के. ६९ | (२४१)<br>कौलनामा | श. १६०९ कार्तिक शु. ४<br>इ. १६८७ आक्टो. ३० |

दिवाण मामले मूर्तजाबाद चेऊल—रयती मोखतसर बागायेत मा अगर चेऊल

तुमचे बाबे मामले मारचे देशमूख मालूम केले की, सन सीतामधे गनीम राजापूरकर येऊन शहर जालहाल करून गेले. याकरतां कुल रयत परागदा जाहाली. शाहर दोन बरशे खराब पडिले, वसाहत नाहीं. राहट, राहटबड व घरे व देउलें मोडून गेली. तरी अजी ता वसूल जाला तो जाहाला, बाकी उरला त्याची तसवीस लागणार नाही. पेस्तर साली पाहणी करून होईल. बेरीज ते साकपावेतो वसूल घेऊन जागा नाही त्यास कर्ज, बैल नाही त्यास बैल देविला पाहिजे तर मवसर मनास आणून तुमचा आभा पाहून देऊन; इत्यादि २१ कलमें.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. २ के. ३०७<br>शक प्रभव संव. | (२४२) | श. १६०९ कार्तीक शु. ५<br>इ. १६८७ आक्टो. ३१ |

आपाजीभट भाग्य—त्रिंबकभट व कृष्णभट धर्मांतकारणी
मौजे पिंपलई　　　साकीन का नाशीक

फारखती केहोण दिधली जे, तुम्ही पाच जन भाऊ मिळोन आपणापाशी खेबी गाहाण ठेविली होती. रु. १५० घातले होते. त्यास गाव बिघ-

देषी, राजूर, फामतवाडे येसे ठेविली होती. त्यास तुमचे भाऊ त्र्यंबकभट व कृस्णभट, मोरेस्वरभट व अनंतभट व बाळभट याचा वनाच्या नांवाचा रोखा आपणापासी होता तो गयाळ जाला. तुम्ही आपणास रु. वसूल केले- तपसील त्रिंबकभट १००, कृस्णभट रु. ५० सेदिडे भरून पावलो. त्यास तुमची खेडी तुमचे हवाला केली. काळकला रोखा पत्र निघाला तो रद्द असे. सही वो शंकराजी नागनाथ कुळकर्णी.

राम. दासी ४२ ले. ४६ } (२४३) { श. १६०९ मार्ग. शु. १२
सु. १०८८ सफर १० } { इ. १६८७ डिसें. ६

दीवान चेल जनराळ इंग्रेजात— माहाराज राजश्री संभाजी राजे छत्रपती हिंदुस्थान मुकाम जंजिरे

आम्ही खैर आहों पण आपलेकडील चंदरोज गुजरले पत्र आले नाहीं. पंडित नीलकंठ मोरेश्वर प्रधान यानी कलमी केले की, 'हबसी गनीम खाडी-तून येऊन आमचा मुलूक मारतो. आणि तुम्हामध्ये व महाराजामधे कदीम दोस्ती त्यावरी नजर देऊन दर्यामधे खाडी राखोन गनीम पैस होऊ न द्यावा.' आणि पंडित त्रिंबक गोपाळ हेजीब पाठविले. सह केला की, 'तुम्हास खर्च बसेल त्यास आम्ही आपल्या मुलकातून ५० ह. रु. नख्त आणि २ ह. मुडे मुंबईप्रमाणे भात देऊन. तरी तुम्ही दर्यामधे खाडी राखा. आम्ही खुशकीवरी मजबुदी करून खुशकी राखोन.' यांप्रमाणें आम्ही कबूल केले व बडे ज्याहाज व बोटी गलबते अरमार पाठवून खाडी बंद ऐसा केला गनीम फाचकले पावेना. आणि छत्रपतीचे लोकानी खुशकी राखावी ते मोकळीच टाकिली. आज तीन महिणे जाहाले. आमचे लोक सिकस्ता हैरान परेशान होऊन कितीएक जखमी होऊन पडले. कितीयेक गनिमाचे लोक पडले. खर्चास देऊ केले ते पोहचविले नाही. आमचे लोकाचे अडिसेरी यास भात देविले होते तेहि सेभर मुडे पावले, बरकड काही पोहचत नाही आतां हानीचा वाव येई तोवरी १५ रोज पावेतो राखो. मग खर्चास पावले नाही. लोकास अडिसेरी भात पावे आणि इंग्रेज लोकाचा खर्च वेगळा. याबद्दल आम्हास लोकाचे मुशारे-खेरीज २० ह. असर्फी खर्च जाहाला आहे. आणि पुढेहि किती म्हणून करावा. १५ रोजांत जाब आला तरी खूब; नाही तरी आम्ही आपले आरमार बोला-वून आणून. मोहिबा बोलतील की, पैकियावरी नजर देता. तरी तैसे नाही. आधी मोहियाचा लोकासी पहिले काम पडिले आहे; बोलाचा भरवसा नाही. अमा दोस्तीवर नजर देऊन आजीवरा या कामाची शर्ती केली. मालूम होणे ज्यादा काय लिहिणे हे कितावत.

रा. खं. १५ ले. ४२२ }　( २४४ )　{ श. १६०९ पौष शु. ७
शु. १०८८ रबल ५　　　　　　{ इ. १६८७ डिसें. १०

कृष्णाजी राजे भोसले—कारकून, नाटेकार, रयान व कुलकर्णी
संमत मा।र

वे. रामेश्वरभट बालभट उपाध्ये आरवीकर यासी पुष्य शुध सप्तमी शुक्रवार मकरसंक्राती पर्वकाली सर्वमान्य भूदान धारादत केले नजिकाणी १ दिवळी तरी सदरहू जमीन मौजे मलेनूर सा मजकूर बा इनाम. रतन-तिमला लग पैकी कुळबाब कुल कानुची दुमाले करणें 'दानपालनयो०' व 'स्वदत्ता द्विगुणं०' हे दोन श्लोक.

रा.खं. १८ ले.३० }　( २४५ )　{ श. १६०९ (ज्येष्ठ)
शु. १०९७　　　　　　{ इ. १६८७

'तुमार जमा पेशकशी मुतालब बार जमे देशमूख व रामचंद्र बावाजी देसपांडिये पा पुणे सा जुनर सुमे अवरंगाबाद अज बा रसूल बहतफाक शंकराजी कृष्ण गुमारते आऊजी कान्हो नाईक रकूयत पऱ्हा मिर्जा मुकुरुला बेग बा परवाना पो हा अवल साल ता अखेर साल अप देह २९० पैकी वहरान मुतळल देह, आबाद देह, मोकरा साक तमाम जमा बेरीज रुपये ३६२॥

रा.खं.१८ ले.३२ }　( २४६ )　{ श. १६०९
(शु.) फ. १०९७　　　　　{ इ. १६८७

हकीकत देह आबा देहाय पा पुणे अज देह २९० पैकी फौजदार याचे ताल्लुक ता 'पाटस ४३, ता नीरथडी ३७, (बाकी देह) २१०. पैकी आबाद जुज जुजी देह हवेली ४०, सांडस ५, कऱ्हेपटार १३, मावळ १२=७०. राष देहे १४० सायीक वहरान ६३.

रा. खं २० ले. २४ }　( २४७ )　{ श. १६०९
फ. १०९७　　　　　　{ इ. १६८७

तसलमात रोखा, सामराज काटे मनसबदार देशमूख व देशपांडे पा सुपे. रु. ३०० बाबत महसूल माहाल पायबक सरदार अहमदनगर वगैरे बाबत तहसील, मसीलतपनाह महमद शरीफ करोडी सरकार मजकूर, आपणापासी अनामत आहेत. एकरार केला जे सदरहू रुपये बदल खजाना अमरे सुबे अवरंगाबाद करून वमोहर, मदसवियान खजाने आणून

रा खं. २० ले. २३ } (२४८) { श. १६०९
फ. १०९७ } { इ. १६८७

हुमार बरदास्ती बजोर ताजदी देहाय पा। सुपे सा। जुनार महाल पाय-बाकी खालीसे शरीफे रफायतपनाह हणमंतराऊ ठाणेदार ता। बारामती पा। मजकूर याने बजोर ताजदीने धरून नेऊन पैके घेतले बमारफाती मा। हा। रु. ११७३ ह.

रा. खं. २० ले. २५ } (२४९) { श. १६०९
फ. १०९७ } { इ. १६८७

हुमार बरदास्ती बजोर ताजदी देहाय पा। सुपे सा। जुनर खालीसे शरीफे माहाल पायबाकी कारणे तहवर दस्त गाहा एकवलमनाह काकडखान फौजदार पा। पुणे सा। मजकूर याने बजोर ताजदी करून नेऊन पैके घेतलें तहसील बमारुफाती शिवाजी शेलगे मु॥ लोणी गु॥ मा॥इले रु. २०७४।= वसूक गांवे ९.

खं. २१ ले. ४५ } (२५०) { श. १६०९ पौष शुद्ध १४
सु. १०८८ रवल १२ } { इ. १६८८ जानेवारी ६

प्रल्हाद निराजी न्यायाधीश—गंगाजी दादाजी सुभेदार व कार-कून प्रांत राजापूर.

ता। देवरूख येथील देशमुखीचा वेव्हार तिमाजी ना। कान्होवा ना। देशमूख यामध्यें व रामाजी गोविंद यामध्यें वेव्हार लागोन हुजुर भांडत आले. छंदोगामात्य याही मनास आणोन निर्वाह केला की, रा. छ. स्वामीचा तह की ज्याचे वृत्तीस ३०।३५ वर्षे भोगवटा चालला असेल तोच खरा. तरी तिमाजी ना। खरा. रामाजी गोविंद नवाच कथला करतो. त्यास कथळा करावयास समंध नाहीं.

खं. २१ ले. ४६ } (२५१) { श. १६०९ पौष वद्य १
सु. १०८८ रवल १४ } { इ. १६८८ जाने. ८

कविकलश छंदोगामात्य—गंगाजी दादाजी सुभेदार व कारकून प्रांत राजापूर

(ले. ४५ प्रमाणें) तिमाजी व रामजी यांचील वृत्तीचा कथला प्रल्हादपंत न्यायाधीश यांस चोकसीनें मनास आणून निवाडा करण्यास सांगितला. त्याणी तिमाजीसच वृत्तीचा संबंध; रामाजीस निसबत नाहीं ऐसा निर्वाह केला व पत्र पाठविले. त्याप्रमाणे वर्तणूक करणे. पो १० रखर (माघ शु. १२ फेब्रु. ३)

खं. १५ ले. १५१ } (२५२) { श. १६०९ पौष व. ४
सु. १०८८ रवल १७ } { इ. १६८८ जाने. ११

खेमाजी घोरपडे मोकदम मौजे—वी. रा. आनंदगिरी बावा
सायगांऊ ता मेढे सुभा जावली स्वामी

स्वामीचे अणछत्र आपले वडिलाचे संकल्प आहे जे, प्रतीवसी बारीक भात ८१ देवावे ते आपणापासून राहिले तरी मठी अणून देत जाणाईन हे आपले व तुमचे इनाम.

इ. वृ. १८३८ पृ. १३१ } (२५३) { श. १६०९ पौष वद्य ३०
शक प्रभव. भानुवासर } { इ. १६८८ जाने. २२

शहाजीराजे यांची स्त्री—पाळंभट आरवीकर उपाध्ये
नरसाबाई

अर्धोदय महापर्वनिमित्त परमेश्वरप्रीत्यर्थं तोरपाडी हें पूर्व नांव प्रस्तुत नांव नरसांबपूर ता तायेनूर पा वेंटवाल प्रांत त्रिणामल सहिर ण्योदक धारादत्तं अग्रहार दान दिले, या गांवी क्षेत्रे केली २३ त्यामध्ये तुम्हांस येक क्षेत्र न(ज)जीपुजी व तोप व झाडझाडोरा व सुवर्ण अदाये व धान्य अदाये अक्षणी आगामी सिद्धीसाध्य अस्ट भोग तेजसाम या सकळ समुदाय-सहित दिले पुत्रपौत्र पारंपर्य आचंद्रार्क सर्वमान्य फल भोगवटा घेऊन सुखी असिले पाहिजे. दानपाळनयो० इ. ३ श्लोक.

सनदापत्रें पृ. १६५ ले. ७ } (२५४) { श. १६०९ पौष वद्य ३०
शक प्रभव } { इ. १६८८ जाने. २२
सु. १०८८ }

हरजी राजे महाडीक चंदी—श्रीनिवासाचे नरहराचार्य
पैठणकर.

महोदय पर्वकाळी मो. अकंडनेलूर तर्फ अयूर परगणे त्रिकोलीर, सरकार त्रिणामळ प्रांत कर्नाटक हा गांव कुल बाब कुल कानु जंची व पुंजी हलीपटी व पेस्तरपट्टी. चालवावें. मोगलाई तर्फेनेही पत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चालविले पाहिजे. म्हणून तुम्ही विनंति केली.

राम. दासी ४२ ले. ४८ } (२५५) { श. १६१० माघ शु॥ ४
सु. १०८९ } { इ. १६८९ जाने. २९

राजकोट किले दिवाण सरकार—खोत, पाटेल व मोकदम,
ता॥ श्रीगांव.

आपाजी महादाजी अधिकारी प्रां मजकूर यांस काजिमा पावत असतां दरम्यान तानदरिया बिन लखमतरिया हरकत करतो, देत नाही. लखमा धरमा देत असे आणि ताना मजकूर हरकत करितो. तरि ताकीद करून ज्या मोजीब पेश अजी देत आला. त्या मोजीब देत जाणे. हरकत करील तर हुजूर पाठवून देणें.

रामदासी ४२ ले. ४७ } (२५६) { श. १६०९ माघ शु. ८
सु. १०८८ रजर ६ } { इ. १६८८ जाने. ३०

येसजी फर्जंद—मख्तसर खोत रामाजी भानोबा इ. समस्त मामले मूर्तजाबाद ऊर्फ चेऊल

रामाजी महादेव हवालदार सर देशमुखी प्रां मजकूर यानी सांगितले की, कुल रयेती लोकावरी ज्याजती मुरड घातली आहे व कितेक किलेकराची व लस्कराची धामधूम पडली ते दूर केली पाहिजे व जो धारा त्याची पाहणी करून जमाबंदी होईल तेणेप्रमाणें घेतले पाहिजे. तरी हे अभय पत्र कीं, किलेकोटाची तसवीश लागणार नाहीं. हकहिशाबी जे, तेच घेतील. कोणे गोस्टीचा तसवीश व आजार लागणार नाहीं. फिकीर न करणें. गावावरी येऊन कीर्दी करून सुखरूप राहाणें.

इ. वृ. १८३५ पृ. २१२ } (२५७) { श. १६१० चैत्र शु. १ गुरु.
विभव संवत्सर } { इ. १६८८ मार्च २२

शंभुछत्रपती—धर्मांजी नागनाथ मुख्य देशाधिकारी प्रांत मामले फोंडा

सामनायक तिमनायक यानी विनंती केली मुसलमानाच्या राज्यामध्ये तरी अंत्रुजेसी अंगभाडे घेत नव्हते. तेणेकरून व्यावहारिक लोक सुखे येत. राजग्रही हासिल होय. आतां हे हिंदु राज्य जाहालेपासोन आंगभाडे घेऊं लागले, हासिलासि धका बसला. तरी मना करावे. तें प्रमाण जाणून भाणस्तरी, पारवगवि, मांदुस येथील आंगभाडे दुडुवा अर्ध फोसी, चौदा दुडु घेत ते सोडिले. सहसा धर्मकृत्यास नाश करूं नये. करितील त्यास महापातक आहे.

शि. च. सा. खं. ६ ले. ८० } (२५८) { श. १६१० चैत्र शु ३
सु. १०८८ जमर १ } { इ. १६८८ मार्च २४

रायाजी सामराज—श्रीनिवास वेंकटाद्री देसाई पा गदग, व नाडगौडा किले दादावी

येखतयारखान सौदागार पा मजकुरी राहात आहे, त्याने घोडियाचे खरिदीबदल मस्कत बंदरास गेला होता. घोडे खरेदी करून राजापूर बंदरास आले. तेथे दिवाण लोकी अगदी जाहजपैकी ९ घोडे कैद केले. त्यामध्यें आमचे स्वारीस घोडे आणावयास सांगितले होते. तरी स्वामीने रा. बावा स्वामीस विनंती करून सदरहू घोडी येतशारखे केले पाहिजे. म्हणऊन हणमंतराऊ हेजीब लक्ष्मेश्वरकर याने बाबा स्वामीस विनंती केली जें, हे सौदागर आमचे यजमानाचा बहुत स्नेहीत. सदरहू घोडियाचे बहुत आगत्य, म्हणून बहुत प्रकारें विनंती करून घेतां कृपाळू होऊन ९ घोडियाचा निर्वाह लक्ष्मेश्वराकडे करून दिघला आहे. गोसावीयांचे कार्यास अंतर न पडे. परंतु अगोचर हा प्रसंग निवडला आहे.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. खं. ६ ले. ९<br>जुलूसशाका ११ जखर ११ | (२५९) | श. १६१० चैत्र शु. ११<br>इ. १६८८ एप्रील ३ |

—देशमूख, देशपांडे, मोकदम देहाये पा रायेर हुवली

हुजुरून हसबल हुकूम आहादी येथे येऊन बैसले आहेती. येसियास फौज तयार होऊन येत आहे. तरी तुम्ही रयेत पातशाही आहा. त्यास माफूक करून सांगोन त्याचा आमल फैला तेथे न राहे व जे कोणी हुजूराचा हुकूम घेऊन आले आहेती त्यास आंमल देती येसे माफूक करून सांगणें. जरी हे बात ते खातिरेस ना आणीत तरी त्यांवरी चहूंकडून फौजा तयार होऊन चालिल्या आहेती त्याचा तुम्ही रयेत सलक नाहक लुटिले जाल. बाजे मजकूर मा जानो पंडित जबानी जाहीर करितां खातिरेस येईल. विगर त्याचा जो कोणी शामील होईल त्याचा हाल कांही राहाणार नाही.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १७ ले. १८<br>सु. १०८८ रजब १२ | (२६०) | श. १६१० वैशाख शु. ११<br>इ. १६८८ मे ३ |

शंकराजी नारायण सचीव—रायाजी तोडकरी हवालदार व कारकून किले प्रचंडगड

रा. विसाजी माणकेश्वर मुताळीक सबनीस किलेमजकूर याणी विनंती केली की, देवपाळ, पालवुा व वालवडी या तिन्ही गावच्या सिवार घेरियामध्यें आहे. त्यास गुंजणमावळचे वतनदार कथला करितात. तरी घेराच निर्वाह करून माहालीच्या वतनदारास आज्ञा केली पाहिजे. त्यावरून संताजी सिलिमकर देशमूख व देशकुळकर्णी ता गुंजणमावळ व माळोजी इतबारराव सरनाईक घेरा व बाहुजी नाईक देवगिरकर घेरा किले मार यांस आणून घेराची हद बांधली. (हद तपशील) यावरता घेरा. हदखालतीं जमीन

महालाकडे दिल्ही आहे त्याप्रमाणे घेराची चौकशी करणे. येविशी तर्फ मारमा देशमूख व देशकुलकर्णी यांसी अलाहिदा आज्ञापत्र सादर केले आहे. या उपरी तेही कथला करणार नाहीत.

शि. च. सा. ३ ले. ६४४ } (२६१) { श. १६१० ज्येष्ठ शु. ८
सु. १०८९ साबान ७ } { इ. १६८८ मे २७

कविकलश छंदोगामात्य—तुळाजी देसाई पा शिराळे

तुमकडे हा वारणाकडेत पैकी हुजूर दस्त बाकी वोढव आहे. त्यापैकी बदल देणे ऐवज दाणा पागा खरबुभा रा. सेनापती, गला केली नव सेरी खोलुलेमाप खंडी १० रास देविले असत. खुदनिसबतपैकी आहा करून पावलियाचा कागद घेणे. मलकापुरी पागा मारनिलेकडील छावणीस आहे तेथे देणे पा हुजूर.

का. पत्रेयादी ले. ३ } (२६२) { श. १६१० ज्येष्ठ शु. १०
शक व फ. १०९८ } { इ. १६८८ मे २९

यादी श्रीमन्महाराज शंभुछत्रपती यांची स्वारी संगमेश्वरमुकामी होती ते समयीं अवरंगजेब पादशहा याची फौज श. १६१० विभव ज्येष्ठ शु। १० मंदवासरी येऊन लढाई जाली.

रा. खं. १६ ले. २६ } (२६३) { श. १६१० ज्येष्ठ शु. ११
फ. १०९८ साबान १० } कौलनामा { इ. १६८८ मे ३०

—संकराजी झुंझारराऊ देशमूख ता।
कानदखोरे

तुम्हा बापुजी मोकदम मौजे पाबे मा मा मालूम केले जे, देशमूख मजकूर गणिमाचे ता होता. हाली मुलकात येउनु आपले ता देहवदेह लावणी करील, मुलूक वसाहती करील आणि हुजूर रुजू होईल. या मालुमाती कौल सादर केला खातिरजमा राखोन येऊनु आपले तर्फ आबादानी करणे. हुजूर रुजू होणे.

रा. खं. १५ ले. ४२३ } (२६४) { श. १६१० आषाढ शु. १२
रमजान ११ व } { इ. १६८८ जून १०

कृष्णाजी ( गंगाधर ) राजे ( भोसले )—बाळंभट गोसावी

आम्ही सैन्यासी स्वार जालो ते छ १० रोजी पळीपटास पावलो पुढे

मजली दर मजली स्वार होऊन.जातो. सैन्यामध्ये खर्चवेचास पाहिजे समयासि न पावे याबदल सांप्रत रु. ५०० चे खत पाठविले खतप्रमाणें पैके अबुल नबी महालदार पाठविला आहे यापासी देऊन पाठवून देणे. जे तेरखेस पैके घाल ते तेरील खती घालोन आम्हासहि लेहोन पाठविजे. वाटेतिटेचा विचार पुढे न पावे याकरता जरूर जाणोन खत पाठविले तरी पैके पाठविजे त्याचा अभिमान तुम्हास आहे.

| | | |
|---|---|---|
| ठेरे अप्र. कागद<br>सुा १०८९ सवाल २ | (१६५) | श. १६१० श्रावण शुा ३<br>इ. १६८८ जुलै २० |

निळकठ मोरेश्वर—मेघग्राम (ठेरे) कुळकर्णी

(हा मेघग्राम मौ. पाषाण, भुकुम, भुगाव, कोथरूड व हिंगणे ता कर्यांती मावळ या पांच गावचा कुळकर्णी.) याजकडे हुजुरून वजाई आली होती त्या बाबतीनें परागंदा जाला. ह्याचे बाबे भीयाजी सिव प्रभु हवालदार यानी माळूम केलेवरून स्वामीनी कौल सादर केला. कीं तुवा येऊन गावाची वसाहती करणे. मेहेरवान होऊन वजाई दूर केली आहे. कोन्हे बाबे शक अंदेशा न करणें.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ६ ले. ४७<br>सु. १०८९ सवाल ३ | (१६६)<br>कौलनामा | श. १६१० श्रावण शुद्ध ४<br>इ. १६८८ जुलै २१ |

रायाजी सामराज—हणमया देसाई व देशकुळकरणी हवेली किले कोपल

तुमचे बाबे रा. गणेश रघुनाथ व रा कासी त्रिमल सबनीस किले बहादुरबंडा येही विनती केली की देसाई मा साहेबांचे पायासी बहुत येकनिस्ट आहे. साहेबाचे भेटीस येणार आहे. तरी स्वामीचें अभयेपत्र देविले पाहिजे. तरी ते पाठविले तुम्ही अनमान न करितां भेटीस येणे.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ३ ले. ६४५<br>सु. १०८९ जिलकाद १५ | (१६७) | श. १६१० भाद्र. वद्य२<br>इ. १६८८ सप्टें. १ |

कविकळश छंदोगामात्य—तुळाजी देसाई पा शिराळे

तुमकडे बाबतीकर्ज सरदेशमुखी देऊ आहे. गला खंडी २० पैकी मदत देणे बाबास मिरयातखान दिलेलखानाचा भाऊ हुजूर आहे त्यास तकवीम होन पा ४० रास देविले असेत-रवैशप्रो आदा करणे.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १५ ले. ४२४<br>शक विभव<br>सु. १०८९ जिल्काद १७ | (२६८) | श. १६१० भाद्र. वद्य ४<br>इ. १६८८ सप्टेंबर ३ |

कृष्णाजी गंगाधर राजे भोसले—रामेश्वरभट उपाध्ये आरवकिर

आत्मकार्यपरवतसमध्ये तुम्हांपासून कर्ज घेतले मुद्दल नख्त रु. १०० यासी कलांतर दर माहा दर सदे रु. ३ देऊन.

| | | |
|---|---|---|
| ढेरे अप्रसिद्ध कागद<br>सु. १०८९ जिलकाद २५ | (२६९) | श. १६१० भाद्र. व. १२<br>इ. १६८८ सप्टें. ११ |

नीळकंठ मोरेस्वर—मोकदम व रया मौजे भूगाव
ता। कर्यातो मावळ

मेघश्याम कुलकर्णी घास्ती करतां परागंदा जाहला होता. हली हुजूर येऊन भेटी घेतली. मानिलेस गावावरी पाठविले, तरी याजपासोन, कारभार घेता त्याप्रमाणें हालीहि घेत जाणे. हिला हरकत करील त्याचा हुजूर बोभाट आलियाने उबार राहणार नाहीं.

| | | |
|---|---|---|
| ढेरे अप्र. कागद<br>सु. १०८९ सिल्हेज २७ | (२७०) | श. १६१० आश्वि. व. १४<br>इ. १६८८ आक्टो. १३ |

दिवाण ठाणे का। मावळ—मोकदम भूगांव व बावधण

मेघशाम ढेरे कुलकर्णी याचे कुलकर्ण हुजरून पंत स्वामीनी याचे दुमाला केले आसे. तरी तुम्ही येकदिल असोन याचे हाते कुळार्णाचे काम घेत जाणे. गाव आबादान करून कीर्दी मामुरी करणे. देहाये मजकुरी याची माणसे गुरेढोर वस्तभाव असेल त्यास हिला हरकत करीत नव जाणे. याचा साल दरसाल साभाल करीत जाणे.

| | | |
|---|---|---|
| सा. सं. इ. ले. २०<br>जुलूस ३२ मोहरम ६ | (२७१) | श. १६१० कार्तीक शु. ७<br>इ. १६८८ आक्टो. २१ |

दिल्लीकर मोंगल बादशा—बादशाही तावेदार खेमसावंत

बहादुरखान याणी मजालसीत विनंती केली जे (छत्र०) संभा खोटा व हरामी याच्या किल्यास व तालुक्यास वेढून यत्न प्रयत्न करून अदललानी तळ कोकणीं ठाणीं स्थापावयास तुम्ही उमेदवार आहा व परगणे कुडाळची सरदेशमुखी बहाल व्हावी. तरी तुम्हास ती देशमुखी इनाम दिली. तुम्ही करार केलेप्रमाणें आपले सरवेपणासाठी ठाणी बसवणें व बादशाही फत्ते निशाणी

लष्करास रसद पोचविणें. आणि आरमारी जहाजाने जळमार्गे नीट येण्याकरता कोंकणांत बहुत मेहनत करणें. हेविषयीं हुकूम.

शि. च. सा. ५ ले. ९५८ } (२७२) { श. १६१० कार्तिक शु. १२।१३
शक विभव भृगुवासर } { इ. १६८८ आक्टो. २६

परगणे वाईचे देशकुलकर्ण व गांवकुलकर्ण कसबा देखील खूम, व बावधाण, समत मुर्‍हे व बाजे कुलकर्ण तुमचे वाडवडिलांचे मिरासी पिढीदर-पिढी कारकीर्द दर कारकीर्द चालत आहे. दरीवखत कारकीर्द कमाळखान वजीर याचे मुदतीमध्यें थिटे यानी नस्ता कलह आरंभून वतनास खलेल मांडिले. त्यावरी तुमचे वडील गोपाळ लाहिदेव हुजूर जाऊन आपलें वतन सही करून गांवास येतां मार्गी जिवें मारिले. मागती गोपाळपताचे भाऊ जाऊन नवीं पत्रें घेऊन महालास आले. आतां तरी ज्यास माहाल मस्तीचें बळ असेल तो तुमच्या वृत्तीची गोष्टी काढील. आम्ही त्या कथळयांत नाहीं. जो कोण्ही आम्हांतील गोष्टी काढील तो दिवाणीचा गुन्हेगार व ब्रह्मसमेचा अन्याई. येकाचे वृत्तीस आपली वृत्ति म्हणणें हे ईश्वरास मानत नाहीं. नीती नव्हे. निर्वंश होईल. कथळा करील तो आमच्या वीर्यांचा नव्हे. अनामिकाचे वीर्यांचा असे हे पत्र.

शि. च. सा. २ ले. ३०८ } (२७३) { श. १६१० मार्ग. शु. २
सु. १०९८ जुलूस ३२ सफर } { इ. १६८८ नोव्हें. १५

गोपालभट व शंभुदेऊ धर्माधिकारी—
वगैरे जुनारदार कसबे गुलशनाबाद.

साहेबाचे बंदगी कतबा लेहोन दिधला की, साहेबी हुकूम फर्माविला की, जेजया देणे. तरी आपण गवाईसार आहो. सिवाई गवाई भाणखी कसब करीत नाही. सुदामद आम्हास जेजया माफ आहे. येसियास करार करितो की, दो महिनियाचा वाइदा जालिया हुजूर जाऊन माफीची सनद आणून देउनु. घरी वाइदियास सनद आणून न देऊन तरी जेजयाचा भाव करून.

शि. च. सा. ३ ले. ६४६ } (२७४) { श. १६१० कार्तिक वद्य ९
फ. १०९९ मोहरम २२ } { इ. १६८८ नोव्हें. १८

का। इंदापूर येथे पेठ जदीद व असामी कदीम त्यांची यादी

सराफ, सोनार, तेली, दरजी, नवे व जुने

१–९; १–२; ६–९; २–०.

सां. सं. इ. ले. २१
जुलूस १२ रबल १

(२७५)

श. १६१० पौष शु. १
इ. १६८८ डिसें. १५

बहादरखान अमीर अलमगीर—देसाई देशाई, रयत, कमाविसदार परगणे कुडाळ

खेम सावंत हे थोर; तरवारबहादर, देवाचे पांच ह. जातीस ४ ह. स्वार मुळाची मनसब २ ह. व १ ह. स्वारानिशी दरबारची चाकरीस आहे. सर्फराजी होऊन परगणे मजकूर व जहागीर करार जहाला. देत जाणे. जहागीरदार याचे रजातळबेत वागणे. रयतेस रजावंत ठेऊन लावणी करवून आबादानी राखणें. सरकारकून यास ताकीद.

शि. च. सा. १ व ३
ले. ९१ व ४०३
फ. १०९८ रबल ९

(२७६)

श. १६१० पौष शु. ११
इ. १६८८ डिसें. २३

महजर पा वांई सुभा दारुल जफर. मनाजी शंकर नीलकंठराव याचा इनाम व आंबराई (चांमिळी, किकवी, जेजोरी, नारायणपूर,) निजामनमुलूक, अदिलखान, सिवाजी भोसले, मिर्जाराजा, बाजी दिवाण पोरपडे जागीरदार यांच्या सनदा होत्या. येसियास नफर मजकूर गनिमाकडे होता. त्यास नाहारखान गोरी हवी कौल देऊन आणिला. सिरवलास आला, मागून कबिला आणविला. वाटेस आसवलीचे वाटे गनिमानें कुल बिसाती लुटून नेली त्यात सनदा गेल्या. येसियास भोगवट्याचे गोष्टी गावगनाचे मोकदम व बाजे लोक यांनी दिलो हा महजर सही.

शि. च. सा. ९ ले. ९७

(२७७)

श. १६१०
इ. १६८८

कवींद्र गोसावी—चि. रा. विसाजी कुमदेऊ सुमेदार ता चेऊल

आपाजी ताउजी व तथा बाळाजी ताऊजी हे दोघे बंधु देसाई देसकुलकर्णी मामले चेऊल हे बहुत दिवस भगडतात. त्यामध्यें बाळाजी ताऊजी हा जोरावरी करितो. तरी उभेयेतास किले रायेगडी पाठवणे. त्याचा न्येये सरकारकून व आम्ही मिळोन करून. तरी बहुत सिताबीने रवाना करणें. येक घडीचा उजूर न करणें.

रा. खं. १७ ले. १९
सु. १०८९ (९९!)

(२७८)
अभयपत्र

श. १६१०
इ. १६८८

शंकराजी पंडित सचीव—संताजी विठोजी हैबतराव सिलिंबकर देशमूख ता गुंजणमावळ

तुम्ही हुजूर येऊन पाली बुद्रक तर्फ मजकूर आपले इसाफतीचा गांव खास जमीन शुमला खंडी १५ पैकीं दिवाणांत ११. याकरता रा. कै. स्वामीनें मुबदला खालसा जमीन वोराळे (३८॥) व तांभाड (११।) येथील देविले. त्यास मनास आणिता पालीचा येथील जमीन दिवाणीच्या बागाखाले व प्रचंडगडच्या घेरियाकडे बाद पडोन जमीन बाकी राहिली ती देशमुखाकडे करार. किलाचा घेरियाकडे व दिवाणीच्या बागाकडे जमीन आहे त्याचा मुबादला तुम्हांस मौजे तांभाड ता। मा।र कामथ खास खंडी ४ व धुरगवडापासून वरते खास खंडी ७। एणेप्रो ११। खंडी सरसनिरस महसूल कुलबाब कुलकानू व बाजे पटिया देखील झाडझाडोरा तुमचे दुमाला केले. मो. वोराळे येथे ३॥। खंडी पालीचा मुबदला हावजी हैबतराऊ यास देविला तो दूर करून हली पालीस करार केला असे. ऐसियास विठोजी हैबतराऊ याणी हवाजी-राऊ यास आपले तकसिमेपैकी गवंड ता। मा।र येथे देविले याबदल तुम्हाकडे पालीची जमीन ३॥। खंडी करार केली वंशपरंपरा अनुभवणें.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ३ ले. ४४६ | (२७९) | श. १६१० <br> इ. १६८८ |

शक १६१० सन १०८९ सु।। या साली संभाजीराजे यासी धरून संगमेश्वराहून नेले. पुढे दोन वर्षे मोगलाई होती भालेराई जाली.

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. १५२ <br> रा. श. १५ विजय (विभव) | (२८०) <br> मिती पत्र | श. १६१० <br> इ. १६८८ |

तुबाजी वा रतनोजी नाईक + देशमूख—मोकदम खोत व सेटे महाजन
वा माहाभलो अनंत देसकुलकरणी व बाजे खूम तालुकदेहाय
पा। कुडाल पा। मा।र

देहाय मजकुरी आमचे वडिलानी शक १४६३ प्लव सवछरेस एक दिल्हे तें जीर्ण म्हणून पहिलेप्रमाणे श. १५२६ क्रोधी संवछरी पुनः करून दिल्हे हाली आमचे कारकीर्दीस सदर साहेबाचे भिसेलीस करून घेतले मग आम्ही करून दिल्हे. ४९ गांवें तेथे जोरी २॥।४॥ व गहू ·॥≋। व तुरी ·॥≋। मिळाल्या.

| | | |
|---|---|---|
| रा. खं. १५ ले. २४ <br> सु. १०८९ विभव <br> फ. १०९८ | (२८१) | श. १६१० <br> इ. १६८८ |

तुळापुरीं तेच वर्षी मुकाम जाहला. मग राजश्री संभाजी राजे ह(ह)स्तगत केले, ते सवछर जाले.

रा. खं. १५ ले. १४४ } (२८२) { श. १६१०
फ. १०९८ } { इ. १६८८

(पातशा)—बाजी सर्जाराऊ जेधे देशमुख ता। रोहिडखोरे

तुवा हुजूर सिधाजीपंत पाठविला होता त्याणे हकीकत जाहीर केली त्यावरून तुझे इसापतीचे गाव व हक तुझे मुमाफ केले व तुला गुमास्ता सिरोली चाकरीस देणे तुवा हजूर येणे. हुजूर आलियावरी तुम्हाव हमरती-बारे याचा कौल आणून मग तुम्हांबरोबरी भले मागूव देऊन त्याची भेटी करून फर्मान करून देऊ. जरी तू हुजूर न येव तरी गाव मुमाफ नाहीत. दिगर बाजी घोलप व मकाजी नायकवर यासी कौल दिधले त्याव बराबरी घेऊन येणे. शक न धरणे. तुम्ही हुजूर न या तरी जे सनद दिधली ते मंजूर नाही. तुम्हां नजीक जमाव कितेक होईल ते लेहोनु घेऊन येणे.

शि. च. सा. ९ ले. ७२ } (२८३) { श. १६१०–११
सु. १०८९ } { इ. १६८८–८९

रामाजी सोनाजी आदिकारी मामले वेऊळ—शेखजी हुसैन अमुरे वस्ती नागकाई अपाळ प्रतापजी सोनाजी दादर कसबे वेऊळ
मुगताई „ हिराजी प्रतापजी

आपली निळकत वाकीपैक तकसिमा ११ बजा तकसिमा १० बाकी आपली १ तकसीम टके २०, बाकी कुरभाट आपली तकसीम सातवी १ सदरहू निळकत आत्मसुखे फरोख्त केली असे. त्या मिळकतीच्या चहु हदावरीत देखील बंदरपट्ट राहाट राहटवट व माड व सुपारी व बाजे हरजिनसी आवे देखील फरोख्त केली असे. त्याची मिळकतीची चौबचारे किमत बसरी कारी १२५०८ हे रोख पावले. (गोरी)

इ. पं. गो. इ. साधनें ले. ७ } (२८४) { श. १६१० पौष व. १२
दफ्तर १२ रविकोवक २५ } { इ. १६८९ जाने. ८

—मुरवरी, दे०व, दे०दे, तपे अंतरूज मामले गोवा

अनंत बिन फट जोतिषी यांच्या वुजुरगापावून पिढी दर पिढी मिरास वरवोतीव भोगवटा चालिला आहे त्याप्रमाणें हक रसूम अंतरुज पैकी र. १५० व याचे मिरास व वरजोतिष हिंदू याचे घरी कसबे फोंडा दर गावी व याचे तपे हाय मोकरर करून देविले असे. तरी अवकाद अफहाद चालवणें.

रा. खं. १८ ले. ३३
फ. १०९८ रसर १ } (२८५) { श. १६१० माघ शु. १
इ. १६८९ जाने. १३

—मोकदम मौजे चिंचवड ता। हवेली प्रा। पुणे

कारणे साहेबाचे बंदगीस कतबा लेहोन दिधला ऐसा जे, साहेबी हुजूर बोलाऊन खंडणीची रजा फर्माविली कीं जमाबंदी निश्चित करणे. तरी आपले बाबे अंबाजी राम गु॥ रामचंद्र बाबाजी देशपांडे प्रा। पुणे याणी कुळे रयतीचा हालहवाल जाहीर केला जे-सन हजार १०९६ (श.१६०८=इ.१६८६) अखेर साली दुकाळ पडिला याकरिता रयती कुळ मेली, कांहीं परागंदा जाली, मिरासदार कुळ कोणी नाही, उखती पाखती रोड दुबळी कुळे मेळवून कीर्दी केलि यास उंदिरानी कुली सेते खादली, व लस्कर पायमालीने रयतीचा हाल राहिला नाही. परी जीवनमाफिक खंडणी केलिया सालमजकुरीची उगवणी करितील-हा हवाल खातिरेसी आणून कुलबाब व कानु, माल व सायर साल तमाम कुलबाब बिलमखता खंडणी केली ते कबूल असोन उगवणी करोन मोकरा बेरीज रु. १२५१.

भीसां. २ ले. ४२३
विभव बुधवार फ. १०९८ } (२८६) { श. १६१० माघ शु.५
इ. १६८९ जाने. १६

पिराजी व सुभानजी देसमुख—सुभानजी माणकोजी इब्न
व दासोजी व नरसोजी देशपांडे विठोजी कळारे (कराळे)
पा। टेभुर्णी मोकदम मौ नाळगाऊ पा। हवेली

महजर लिहून दिधला जे, तुम्हास मौजे सेवरे पा। मा।र तेथील निमे मोकदमी मिरासदारास ठेविले. मिरासदार हाजीर जाहालियावरी निमे मोकदमी त्याचे हवाला करणें. २६॥ चावर पैकी सिव लीवळीनु गुरळीचे १३। चावर तरफ करून दिली. जमीन सकरनिखर वाटून देणें. तुम्हास खुद निम चावर इनाम दिधला तो खाऊन कीर्दी आबादानी करणें.

भीसां. २ ले. ४२४
फ. १०९८ } (२८७) { श. १६१० माघ
इ. १६८९ जाने.

(लेखांक ले. ४२३ प्रो—विशेष नरहरी लुमाजी कुलकर्णी
मौ पिपळ दुठ पां टेभुर्णी सा परडा

कौलनामा—मौजे सिवरे येथील मोकदमी बरोबर कुलकर्णाहि निमे दिले. कारण माजा वीस वर्षे वेरान पडला. त्याची जमा परगणियावर मुरली

घालून देता परगणाहि खराब पडला. लावणीचे वख्ती कोणी मोकदम व कुळकर्णी हाजीर नव्हेती. जमाबंदीचे वख्ती देहाये मोकदमास विचारिले वेरान गांवाचा टका तुम्ही देणें. मग बरगत करून जो टका हिसेब येईल तो देऊन. त्यावरून हकीमे जोर ताकीद केली. मग आम्ही तुमचे गळा पडलो व निमे मोकदमी व कुळकर्ण तुम्हास दिले, व ४ साले ७५, १५०, २२५ व २९३।।।≥ प्रमाणें इस्तावा केला. सालमजकुरी ९५१ तुम्हापासून घेतले.

पे. द. ३१ ले. ४६ } (२८८) { श. १६१० माघ<br>इ. १६८९ जाने.

विठोजी सिर्के याची भावजय कासीबाई यांस कोतळुक व मासू हे गांव मोकासा संभाजी राजे यांनीं दिले असतां तेथें सिर्क्यांची पागा होती; दाणेकरी गावगना जाऊन बळात्कारें खल्यावरून दाणे भरून नेत. मौजे मासू हा गाव ह्रबा देसाई याकडे बाधेरीतीनें खोती हकानें होता. त्यापैकी बाघळतुरखटे येथील भातहि एक दोन वेळ नेहले. देसाई व सिर्के यांचे राडतांत कटकट होऊन सिर्क्यांचा रखवाळदार धर्मा माहार कवटेकर होता त्यास ठार करून पेंढ्यांत घालून आग दिल्ही. मग देसाई यांनी सिर्क्यांची पागा मोडून टाकली. व संगमेश्वरी संभाजी राजे यांसीं सर्व वृत्त सांगून सिर्क्यांकडील मोकासा काढून सरकारांत गांव ठेवले.

सा. पं. द. ले. १७<br>शक वर्तमान प्रभव<br>फ. १०९८ रसर २४ } (२८९) { श. १६१० माघ वद्य १०<br>इ. १६८९ फेब्रु. ४ सोम.

कानोजी राजे प्रभावळीकर—नारायण प्रभु देसाई प्रा कुडाळ

खेम सावंत जोरावरीने देसकतीचा अधिकार नसतां तुमचीं वतभूम खातो. यास मारून काढणेबद्दल तुम्हीं आम्हास तिवरे भाऊ करून तिसरी तसीम आमास उभय वर्गी (जोगण प्रभू) दिली. मागतेन तुम्ही तुळापुरी आलेत. तेव्हां स्वारी तुम्हाबरोबर देऊन कोकणामध्ये रवाना करावे तंव आम्हास हुकूम चंदीस जाण्याचा जाहाला. त्यावरून तुम्ही आपली पत्रे फिराऊन मागितली. लिहिले प्रो कार्य होऊन आले नाहीं. उगेच वतनदारास गुतवावे काय निमित्य. याकरता तुमची पत्रें फिराऊन दिली. आमचेपैकी जोगण प्रभूच्या गुजारतीनें मणेरीचे मुकामी दिले ते आम्ही आपला घेतले.

| | | |
|---|---|---|
| फॉ. इ. सा. ले. ९८ पृ. १०९<br>सा. स. इ. ले. १६ पृ. १६<br>शक विभवनाम सोमवार<br>हिज. १०९८ रखर २४ वर्तमान प्रभव | (२९०) | श. १६१० माघ वद्य १०<br>इ. १६८९ फेब्रु. ४ |

नारायण प्रभु बिन दादाजी प्रभु—रा. मानधाता वल्द कानोजी देसाई परगणे कुडाळ मुा मणेरी 　राजे प्रभावळीकर.

प्रगणे मजकूरची देशमुखी आपली व जोगणप्रभु बिन नारायण प्रभूची पुरातन चालत आहे. येसीयासी भोसले याणी मुलुक लुटून खराब केला. एक लवाषमास सेतवाग कुल बुडाले. बहुत नातवान जहालो. त्यावरी मुलूख पातशाही तहफावीस आला. कीर्दी आबादानीस कुवत नाहीं. आम्ही दोघ वर्गी आपली देशमुखी मिती एकत्रातून तिसरा विभाग ५ इ. १ बाळावळीखेरीज करून विकिली असे. धाकटा भाऊ केले असे. तरी इनाम गांव हकपटी वोंबळ तेनाती व नमसी व बागसेत व घरटाव व सेव फसकी व मान पान व बाजे बाजिमा माल व बकाती व बाजेबाबी विभाग खाऊन असावे. नवी मिती दिवाणांतून जे साधून येईल ते भिवर्गी बराबर वाटून खावे. आमचे हाईज गोत्रज सफ़्वक़ करतील त्यास आम्ही वारूं, परगणे मजकुरी गेलियावरी थळच महजर करून देऊन.

| | | |
|---|---|---|
| ऐ. फा. सा. ३ ले. ११<br>जुलूस ३२ जवल ४ | (२९१) | श. १६१० फाल्गुन शु. ६<br>इ. १६८९ फेब्रुवारी १५ |

कासीमखान—हनुमंत गौडा

तुम्ही सरहद्दीवर खबरदार राहणें त्या अटीवर तुम्हांस बसवापट्टण सरकारची देशमुखी मुकरर केली आहे. हा परवाना पोंचतांच तुम्ही आपले १०० स्वार व ५०० प्यादे ह्यांस बसवापट्टणचा किल्लेदार गाझी बेग याजकडे पाठवून त्याच्या बरोबर पादशाही मुलुखांत दस्त राहावें. त्यारप्यावे पावस्याची रसीद गाझी बेगची यावी. कोणाहि जमीदारास बंड करूं देऊं नये, व रोजच्या रोज वार्ता कळवावी.

| | | |
|---|---|---|
| शि. च. सा. ३ ले. ५०६<br>जुलूस ३२ जवल १२ | (२९२) | श. १६१० फाल्गुन शु. १५<br>इ. १६८९ फेब्रु. २३ |

—जमीदार पाहन घाट ( अंतरूज मामले गोवा. )

त्या मुलखाचे जबान फारणे मिर्जा व सैद् अल इसलाम पाठविले आहे. दोघास कागदाचा शिरिस्ता व पहिला अमल दाखल करणें.

सरकार माळाचे गीर्दावारी करारवाकी करणें. वाजवी पैका वसूल करणें. तफरका न कीजे. व दिवानी सनद पावले वेगळे कोणास अमल न दीजे व गैरज सनद अमल दिलेया त्याचा जबाव तुम्हांस करणे लागेल.

रा. सं. १५ ले. १०१ } (२९३) { श. १६१० फा व. १०
विभव } { इ. १६८९ मार्च ११

औरंगजेब पातशहानी संभाजी महाराजास तुळापुरीं आणिलें (धिंड काढली व ठार केले. शाहूनें पुढें त्याची समाधी वढू बुा येथें बांधिली.)

शि. च. सा. ७ पृ. १२० } (२९४) { श. १६११
{ इ. १६८९

नगर फते करून तुळापुरी मुकाम जाला ते वखती रयेतीचा बरदास्त अबादानीचा हुकूम जमदतुल उमदे वजिराये असदखान आला दिवान अकदस यानि मदारुल माहामीन सफीखान दिवान उर्फ दक्षण पासि हुकूम साहर जाला. त्यावरून देशमूख देशपांडे बोलाउनू हुकुम केला की, रयतीची बरदास्त करणे आहे मुलाजमतीस हाजीर करणे त्यावरून तमाम मोकदम मुलाजमतीस हाजीर होऊन आमीन अदालती सिरपाव कौल सरफराजी जाला, ता नये जमिनीस कौल....

शि. च. सा. ५ पृ. ७९ } (२९५) { श. १६१०
{ इ. १६८९

औरंगशाहे पातशाहे देहो विजापूर व भागानगर फते करून या प्रांतास आले. पातशहा वढू कोरेगावी येऊन मुकाम केला तेथून लसकर पाठवून सिवाजीराजे पहिलेच गेले होते त्याचा लेक संभाजीराजे धरून आणिला आणि वढू कोरेगावांत मारिला. मग त्याचा लेक शाहू राजा व बाइका आपल्या जाळीत ठेविली.

रा. खं. १५ ले. १५३ } (२९६) { श. १६११
फ. १०९९ } { इ. १६८९

दताजी केशवजी नाईक देशमूख देशपांडे प्रा वाई } —समस्त मोकदम व शेटे महाजन देहाय समत हवेली, वाघोली, मुरे, जोरखोरे, जांबुळखोरे, निंब, कोरेगांव

श्रीसदानंदगोसावी मठ येथील भंडारा व नंदादीपावदल तीर्थरूप रा. नरसोजी नाईक यांचें पत्र तें बहुत जीर्ण, म्हणोन आनंदगीर गोसावी

नूतन पत्र करून देणेबद्दल रदबदल केली. त्यावरून तमाम मोकदम बैसोन पूर्वील सनद मनास आणोन त्याप्रो सनद करून दिल्ही. दर मुकाम लष्कर हजरती जिलसुमानी मोकाम तुलापूर प्रा पुणा. गावकुळो वृत्ती करून दिल्ही ती पिढी दरपिढी चालवणें हिंदु अगर मुसलमान हरकंती करील त्यासी आण असे ( ४५ गावांची नोंद त्यापुढें गलाकुळोचा आंकडा दिला आहे ).

खं. १५ ले. १५४ } (२९७) { श. १६११ इ. १६८९

ले १५३ प्रमाणें—फक्त नख्त टके व गला केलीची नोंद संमत हवेली-तील गांवाची आहे.

ले. १५५ वाघोळी पैकी गांवें.

ले. १५६ संमत निंब पैकीं गांवें.

रा. खं. १५ ले. ३ पृ. १६ } (२९८) { श. १६११ इ. १६८९

(मसूरचे जगदाळे पाटील यांनीं) शिवाजी राजे मृत्य पावले. त्यांचे लेक संभाजीराजे राज्य करूं लागले त्यांस जाऊन भेटोन अर्ज केला कीं, साहेबीं ( म्हणजे शिवाजी यांनी ) कऱ्हाडची देशमुखी घेतली. मसुरीचे तरी देशमुखीचें वतन आपले, आपले दुमाला करणें. बाज गुन्हाई माझें वतन घेऊन माझे तीन खून केले आहेत. तरी त्या खुनांचा वांटा तरी मसुरीचे वतन तरी तेवढें दुमाला करणें. ( संभाजीच्या सांगण्यावरून ) कऱ्हाडची नांवगोष्टी काढणार नाहीं ऐसे लेहून मग संभाजीराजे मेहेरबान होऊन मसूरपरगणाची देशमुखी दुमाला करावी ऐसें केलें. काम होऊन यावें तों एसजी फर्जंद याचे हवाला देसमुखी केली. मग त्याचे आर्जव करून मग एसजी फर्जंदानें अर्ज करून देशमुखी दुमाला करविली तों सवेंच संभाजी-राजा धरून नेला. राजाराम पळोन चंदीस गेला.

# छत्रपती संभाजी शकावली

ह्या शकावलींत जचे शकावली, जेधे करिना, विजापूर अदि० चा इतिहास मोडक कृत आवृत्ती, रा० खं. १५ व रा० खं. १८ मधील शकावली, मल्हार रामरावकृत संभाजीबखर, मंडळ त्रै. वर्ष ९ अं. १ मधील शकावली, हिं. इु. स. इत्यादि साधन ग्रंथांतून संभाजी विषयक आलेल्या कालनिर्दिष्ट प्रसंगांची नोंद केली आहे. ह्याच ग्रंथांत पृ.१ ते ९६ मध्यें संभाजीकालीन पत्रांचें जें सारांशानें संकलन व कालानुक्रमानें ग्रथन केलें आहे त्यांतीलहि कांहीं घटना ह्या शकावलींत समाविष्ट करावयास पाहिजेत. परंतु प्रत्यक्ष पत्रेंच साररूपानें व कालक्रमागत अशीं येथेंच दिलीं असल्यामुळें अर्थात् द्विरुक्ति होईल म्हणून त्यांतील गोष्टींचा निर्देश येथें करण्याचें रहित केलें. ह्याच बरोबर मराठींतीलच अन्य सिद्ध ग्रंथांत आलेले कालदर्शित प्रसंग द्यावयास पाहिजेत पण तेंहि ह्याच कारणामुळें देण्याचें रहित केलें. संभाजी छत्रपतींची कारकीर्द म्हणजे औरंगजेब पातशहाचा दक्षिण-विध्वंसन-कार्याचा पूर्वभाग होय. म्हणजेच पातशहा औरंगजेबाच्या दक्षिणेंतील पहिल्या सहा वर्षांतील कुच-मुक्काम व इतर हालचालीहि येथें दर्शित करणें एका दृष्टीनें आवश्यक आहे. पण मला तें अशक्य असल्यामुळें येथें फक्त ह्या गोष्टीचा निर्देश करून खालीं ती शकावली पुढें दिली आहे. ग्रंथ-नाम-संक्षेपाची स्पष्टता वर व ग्रंथप्रारंभीं आलीच आहे.

श. १५७९ हेमलंबी जेष्ठ शुद्ध १२ = इ. १६५७ मे १४ गुरुवारी घ. १० पुरंधरी संभाजी राजे जन्म शि. च. प्र. पृ. १८, ५६, ५०, ६५.

श. १५८१ भाद्र. वद्य १४ = १६५९ सप्टें. ५ संभाजीची आई सईबाई मृत्यु शि. च. प्र. पृ. १९

श. १५८७ विश्वावसु आषाढ शु. १० = इ. १६६५ जून १२ शिवाजी जयसिंग भेट व तह, संभाजीराजे यास मोगलातर्फे पंचहजारी मिळते. शि. च. प्र. २१; जयसिंग पत्रें जदुनाथ सरकार पृ. ११३

—फाल्गुन शुद्ध ९ सोमवार = १६६६ मार्च ५ शिवाजी व संभाजीराजे औरंगजेबाचे भेटीस गेले, समागमे सर्जाराव जेधे. शि. च. प्र. पृ. २३

श. १५८८ श्रावण वद्य १२ = १६६६ आगष्ट १७ आगरियातून पेटारियात बैसोन ( शिवाजी बरोबर संभाजीचें ) पलायन शि. च. प्र. पृ. २४

श. १५८८ मार्ग. शु. ५ = १६६६ नोव्हें. १० संभाजी राजे, वकील शिवाजी बरोबर राजगडास आले शि. च. प्र. पृ. २४

श. १५८९ कार्तीक वद्य ५ = १६६७ आक्टो. २७ संभाजीराजे शहाजादा शहाअलम यांच्या भेटीस औरंगाबादेस गेले. मोगलाशी सला जाला. [रियासतींत १६६८ व उप्र. सं. २० बऱ्हाणपुर असें पडलें आहे.] शि. च. प्र. २४.

श. १५९१ सौम्य पौष = १६६९–७० ख्रिसें. माने. मोंगलाचा व शिवाजी-राजे यांचा तह मोडला म्हणून औरंगाबादेहून संभाजी व प्रतापराव, आनंदराव शहाजादियाजवळून राजगडास आले. शि. च. प्र. पृ. २४

श. १५९४ फाल्गून वद्य ११ = १६७३ मार्च ६ आणाजीपंती मेदेकरून पनाला घेतला. कोंडाजी फर्जंद याजबराबर ६० लोक दिले होते. संभाजीचें वास्तव्य पन्हाळगडीं व विजा-पूरकराशीं शिवाजीचें युद्ध. शि. च. प्र. पृ. २६; रिया उप्र. सं. पृ. ११

श. १५९६ चैत्र-ज्येष्ठ १६७४ एप्रील-जून-संभाजीकडे इंग्रज व्यापारी कंप-नीचें काम. उप्र. सं. पृ. २१

माघ वद्य ५ गुरुवारी = १६७५ फेब्रु. ४ संभाजीराजे यांची मुंज जाली. शि. च. प्र. पृ. २७

श. १५९९ पिंगळ कार्तीक शुद्ध ६ रविवार = इ. १६७७ आक्टो. २१ संभाजीराजे शृंगारपुरास जाऊन राहिले. उमाजीपंडित पढवावयास असत. शि. च प्र. पृ. २८ व २७०; उप्र. सं. पृ. २१

श. १६०० भाद्रपद वद्य १४ बुधवार = १६७८ सप्टें. ४ संभाजीराजे यास भवानीबाई मुलगी शृंगारपूर येथें जन्म. शि. च. प्र. पृ. २९

—पौष शुद्ध १० = १६७८ ख्रिसें. ३ संभाजीराजे शिवाजीराजे यासी पारखे होऊन परळीगडावरून पळून मोगलाईंत दिलेलखानाकडे गेले. तेथें दस हजारी घेऊन सन्मान मानून राहिले. शि. च. प्र. पृ. २९; सरदेसाई नोव्हेंबर देतात. उप्र. सं. २१

श. १६०१ सिद्धार्थी वैशाख शुद्ध २ गुरुवार = इ. १६७९ एप्रील २ दिलेरखानानें-संभाजी समागमें आहे-भूपाळगड घेतला. शि. च. प्र. पृ. २९

श. १६०१ मार्ग. व. १४ = १६७९ डिसें. २१. संभाजीराजे मोगलाईतून पळोन पन्हाळगडावर आले. शि. च. प्र. पृ. १०, हिं. मु. स. पृ. ७१६

पौष वद्य ७ भोमवार = १६८० जाने. १३ शिवाजीराजे व संभाजीराजे यांची पन्हाळ्यास भेट. शि. च. प्र. पृ. १०

श. १६०२ चैत्र शु. १५ = इ. स. १६८० एप्रिल ३ रायगडावर श्रीशिवाजी मृत्यु शि. च. प्र. १०

चैत्र वद्य ११ गुरु. = १६८० एप्रिल १५. कारवार बंदरांतील धान्य संभाजीनें आणविलें. छप्र. सं. पृ. २३

वैशाख शु. १ = सन १६८० एप्रिल १९ चे पूर्वी. संभाजी पन्हाळ्यावर. लष्कर संभाजीस जाऊन मिळत आहे. संभाजीनें दाणा रसद बंद केली असून सर्व धान्य पन्हाळ्यास नेण्याचे हुकूम सोडले आहेत. संभाजीचे लोकांकडून कारवार लुटण्याची भीती. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ ११

वैशाख शु. २ = इ. स. १६८० एप्रिल २० मोगलाकडून सुरत येथील इंग्रज, डच व पोर्तुगीज यांस उपद्रव. सर्व रयते-प्रमाणें इंग्रजांनाही ३½ टके कर द्यावा लागत आहे. त्यामुळें वार्षिक २०,००० चें त्यांचें नुकसान होऊं लागलें. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ ११

वैशाख शु. ३ = १६८० एप्रिल २१ आनाजीपंत सुरनीस सचीव यांनी राजारामास मंचकारोहण करून संभाजी राजे यांस कैद करावे असा तह करून मोरो-पंत पेशवे यांसह पन्हाळ्यावर चालोन गेले [ शि. च. प्र. पृ. १० ]

वैशाख शु. ४ = १६८० एप्रिल २२=हि. १०९१ रबार २ मसऊदखानानें व्यंकटाद्रीस बंधमुक्त केले. [ विजा. इ. मोडक पृ. २५९ ]

वैशाख शु. ८ = १६८० एप्रिल २६ चें पूर्वी. देश संभाजीचा झाला. सर्व सुभेदारांनीं संभाजीस पन्हाळ्यास येऊन हिशेब द्यावे असे हुकूम रावजी पंडिताकरवीं रवाना. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४

वैशाख शु. ९ = इ. १६८० एप्रिल २७-संभाजीनें राज्यपद

धारण करून राजा म्हणवूं लागला. त्यानें सर्व हवालदार व सुमेदार यांस बोलावून घेतलें आणि कांहींना त्यानें कैद केलें आणि कांहिंना कामावरून दूर केलें. राजा-पूरला नवीन सुमेदार नेमला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४

श. १६०२ वैशाख शु. १० = इ. १६८० एप्रील २८ चे पूर्वी. सध्यां सर्वत्र स्थिरस्थावर होत आहे. संभाजी पन्हाळयावर होता. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४.

वैशाख शु. १५ = इ. १६८० मे ३ चे पूर्वी. संभाजी राजा म्हणून जाहीर झालें. मोरोपंत व अनाजी दत्तो वगैरे पन्हाळयास हुकुमासाठीं गेल्याची खबर. राजाराम रायरीवर. सर्व हवालदार व सुमेदार वगैरे कामा-वर रुजू झाले. वदल नाहीं (?) त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४

वैशाख वद्य ३ = १६८० मे ६ गुरुवार. राजाराम छ. यांस सर्वांनीं विचार करून मंचकारूढ करून कारभार चाल-विला सं. वखर पृ. ४ आवृत्ती १९१५ साने. रा. खं. १५ ले. ३०१

वैशाख व. ४ = इ. १६८० मे ७—पोर्तुगीजांचें संभाजीशीं सख्यत्वाचें बोलणें. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४

वैशाख व. ११ = इ. १६८० मे १६—रायगडी वरावर झाली. शि. च. प्र. ३०; त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४

वैशाख व. ३० ते आषाढ शु. ६ = इ. १६८० मे १८ ते जून २२ चे पूर्वी. संभाजी खात्रीपूर्वक पन्हाळ्यावर. त्रै. वर्ष अंक १ पृष्ठ १४

ज्येष्ठ शु. २ ते ज्येष्ठ व. ३० = इ. १६८० मे १९ ते जून १६—मोरोपंत व अनाजीपंत व प्रल्हादपंत यांस हंबीररायानें धरून पन्हाळ्यास नेलें. कुल फौज एकत्र होऊन राज्य संभाजी राजे यांस दिलें. शि. च. प्र. ३०; त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४.

ज्येष्ठ वद्य १ सह २ = १६८० जून ३ गुरु. = सु. १०८१ जवळ १५ नाडोली (कऱ्हाड) हा गांव मल्हार गोसावी सदामती यांस अमरदार असतां शिवाजीराजांनीं

(श. १६०२) कांहीं दिवस अमान्य (अमानत) केला होता कारण की आपल्या राज्यांत हे रीत नाहीं. पण पुढें संभाजीनें पन्हाळ्याहून रायगडास येतां फोरटीस गोसावी भेट झाली व गांव दिला. तोच गांव चालविण्याबद्दल देशाधिकाऱ्यांस छत्रपती संभाजीची आज्ञा. ले. २

आषाढ शुद्ध २ शुक्रवार = १६८० जून १८ संभाजी राजे रायेगडास आले, बंदोबस्त करून राज्य करूं लागले, राजाराम कैदेंत ठेवले. [ शि. च. प्र. पृ. ३०; सं. ब. पृ. ५ ]

आषाढ शु. १० = इ. १६८० जून २६ चे पूर्वी. रायरीस संभाजीकडे इंग्रज वकील बक्षिस मिळविण्यासाठीं रवाना झाले. सर्वत्र स्थीरस्थावर झाल्यानें आणि त्याला फुरसत असल्यामुळें इंग्रजांचें गाऱ्हाणें ऐकलें जाईल अशी समजूत. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४

आषाढ शु. ११ = इ. १६८० जून २७–श्रीशिवाजीराजे यांची ४ थी पत्नी पुतळाबाईनें अग्निप्रवेश केला. शि. च. प्र. ५३; त्रै. वर्ष९ अंक १ पृष्ठ १४

आषाढ शु. १४ = इ. १६८० जून ३० चे पूर्वी–संभाजी पन्हाळ्यावर. ५००० लष्कर गोळा केलें असून त्याला दोन महिन्यांचे पगार अगाऊ दिले. त्यांनीं आपले सुभेदार व अधिकारी नेमले. अनाजीचें डोकें मारल्याची मुंबईस बातमी. मोरोपंतावर मेहेरनजर परंतु पूर्ण विश्वास नाहीं. सर्वत्र स्थीरस्थावर होत आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४

आषाढ व. ११ = इ. १६८० जुलै १२ अनाजीची बातमी खोटी असल्याचें वर्तमान. इंग्रज व्यापारी लिहितात की संभाजीच्या नांवाची द्वाही फिरली आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १४; उम. सं. २३

(आषाढ व. ११ = इ. १६८० जुलै १२) संभाजी रायरीस राजारामास पूर्वीप्रमाणेंच ममतेनें वागवितो. सर्वत्र चांगलीच स्थीरस्थावर झाली आहे. संभाजीनें राजपद जाहीर केलें. वीस हजार सैन्य जमा केलें आहे. कारण समजत नाहीं; बातमी अशी आहे, कीं तो फार

(श. १६०२) धूर्ततेनें व काळजीपूर्वक वागत आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १५

श्रावण शुा ५ = १६८० जुलै २०
संभाजीराजे यांनी मंचकारोहण केलें.
शि. च. प्र. पृ. ३०; सं. बखर सिंहासनारोहण पृ. ५ उग्र. सं. २४

श्रावण वद्य २ = १६८० आगष्ट २. दाभोळेस मोत्याची वृष्टि झाली, शि. च. प्र. पृ. ३१; त्रै. व. ९ अं. १ पृ. १५

श्रावण व. ६ = इ. १६८० आगष्ट ५ मोत्याची वृष्टी रायगडास आणवून संभाजी राजे यानीं पाहिली. शि, च. प्र. ३१

श्रावण व. ८ = इ. १६८० आगष्ट ७ पूर्वी. बहादुरखान मोगलाकडून सुभेदार होऊन आला. दिलेरखान हुजूर गेला. बहादुरखानानें अहिवंतास वेढा घातला. मराठे चांगल्याप्रकारें तो लढवित आहेत. दिलेरखान परत गेला. त्रै. वर्ष. ९ अंक १ पृष्ठ १५; शि. च. प्र. पृ. ३०; उग्र. पृ. ४२

भाद्रपद शु. ६ = इ. १६८० आगस्ट २० पूर्वी–संभाजीराजे बहादुरखानाशी पावसाळ्यानंतर उघड लढाई देण्याची तयारी करीत असून बहादुराला त्यानें तसें कळविलें असल्याची बातमी. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १५

भाद्रपद–आश्वीन = इ. १६८० सप्टेंबर–एका काळोखी रात्रीं संभाजीचे २०० लोक उंदेरीवर उतरले. परंतु चाहूल लागल्यानें व रस्ता आणि जागा माहित नसल्यानें त्यांतील ८० चीं डोकीं मारली व मुंबईस आणले. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १५

आश्वीन वद्य १ ते आश्वीन व. ३० = स. १६८० सप्टेंबर २९ ते आक्टोबर १२–मोरोपंत रायगडीं वारले. निळोपंतास मुक्त करून. पेशवाई आणि अनाजीस मजमु दिल्ही. शि. च. प्र. पृष्ठ ३०; उग्र. सं. २४; त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १५

श. १६०२ कार्तीक = इ. १६८० आक्टोबर ११ ते नवें. ११. संभाजीराजे केळशी येथें येऊन बाबा याकूद फकीर यांचें दर्शन घेतलें; तेथें आठ दिवस वास्तव्य. कें. बखर पृ. ७

कार्तिक शु. ७ = इ. १६८० आक्टोबर १९ केळशीस स्वारी थाली. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १५

कार्तिक शु. १३ = इ. १६८० आक्टोबर २५ संभाजीराजे रायगडास गेले. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ ५

—पूर्वी. मुंबईकरांनीं पाठविलेल्या वकिलांना, शिद्यास मुंबईत राहूं देतां व दारुगोळा पुरवितां आणि हें शिवाजीच्या तहाविरुद्ध असल्यानें, बक्षिस न देतां परत घालवलें. शिद्दीला बाहेर काढून न कावलें व त्याला माणसें मिळण्याची बंद न केली तर त्यांचेवर शस्त्र धरण्यास लागून दिलेली रकमहि परत द्यावी लागेल असें सांगून पाठविलें. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १५

कार्तिक व. १४ = इ. १६८० नवंबर १० संभाजीची एक सेना व स्वार सुरतेला गेल्याची, दुसरी बऱ्हाणपूरवर चालल्याची व तिसरी बहादुरखानाला गुंतवण्यास निघालेली आहे अशी बातमी चोपड्यास होती. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १५

मार्ग. = इ. १६८० नवं. डिसें. आनाजीपंतास सोडिले व मजमू दिल्ही. त्यास बऱ्हाणपूर येथें हंबिरराव याणी मारिला. शि. च. प्र. पृ. ११

मार्गशीर्ष शु. ९ = इ. १६८० नवंबर २० मोरो पंडिताच्या हाताखालचा विश्वासू सरदार व सेनापति मुंबईत २० रोजीं गेला असून त्यांनीं शिद्याच्या विरुद्ध तक्रारीचें संभाजीचें पत्र आणलें आहे. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६

मार्गशीर्ष व. २ = इ. १६८० नवंबर २७ पूर्वी—संभाजीचें आरमार बाटेक तथा धूडगूस घालीत आहे. त्यांत ६० गलबतें, ५००० सैन्य आहे व ५००० माणूस किनाऱ्यावर ठेवलें आहे अशी बातमी. ऐ. वर्ष ९ अंक १ पृ. १६

श. १६०२ मार्गशीर्ष व. ४ = इ. १६८० नवंबर २९—बहादुरखानाच्या आगमनानें मराठ्यापासूनचा इंग्रजांस होणारा ताप कमी झाला. ऐ. वर्ष ९ पृष्ठ १ अंक १६

—मार्गशीर्ष व. ६ = स. १६८० डिसेंबर १ मराठ्यांचा तगादा सुटल्यानें मुंबईच्या प्रांतात शांतता झाली. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६

पौष = इ. १६८०–८१ डिसें. १२ ते जाने. ९ संभाजीराजे यांनी रघुनाथ नारायण.(हणमंते) यांस चंदी येथें कैद करविलें. हरजी राजे माहाडीक व शामजी नाईक पुंडे यांस कर्णाटकचा कारभार सांगितला. शि. च. प्र. पृ. ३०, ३१; ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६; उग्र. सं. पृष्ठ ३४

पौष वद्य ७ = १६८१ जाने. १ बाप औरंगजेब यास पदच्युत केल्याचा व स्वतः त्याचा पुत्र जो अकबर त्यानें तख्तनशीन झाल्याचा जाहीरनामा काढून बापास कैद करण्याकरतां अजमीरवर चाल केली. अजमीर येथें औरंगजेब होता. उग्र. सं. पृ. २६

पौष व. १२ = इ. १६८१ जानेवारी ६—जिंजी, कुडालूर कोमिनेर व पोर्टोनोव्हो येथील व्यापारी परवान्याबद्दल इंग्रजांची छ. संभाजीकडे मागणी करण्याचा ठराव. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६

पौष व. १४ = इ. १६८१ जानेवारी ८ पूर्वी. दोन दिवसां पूर्वीची सेंट जॉर्जला खबर कीं, संभाजीस तुकडे तुकडे करून सरदारांनीं मारिलें. शिवाजीच्या धाकट्या मुलास राज्यावर बसविलें. संभाजी व शिवाजीच्या धाकट्या भावानें रघुनाथ पंडितास धरून शृंखला घातल्या. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६

माघ शु. २ = इ. १६८१ जानेवारी ११. पोर्टोनोव्होला गोपाळ दादाजी हाच सुभेदार राहिला. ऐ. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६

माघ शु॥ ७ = १६८१ जाने. १६ अजमीर येथें औरंगजेब व त्याचा पुत्र अकबर यांचे युद्ध. अकबर पराभूत बरोबर दुर्गादास उग्र. सं. पृ. २७

—रविवार. संभाजी रायगडावर राज्याभिषेक होऊन सिंहासनस्थ झाले. विनायक–शांति, पुरंदर–शांति

(श. १६०२) होऊन १२ वृक्षा केल्या. सं. बखर पृ. ७, ८; कं. १५ कें. १०१ मध्यें शु. १० आहे. [ शि. च. प्र. पृ. ३१; उम्र. सं. २४. त्रै. वर्ष ९ अं. १ पृ. १६

फाल्गुन शु. ३ = इ. १६८१ फेब्रुवारी ११ चे पूर्वी. संभाजीच्या सैन्यानें धरणगांव लुटलें. इंग्रजांचेही नुकसान झालें. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६.

श. १६०३ दुर्मती चैत्र शुद्ध २ ते चैत्र व. ३० = इ. १६८१ मार्च ११ ते एप्रील ८ संभाजीराजे यांनी हरजीराजे माहाडीक व धामजी नाईक पुंडे यास बहिरजी काटकर व बादजी कांडे (काकडे) यांस ससैन्य कर्नाटकांत रवाना केले. [ शि. च. प्र. पृ. ३१;

चैत्र व. २ = इ. १६८१ मार्च २६ पूर्वी. औरंगजेबानें पैशाच्या टंचाईमुळें सुरतेला मुसलमानांवरहि १½ टके कर बसविला. त्रै. व ९ अंक १ पृष्ठ १६.

ज्येष्ठ शु. २ = इ. १६८१ मे ९ अकबर व दुर्गादास हे संभाजीस मिळण्यासाठीं नर्मदापार झाले उम्र. सं. २७

ज्येष्ठ शु. ४ = इ. १६८१ मे ११ अकबराचें संभाजीस पत्र. हिंदूस बुडवावें, हें औरंगजेबाचें राज्य-धोरण चूक आहे. त्यामुळें राज्य बादशहाचे मुकामापासून दूर आहे. मजबरोबर दुर्गादास राठोड आहेत. त्यासह आपण सर्व औरंगजेबास पदच्यूत करूं. मजविषयीं निःशंक असा, उम्र. सं. पृ. २७

ज्येष्ठ शु. ९ = इ. १६८१ मे १६ चे पूर्वी. पोर्तुगीजानें संभाजीच्या कांहीं लोकांना ठार मारल्यामुळें दमणजवळ मराठ्यांच्या सैन्यानें त्यांची घरें जाळलीं. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १६.

ज्येष्ठ शु. १ ते ज्येष्ठ व. ३० = इ. १६८१ मे ८ ते जून ६-सुलतान अकबर शहाजादा औरंगजेबावर बागी होऊन दक्षिण त्रिबकास आला. त्यास संभाजी राजे यांणीं कोंकणांत पालीस ठाव दिला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १० ज्येष्ठ वद्य १०=जून १; शि. च. प्र. पृ. ३१; उम्र. सं. पृ. २८

आषाढ शु. ५ = इ. १६८१ जून १० चे पूर्वी अकबर पालीस नागोठण्यापासून एका दिवसाच्या रस्त्यावर,

(श. १६०३) त्याच्याजवळ ४०० घोडे व ५० उंट व थोडेसें पायदळ आलें. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

आषाढ शु. ११ = १६८१ जून १६ संभाजीनें नेताजी पालकर, हिरोजी फर्जंद यांस अकबराचे भेटीस पाठविलें. नजरहि पाठविली. ऊम. सं. पृष्ठ २८

आषाढ शु. १२ = इ. १६८१ जून १७. हरजी फर्जंद खलिता व नजराणा घेऊन आला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

आषाढ व. १ = स. १६८१ जून. अकबर पालीस गडाखालीं दुर्गादासाबरोबर. भोंवतालीं संभाजीचें सैन्य ३०० आहे. संभाजी पन्हाळ्यावर. अद्याप भेट नाहीं. आणखी थोडे दिवस लागतील. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

श्रावण शु. ११ = सन १६८१ जुलै १६—अकबराचें सैन्य (१५०० व ५०००) त्रिंबक स्वार इतकें झालें आहे. संभाजी येण्याची रोज बोलवा असते. अशी बातमी आहे कीं, तो २००० स्वारासह अकबराला घेऊन बऱ्हाणपुरावर चालून जाईल. सर्व हिंदुराजे व उमराव तेथें त्यास सामील होतील. तेथून ते दिल्लीवर चालोन जातील. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

श्रावण वद्य ११ रविवार = १६८१ जुलै ११ औरंगजेबानें अजमशहा—३ रा पुत्र—यास अकबरावर ससैन्य पाठविलें. ऊम. सं. २९

श्रावण व. १४ = इ. १६८१ आगष्ट २—सिद्दी संबूलचा मुलगा संभाजीच्या बाजूला मिळण्याच्या उद्देशानें मुंबईस आला. कट उघडकीस येतो. अकबर पत्रें पाठवितो. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

भाद्र. = १६८१ आगष्ट सप्टं. संभाजी राजांनी कवि कलशाच्या सांगण्यावरून आणाजी दत्तो सचीव, बाळाजी आवजी प्रभु, सोमाजी दत्तो व हिरोजी फर्जंद यांना परळीजवळ कैद केले व नंतर ठार केले. कर्नाटकांत शामजी नाईक यास कैद शि. च. प्र. पृ. ३१; ऊम. सं. पृ. ३०; त्रै. व. ९ अं. १ पृ. १७

भ. आश्वीन शु. ६ = १६८१ सप्टं. ८ औरंगजेब अजमिराहून मुक्काम हलवितो व बऱ्हाणपुरास येतो. [ऊम. सं. २९

(श. १६०३) अ. आश्वीन शु. ९ = इ. १६८१ सप्टेंबर ८ चे पूर्वी संभाजी १०००० स्वारांनिशी बऱ्हाणपुरावर चाल करून जाण्यास तयार असल्याचें अकबरास कळवितो. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

आश्वीन शु. १० = इ. १६८१ आक्टोबर १२ चे पूर्वी संभाजी रायरीवर येतो. विषप्रयोगाच्या कटाची चोकशी करतो. बऱ्हाणपूरच्या स्वारीची तयारी. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

आश्वीन व. ८ = इ. १६८१ आक्टोबर २४ सिद्दी कासम मोगलाचा आरमारी सेनापती मुंबई बंदरांत आला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

आश्वीन व. ११ = इ. १६८१ आक्टोबर २७ राजारामाची आई सोयराबाई हिचा मृत्यू. संभाजीनें कोणाकडून तरी विष घालून मारले म्हणून बातमी आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १७

अ. आश्वीन = इ. १६८१ सप्टेंबर = हि. १०९२ रमजान औरंगझेबानें आदिलशाही राज्य काबीज करण्यास दिल्लीहून प्रस्थान उठविले. विजा. इ. मोडककृत पृ. २६१

कार्तीक शु. ११ = इ. १६८१ नोवें. ११ अकबरावर चाल करून येत असलेला त्याचा भाऊ अजमशहा हा औरंगाबादेस येतो. उम्र. सं. पृ. २९

कार्तिक शु. १३ = इ. १६८१ नोव्हेंबर १३ = हि. १०९२ जिलकाद १२ औरंगजेब बऱ्हाणपुरास येऊन पोहोंचला. विजा. इ. मोडक कृत. पृष्ठ २६५

कार्तीक शुा १३ रविवार = इ. १६८१ नोवें. १३ संभाजीराजे व अकबर यांची भेट पातशहापूर=घोडसें-(पाली=पातशहापूर. उम्र.) भेट झाली. बरोबर दुर्गादास होता. बहुत सन्मान झाला. ह्याच महिन्यांत अजमशहा = औरंग० चा ३ रा पुत्र औरंगाबादेस आला. शि. च. प्र. पृ. ३१ व ४८; उम्र. सं. पृ. २८ शुद्ध ११

माघ शु. ४ = इ. १६८२ जानेवारी ३–मराठ्यांनीं आपटें जाळलें, त्यामुळें शिद्यानें बराच धुमाकूळ घातला आहे.

(श. १६०३) परंतु संभाजीला त्याचा राग आला व त्यानें दंडा-राजपुरीचा नाश करण्यासाठीं सैन्य पाठविलें असून त्या सैन्यानें गेला पंधरवडा सारखा मारा चालू ठेवला आहे. तट फोडल्यामुळें शिद्दी दगडी टेकडीच्या आस-थ्यास लपून बसला आहे. पोर्तुगीजाची मदत मागितली असून ती त्यानें नाकारली तर चौलाचा नाश करण्याची भीति घातली आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १८

माघ व. ६ = इ. १६८२ जानेवारी १९-दंडाराजपुरीवर निकराचा हल्ला चालू आहे. समुद्रावरील खिस्ती सत्ता नाहींशी करण्याचें संभाजीनें ठरविलें आहे. मुंबईकरांना संभाजीच्या सैन्याकडून त्रास पोहोचूं लागला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १८

माघ वद्य ९ मंदवार = इ. स. १६८२ जाने. २२ रविवार. श्री रामदासस्वामी परळी किल्ल्यावर समाधिस्थ. सं. बखर पृ. ९

माघ ते फाल्गुन = इ. १६८२ जानेवारी. औरंगजेब बऱ्हाणपुरीं आला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १८.

माघ ते फाल्गुन = इ. १६८२ जानेवारी-हसन अलिखान कल्याण भिवंडी प्रांतांत जाळपोळ करून परत कल्याणास गेला. बरोबर २०००० स्वार व १५००० पायदळ आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १८.

फाल्गुन शु. ७ = इ. १६८२ फेब्रुवारी ४ दंडाराजपुरीवर हल्ला चालू आहे. नबाब हसन अलीखानानें घाटा-वरून येतांना संभाजीची बरीच गांवें जाळलीं व ८-९ पोर्तुगीजांचींहि जाळलीं. संभाजीच्या सैन्याचा व हसन-खानाचा झगडा झाला. दंडाराजपुरीचा वेढा उठ-विला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १८

फाल्गुन व. १२ = इ. १६८२ फेब्रुवारी २४-रणमस्तखान कल्याणास आला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १८

श. १६०४-०५ = इ. १६८३-८४ = हि. १०९४-अकमगीर बादशहाची व संभाजीची आलमाणच्या नजीक लढाई होऊन संभा-जीस जय मिळाला. अकमगीरकडील बरीच माणसे ठार व जखमी झाली. हुसेनखान पठाण अविक०

श. १६०४ पन्नोखान यास सोडून औरंगजेबास मिळतो. [ विवा. द. मोडक कृत पृ. २६५ ]

श. चैत्र वद्य १ = १६८२ मार्च २२. औरंगजेब औरंगाबादेस येतो. ऊम. ई. पृ. २१

चैत्र = १६८२ मार्च एप्रील–शाबदीखानानें रामसेज किल्ल्यास वेढा घातला. शि. च. प्र. पृ. ११–१२

चैत्र कर्नाटकांत श्रीरंगपटणकर व हरजी महाडीक, बहरजी काटकर, दादजी काकडे–हे त्रिचनापल्लीस मदतीस गेले होते–त्यांमध्यें भांडण झालें. २ ह. घोडी पाडाव केली, श्रीरंगपटणकरांचा सरदार कुमार हाहि पाडाव केला. [ ऐ. स. १ अं. १ पृ. १८ ]

चैत्र व. ११ = इ. स. १६८२ एप्रील २५–इंग्रजांचें इंटर नांवाचें आरमारी जहाज मुंबईत आलें. संभाजीचा इंग्रजांस निर्वाणीचा खलिता. ऐ. वर्ष १ अंक १ पृष्ठ १८

वैशाख = १६८२ एप्रील मे. रूपाजी भोसले, मानाजी मोरे यांनीं शाबदीखानाशीं गणेशगावाजवळ लढाई देऊन त्याची ५०० घोडी पाडाव केली. शि. च. प्र. पृ. १२

वैशाख शु. १ = इ. १६८२ एप्रील २८ पूर्वी–अंजदीव बेटे घेण्यास माणसें रवाना झालीं. पोर्तुगीजांनींही ४ गल-बतें व २०० लष्कर पाठविलें आहे. ऐ. वर्ष १ अंक १ पृष्ठ १८

वैशाख शु. ९ = इ. १६८२ मे २–फोंदव मजवर यानें मराठी लोकांस हांकून काढून अंजदीव घेतलें व मोठ्या समारं-भानें किल्ल्याच्या पायाचा दगड बसविला. तेथील हिंदूंचें देवालय पाडून चर्च केलें. ऐ. वर्ष १ अंक १ पृष्ठ १९

वैशाख शु. १२ = इ. १६८२ मे ८–इंग्रजांचे शिपायांकडचें ५ तर्णे, शिद्याची लुटालूट चालू. ऐ. वर्ष १ अंक १ पृष्ठ १९

वैशाख व. ५ = इ. १६८२ मे १६–मायनाईक भंडारी व सिद्दी संबळचा जावई यांचे हाताखालीं १५ गलबतें

(श. १६०४) व ५००० बारकर देऊन इंग्रजांवर संभाजीनें आरमार पाठविलें. भै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

वैशाख वद्य ७ गुरुवार = इ. १६८२ मे १८ संभाजी व येसुबाई यांस गांगोली येथें शिवाजी = शाहू पुत्रजन्म. सूर्योदयापासून घ. ५४ (दिनमान घ. ३२) शततारका नक्षत्र चरण ३ रास कुंभ. इ. सं. पे. द. ब. मा. पृ. १; शि. च. प्र. पृष्ठ ३१

वैशाख व. ११ = इ. १६८२ मे २२–धरणगांवचे आसपास धांदल, औरंगजेब औरंगाबादेस आला. भै. वर्ष ९ अंक १ पृ. १९

ज्येष्ठ शु. ७ = इ. १६८२ जून २. गलबतें ४० व इंग्रजी आरमार याची लढाई. खांदेरीस मराठी आरमार गेलें. भै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

आषाढ शु. ९ = इ. १६८२ जुलै ३–सिद्दी संबूळच्या मुलाकडे संभाजीच्या आरमाराचा कांहीं भाग असून तो लढत आहे. भै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

आषाढ व. १ = इ. १६८२ जुलै १०–पावसाळ्यासाठीं औरंगजेब औरंगाबादेस व बहादुरखान नाशिक त्रिंबकास तळ देतो. सर्वत्र महागाई (धरणगांव) भै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

श्रावण शु. ४ = इ. १६८२ जुलै २८–संभाजीनें पोर्तुगीजांची जहाजें पकडली. भै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

श्रावण शु. ७ = इ. १६८२ जुलै ३०–सर्व बाजूनें संभाजीवर चढाई होत आहे. यांतून संभाजी यांचणें शक्य दिसत नाहीं. भै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

आषाढ, श्रावण = इ. १६८२ जुलै–संभाजीचे ३–४ गड मोंगलांकडे गेले. रामसेजही त्यांनी घेतला. हंबीरराबास १०,००० पायदळ देऊन पाठविलें. परंतु २००० लोक पाडाव झाले. मराठी सैन्य सातान्यास आले. लोकांचे पगारहि थकले आहेत. विजापूरकराला ९ लाख रुपये देऊन मोंगलानें मदतीस घेतलें. सर्जाखान वगैरे लोक २० हजार स्वार घेऊन मिरजला आले आहेत. संभाजीनें विजापूरकराकडे वकील पाठवून त्यांची मदत

(श. १६०४) मागितली. परंतु बऱ्याच अटी घातल्यामुळें संभाजीस ती स्वीकारतां आली नाहीं. दादप्रभु बरोबर ४ हजार चांगले निवडक लोक देऊन दंडाराजपुरीवर हल्ला केला; परंतु त्यांत यश नाहीं. जवळ जवळ ५०० लोक कांचले. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

भाद्रपद शु. ६ = इ. १६८२ ऑगस्ट २८–सिद्यानें कुर्ला वगैरे लुटलें. नागोठण्याच्या बाजूलाही लुटालूट करून माणसें धरून नेलीं. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ १९

भाद्रपद शु. ९ = इ. १६८२ आगष्ट ३१–सुलतान तारानें बंड केल्याची बातमी फुटली. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

भाद्रपद शु. १४ = इ. १६८२ सप्टेंबर ५ ३०,००० सैन्या-निशी अकबर व संभाजी औरंगजेबावर चालून जाण्याची तयारी करीत आहेत. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

भाद्रपद व. १३ = इ. १६८२ सप्टेंबर १९.२०,००० सैन्या-निशी बहादुरखान औरंगजेबाकडे येत आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

आश्वीन = इ.१६८२ सप्टें.आक्टो.रामसेजेचा शाबदीखानाचा वेढा उठला. शि.'च. प्र. पृ. ३२;

आश्वीन शु. ११ = इ. १६८२ आक्टोबर ४–सिद्दी मसूद धारला. सर्जाखानाला पाठविलें. पन्हाळा विजापूर-करांना दिल्याची बातमी आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

आश्वीन शु. १४ = इ. १६८२ आक्टोबर ५–सिद्दी मिस्त्रि ३० गलबतें घेऊन नागोठण्याच्या बाहेर आला. दौलत-खान ८० गलबतांसह नागोठण्यांस आले. सिद्यानें १६ गलबतांनिशीं भांडण दिलें. त्यांत मराठ्यांचीं ७ गलबतें सिद्यानें नेली व ४० लोक मारले. परंतु सिद्दी मिस्त्री जखम होऊन मेला. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

आश्वीन व. ३० = इ. १६८२ आक्टोबर २०. १२००० स्वार व २०,००० पायदळ यांसह दुर्गादास सुर-तेच्या बाजूला कूच करीत आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

(श. १६०४) आश्वीन, कार्तिक = इ. १६८२ आक्टोबर. संभाजीचा वकील इंग्रजाकडे मुंबईस होता. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

कार्तिक, मार्गशीर्ष = इ. १६८२ नोव्हेंबर. सिद्यानें लुटालूट चालविली आहे. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

मार्ग. = इ. १६८२ नोवें. डिसें. रणमस्तखान कल्याणास आला असतां त्यावर रूपाजी भोसले, केसोपंत व निळोपंत पेशवे रवाना झाले. शि. च. प्र. पृ. १२; ऊम. सं. ६०

मार्गशीर्ष शु. ३ = इ. १६८२ नोव्हेंबर २२—बहादुरखान व रणमस्तखान कोंकणांत उतरले. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

मार्गशीर्ष शु. ५ = स. १६८२ नोव्हेंबर २४ रणमस्तखानाचा कल्याणास मुक्काम. त्रै. वर्ष ९ अंक १ पृष्ठ २०

पौष = इ. १६८२ डिसें. १६८३ जाने. रघुनाथ नारायण हणमंते कर्नाटकांतून येऊन संभाजी राजे यास भेटले व त्यांस मुजमू दिल्ही शि. च. प्र. पृ. १२

माघ = १६८३ जाने. फेब्रु. सुलतान अजमशहा कोल्हापूरपावेतो आला असतां त्यास हंबिररायानीं हटवून भयरे अलिकडे लाविले. शि. च. प्र. पृ. १२

श. १६०५ = इ. १६८३ औरंगजेब यानीं भागानगरची पातशाही घेऊन बंदोबस्त करून छावणी केली. सं. बखर पृ. १३–१४; खं. १५ ले. ३०१

चैत्र = इ. १६८३ मार्च एप्रील. रोहिलाखान कोंकणांतून उतरून गेला व रणमस्तखान घाटावर घेऊन गेला. तेव्हां त्याशी रूपाजी भोसले याने तिटोलियाजवळ लढाई केली. पद्मसिंग रजपूत व इतर कित्येक थोर लोक ठार केले. शि. च. प्र. पृ. १२

वैशाख वद्य ४ बुधवार = १६८३ मे ४. रघुनाथ नारायण हणमंते वळणी येथें मृत्यु पावले. शि. च. प्र. पृ. १२

ज्येष्ठ वद्य ११ = इ. १६८३ जून १०. संभाजी राजे स्वार होऊन राजापुरास गेले, फिरंगियासीहि बिघाड केला. रेवदंड्यास वेढा घातला. शि. च. प्र. पृ. १२

(श. १६०५) आषाढ शुा १५ = इ. १६८३ जून २८ जनार्दन नारायण हणमंते यांचा देवरूख येथें मृत्यु शि. च. प्र. पृ. ३१

भाद्रपद व. ३ = इ. १६८३ आगष्ट ३० = हि. १०९४ रमजान १७ सिकंदरबादशहानें मसऊदकडून त्याच्या आग्रहास्तव शपथा घेऊन अदोनीस जाण्यास त्यास परवानगी दिली. विजा. इ. मोडककृत पृ. २६३

आश्वीन = इ. १६८३ सप्टें. आक्टो. अवरंगजेब औरंगाबादे-हून अहमदनगरास आला. दिलेरखान विष खाऊन आत्महत्या करतो. शि. च. प्र. पृ. ३२

कार्तिक = इ. १६८३ आक्टो. नोवें. शाबदिखान पुण्यांत येऊन मुक्काम करतो. शि. च. प्र पृ. ३२

कार्तीक वद्य ७ = इ.१६८३ नोवें. १ संभाजीराजे हंदि (फोंडि)-यास गेले. गोवीकर फिरंगीयानी कोटास वेढा घातला होता त्यासी लढाई करून वेढा उठविला. तेथें येसजी कंक व त्याचा लेक कृष्णाजी कंक याणें युद्धाचीं शर्त केली शि. च. प्र. ३२; ले. १५१ व १५२ पहा.

मार्गं. = इ. १६८३ डिसें. २१ संभाजीनें फिरंगियाचे कुंमार-जुवें घेतले. साष्टी व बारदेश मारले. शि. च. प्र. पृ. ३२

मार्गशीर्ष शु. १२ = इ. १६८३ नोव्हेंबर २० = १०९४ जिल्हेज ११. मसऊदखान विजापुराहून निघून अदोनीस आला. विजा. इ. मो. कृत पृ. २६३

पौष शु. १५ = इ. १६८३ डिसें. २३ संभाजी राजे रायेगडास जातात व कविकलुशास कुल येखत्यार दिला. शि. च. प्र. पृ. ३३

पौष वद्य ४ = इ. १६८३ डिसें. २७ शाबदीखान देवघाटानें उतरून निजामपूर मारतो. शि. च. प्र. ३२

पौष वद्य ५ = इ. १६८३ डिसें. २८ शाहा आलम राम-घाटानें उतरून कुडाळ व बांदे जाळतो. शि. च. प्र. पृ. ३३

माघ शुा १ इ. १६८४ जाने. ७ कविकलश अकबरास घेऊन भीमगडच्या झाडीत गेले. फिरंगियासी सल्ला केला. शि. च. प्र. पृ. ३३

(श. १६०५) फाल्गून शुद्ध १५ = इ. १६८४ फेब्रु. २० शाहा आलम घाटा-
वर जातो व जातांना लष्कर फार मरतें. शि. च. प्र. पृ. ३२

श. १६०६ चैत्र व. १० = इ. १६८४ मार्च ३०–हि. १०९५ रबर ११ आदिलशहाकडे अलमगिरकडून एक आज्ञापत्र येतें. त्यातील सारांश, संभाजीशी अंतर्बाह्य परिचय न ठेवतां त्याचे निर्मूलन करण्याचा विचार चालवावा. वि. इ. मो. कृत पृ. २६६

रक्ताक्षी संवत्सर वैशाख = इ. १६८४ एप्रील मे. शाहाअलम विजापूराजवळील शेकस म्हणून गांव तेथें राहिला. शि. च. प्र. पृ. ३३

ज्येष्ठ शुा १५ = इ. १६८४ मे १८ विजापूरकरानी मोगलासी विगाड केला. शि. च. प्र. पृ. ३३

कार्तिक शु. २ = इ. १६८४ आक्टो. २९. मानाजी मोरे व गंगाधरपंत, वासुदेवपंत, राहुजी सोमनाथ यांस संभाजी-राजानी कैद केले. शि. च. प्र. पृ. ३३; उग्र सं. पृ. ३६

कार्तिक शु. ११ = इ. १६८४ नोवें. ७ कवजी रायगडास येतो शि. च. प्र. पृ. ३३

कार्तिक शु. १४ = इ. १६८४ नोव्हेंबर १० = हि. १०९५ जिलकाद १२ आकाखुसरव इहलोक सोडून परलोकी गेला. विजा. इ. मोडककृत पृ. २६३

पौष = १६८४–८५ डिसें. ज्यानेवारी. यकोजीराजे तंजावर येथें वारले. शि. च. प्र. पृ. ३३

पौष वद्य ४ = इ. १६८५ जाने. १४ शाबदीखान पुण्याहून दौड करून बोरघाटानें उतरून गांगोलीस आला. तेथें कवि-कलशानें जाऊन भांडण दिल्हे. फिरोन घाटावरी घातला. शि. च. प्र. पृ. ३३

माघ = इ. १६८५ जाने. फेब्रु. कुडालकर देसाई खेमसावंत पारखा जाला त्यास फिरंग्यानी आश्रय दिल्हा. शि. च. प्र. पृ. ३३

श. १६०७ क्रोधन संवत्सरे = इ. स. १६८५ राहिमखान बहुरखान रणमस्तखान येऊन विजापूरास वेढा घातला. शि. च. प्र. पृ. ३३

(श. १६०७) वैशाख=इ. १६८५ एप्रिल, मे. भागानगरकरानी विजापुरकरांस मदत तीन ह. स्वार व तीन लक्ष होन खर्चास दिल्हे. शाहा आजम व बहादुरखान ऐसे जाऊन भागानगर लुटिले. त्याच महिन्यात मोदणावरी हाला करून मारिले. त्याचा भाऊ अकंणा मारिला. कोड रुपये घेऊन मोगलासी सला केला. शि. च. प्र. पु. ११

ज्येष्ठ = इ. १६८५ मे जून--अवरंगजेब अहमदानगरीहून कुच करून सोलापुरास आले. विजापुरावरी मोहीम केली. शि. च. प्र. पु. ११

आषाढ = इ. १६८५ जून, जुलै–संभाजी राजे याणी विजापूरचे मदतीस कबजीस पाठविले. ते जाऊन पनाळा राहून फौजा रवाना केल्या. शि. च. प्र. पु. ११

मार्गशीर्ष व. ९ = इ. १६८५ डिसेंबर १० = हि. १०९७ मोहरम २३ संभाजीकडून हंबीरराव सैन्यासह घेऊन विजापुरीं पोहोचले. [वि. इ. मोडकफ़ृत पु. २७०]

श. १६०८ चैत्र = इ. १६८६ मार्च, एप्रील–मिरज मोगलानीं घेतली. शि. च. प्र. पु. १४.

आषाढ = इ. १६८६ जून जुलै–अवरंगजेब सोळापुरीहून येऊन विजापुरासी लगट केली. शि. च. प्र. पु. ११

आषाढ शु. ३ = इ. १६८६ जून १४ = हि. १०९७ साबान २ औरंगजेब ससैन्य सोलापूरहून रसूलपुरास आला. विजा. इ. मो. कृत पु. २७१

आश्वीन शु. ६ = इ. १६८६ सप्टेंबर १३ = हि. १०९७ जिल्काद ४ विजापूर किल्ला औरंगझेबाच्या स्वाधीन झाला. वि. इ. मो. कृ. पृ. २७१

आश्वीन शु. ७ सोमवार=इ. १६८६ सप्टं. १४ औरंगजेबानें विजापूर घेतलें, सुलतान सिकंदर भेट व नजरकैद; सरजाखान व बहलोलखानाचा लेक यांस पंच हजारी दिल्ही. शि. च. प्र. पृ. ४८; ११, १४

आश्वीन शु. ७ = श. १६८६ सप्टेंबर १४ = हि. १०९७ जिल्काद ५ औरंगजेबाचा विजापूरांत शहर पहाण्याकरतां प्रवेश. विजा. इ. मो. कृत पृष्ठ २७१

(श. १६०८) कार्तीक = इ. १६८६ आक्टोबर नोव्हेंबर. केसो त्रिमल कर-
नाटकात रवाना केले. शि. च. प्र. पृ. ३३

पौष = १६८६ डिसें. १६८७ जाने. औरंगजेब बुऱ्हाणपुरास
आला. शि. च. प्र. पृ. ३३

माघ = स. १६८७ जानेवारी फेब्रुवारी–कुतुबशाहा बसव-
पटण अदी करून भागानगर अवरंगजेबास दिल्ही.
कासिमखानाचे विद्यमाने तेच माशी अवरंगजेब भागा-
नगरास येऊन वेढा घातला. करनाटकात व देशात
दुकाल पडिला. शि. च. प्र. पृ. ३४

फाल्गुण सुध १० = इ. १६८७ फेब्रुवारी ११ केसोपंत कर-
नाटकात गेले. शि. च. प्र. पृ. ३४

फाल्गुन = सन १६८७ फेब्रुवारी मार्च. अकबर जाहजात बैसोन
इराणात गेला. शि. च. प्र. पृ. ३४

शक १६०९ प्रभव संवछरे आषाढ शु. १० = इ. १६८७ जुले १० बंगळोर
म्हैसुरकरी मदत आणून कासीमखानास फौजनिसी घेतले.
म्हणजे म्हैसूरकर चिक्कदेव वोडियार यानें हरजी राजे महा-
डीक वगैरेंचें सहाय्य घेऊन कासमखानास त्याच्या सैन्या-
सह बंगलोरमधून घालवून दिले. शि. च. प्र. पृ. ३४

भाद्रपद सुध १२ = इ. १६८७ सप्टेंबर ८ अवरंगजेबे भेद
करून भागानर घेतले. कुतुबशहा जिवंतच दस्त केला.
शि. च. प्र. पृ. ३४, ४८

आश्वीन सुध १=इ. १६८७ सप्टेंबर २७ कासीमखाने किल्लेदारासी
भेद करून पिलगोंडे घेतले शि. च. प्र. पृ. ३४

पौष = इ. १६८७=८८ डिसेंबर जानेवारी. अवरंगजेब विजा-
पुरास येतो व शाबदीखानास गाजदीखानी दिल्ही.अदवनी
वर पाठविले, तेथें जाऊन वेढा घातला. (सर्जाराव जेधे
समेत भाऊ व लोक राजमाचीस राजश्री निळोपंत प्रधान
याजवल सेवेसी होते.) शि. च. प्र. पृ. ३४

फाल्गुण = इ. १६८८ फेब्रवारी–मार्च इसमाइलखान मका
व याचपाखान नाईक व सादी महमद येऊन कंची
सोडिविली. शि. च. प्र. पृष्ठ ३४

फाल्गुण=इ. १६८८ फेब्रुवारी मार्च, अजमशाहा याणी बेळगाव
घेतले व इतरहि कितेक किले घेतले शि. च. प्र. पृ. ३४

(श. १६०९) संवत् १७४४ इ. १६८७ नंदुरबार येथील जटाशंकराचें मंदीर शिवाजी व मुलगा संभाजी ह्याच नांवाच्या अधिकाऱ्यांनीं बांधविलें. मुं. यु. जर्नल व प्रा. प. कृ. गोडे.

शक १६१० विभव संवछरे चैत्र शु. १ = इ. १६८८ मार्च २२-हरजी महाडीक त्रिणामलीहून कंचीवर गेले शि. च.प्र.पृ. ३४

आश्वीन = इ. १६८८ सप्तेंबर–आक्टोबर विजापुरास महामारीचा रोग शि. च. प्र. पृ. ३४

कार्तीक = इ. १६८८ आक्टोबर नोव्हेंबर. कविकलश याजवरी सिरके पारखे जाले. कलश पळोन खिलणियांवर गेला. तेच मासी संभाजी राजे रायेगडाहून कलशाचे मदतीस आले, समागमे स्वारी सिरकियांसी युध्य करून त्यास पळऊन आपण खलणियास आले शि. च. प्र. पृ. ३४

मार्गशीर्ष = इ. १६८८ नोव्हेंबर डिसेंबर. संभाजी राजे याणी कळशाच्या बोले प्रल्हादपंत व सर कारकून व कितेक लोकास धरिले. तेच मासी औरंगजेब विजापुरीहून तुळापूरजवीक भीमातीर येथें आले. शि. च. प्र. पृ. ३४

माघ वद्य ७ शुक्रवासर=स. १६८९ फेब्रुवारी १ संभाजी राजे व कविकलश खेळणाहून रायेगडास पावयास संगमेश्वरास अले असता सेक निजाम कोल्हापुरीहून दौड करून येऊन उभयेतांस जीवतच धरून नेले वरकड लोक पळोन रायेगडास गेले. शि. च. प्र. पृ. ३४–३५, ४८

माघ व. ३० = इ. सन १६८९ फेब्रुवारी ९ अटकखानाहून राजारामास बाहेर काढिले. शि. च. प्र. पृ. ३४-३५

फाल्गुण शुध ३=सन १६८९ फेब्रुवारी १२–राजारामास रायेगडचा किल्लेदार चांगोजी काटकर व येसजी कंक यांणी मंचकी बैसविले. मानाजी मोरे व वरकड सरकारकून धरिले होते ते सोडिले. ज्याचें कार्यभाग त्यासी देऊन राजाराम राज्य करू लागले. येसजी व सिदोजी फर्जंद यास कडेलोट केले ! शि. च. प्र. पृ. ३४–३५

फाल्गुन शु. ५ = इ. १६८९ फेब्रुवारी १४ = हि. ११०० जमल ५ बहादुरगडच्या किल्ल्यांत इतरांस पकडून ठेविले. बिला. इ. मो. कृत पृ. २७६

(श.१६१०) फाल्गुण व. १३=सन १६८९ मार्च ९ हरजी महाडिक यांणी केसो त्रिमल यांस संभाजी राजे याचे विपरीत वर्तमान येकोन त्रिणामळी धरिलें. शि. च. प्र. पृ. ३५

फाल्गुण व. ३० = इ. सन १६८९ मार्च ११ अवरंगजेब तुळापुरी संभाजी राजे व कविकलश यास जिवे मारून सिरच्छेद केले. शि. च. प्र. पृ. ३५; खं. १८ पृ. ४७; सं. बखर पृ. २६; खं. १५ ले. ३०१. कोरेगांव ऊर्फ फत्तेआबाद येथें ठार मारिलें. शिवा. इ. मोडकफ़ृत पृ. २७६

—औरंग शाहे पातशाहे विजापूर भागानगर फत्तेकरून या प्रांतास येऊन पातशहा वढूकोरेगावी मुकाम केला. तेथून लष्कर पाठवून संभाजी राजे धरून आणिले आणि वढू कोरेगावांत (फत्ताबाद) मारिला. त्याचा लेक शाहू व बाइका आपल्या आलमगिरी जाळींत ठेविली. शि. च. सा. ५ पृ. ६९; मआसीर इ.;

—कै. संभाजीराजे स्वामी यांचें वृंदावन दर जागा मौजे वढू ता पाबल येथें करून शुश्रूषेसाठीं व व्यवस्थेसाठीं भिकाराम गोसावी, वासुदेवभट शामभट धर्माधिकारी ठेवून धूपदीप नैवेद्य, बाग तुळसी व अन्नछत्राबद्दल बागाईत जमीन बिघे ५, कोरडवाहू बहित जमीन बिघे १० आणि बाकीची पड जमीन बिघे १०५ मिळून १२० बिघे जमीन दिली. शा. रो. पृ. १६; पे. द. ३० ले. १६

---

# सूची

पुढील सूचीत संभाजी का. प. सा. संग्रहांत व संभाजी शकावलींत आलेल्या व्यक्तिस्थल-नामांची अकारादि वर्णानुक्रमानें नोंद केली आहे. नांवापुढें शककाल दर्शित केला असून त्यापुढें लेखांक वा पृष्ठांक दिलेले आहेत. नांव पहातांना जुनी परिपाठी लक्ष्यांत घेऊन केशव-केसव-केसो; एसजी-पेसजी, आमदानगर-अहमदनगर-नगर, इब्राहिम-इभराइम-पूर, कऱ्हाड-कराड, खेळणा-खिळणी, गदग-गदक, चांबली-चामिळी, चेऊल-चौल, दहावकस-दहावक्ष; वेंकटापती-वें० पती इत्यादि शब्दोच्चारप्रकार लक्ष्यांत आणून नावें पहावी.

—•समाप्त•—

# शुद्धिपत्र

| पान | लेखांक | ओळ | आहे | पाहिजे |
|---|---|---|---|---|
| १ | ३ | ५ | 'येथें' | 'येथें' नको |
| ३ | ८ | १,२ | आश्वीन,ऑक्टं. २३ | भाद्रपद,आगष्ट २४ |
| १२ | ७१ | ५ | आताहि देणें | आताहि जें असे |
| २७ | ९१ | ९ | | देत असाल तसें देणें |
| | | | ठाणामासी | ठाणामासी = मजकुरासी |
| २८ | ९४ | ६ | वाठविके | पाठविके |
| २९ | ९८ | ७ | 'भट' | 'भट' शब्द नको |
| ३० | ९९ | १ | सं. १५ | सं. १८ |
| ३२ | १०७ | १२ | श. १६०५ | श. १६१० |
| ३४ | ११० | १५ | इ.१६८६, मावळा | इ. १६८९, मवाळा |
| ४१ | १११ | १ | श. १६८६–८७ | श. १६०६–०७ |
| ५१ | १५९ | ३ | नारायण रघुनाथ | रघुनाथ नारायण |
| ५५ | १६८ | १ | १३०७ | १६०७ |
| ५९ | १८० | २ | १३८५ | १६८५ |
| ६१ | १८४ | ६ | जासनीस | जामनीस |
| ६३ | १८८ | १ | १६०८ चै. | १६०७ माघ शु. ७ |
| ७१ | २१७ | ३ | मोके | मोवके |
| ७४ | २२६ | ५ | पुरोहिताची | पुरोहितपण |
| ७५ | २२८ | ३ | पळणारा | पकडणारा |
| ८१ | २४३ | ८ | होऊन | होऊ न |
| ८४ | २५४ | ८ | पेस्वद | पेस्तर |
| ८६ | २५९ | ३ | देशये | देहाये |
| ८७ | २६३ | ५ | तुपा | तु पा = व |
| | | | मो | ता = तर्फ |
| ९० | २७४ | ३ | जहीद असारी | जदीद असामी |
| १०३ | | ३ | शिवाजीनींच | संभाजीनें |

रायगडावरील दप्तरखानाच नष्ट झाल्यामुळे छत्रपती शिवाजी महाराजांप्रमाणेच छत्रपती संभाजी महाराजांच्या कारकिर्दीची कागदपत्रे एकत्रितपणे मिळालेली नाहीत. त्यांच्या चरित्रांवर प्रकाश टाकणारी थोडीफार कागदपत्रे इतिहास संशोधकांनी अक्षरशः वणवण फिरून, निरनिराळ्या गावांमधून आणि घराण्यांमधून मोठ्या मिनतवारीने मिळविली आहेत. अभ्यासकांना या कागदपत्रांची भूक असल्यामुळे ती जसजशी मिळत गेली तसतशी प्रकाशितही करण्यात आली. ती उजेडात आली हे चांगलेच झाले, पण ती निरनिराळ्या संशोधकीय नियतकालिकांमधून व पुस्तकांमधून विखुरली असल्यामुळे एक मोठी गैरसोयही झाली. शिवाजी महाराजांच्या आणि संभाजी महाराजांच्या चरित्रांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना आणि संशोधकांना ती एकत्रितपणे उपलब्ध नव्हती.

शिवाजी महाराजांच्या चरित्राविषयी ही अडचण भारत इतिहास संशोधक मंडळ आणि रायगड स्मारक मंडळ यांनी एकत्र येऊन स्थापन केलेल्या शिवचरित्र कार्यालयाने शिवकालीन-पत्र-सार-संग्रह प्रकाशित करून दूर केली. शिव-चरित्रोपयोगी अशी विविध भाषांमधील जी कागदपत्रे तोवर प्रकाशित झाली होती त्या कागदपत्रांचे सारांश त्या ग्रंथात कालानुक्रमे लावून छापले आहेत. मुळात पत्र कोठे प्रकाशित झाले तेही प्रत्येक सारांशाच्या मथळ्यात नमूद केले आहे. त्यामुळे, ज्यांना मूळ पत्राचा संपूर्ण पाठच पाहावयाचा असेल त्यांनाही तो पाहाणे सुलभ झाले आहे.

छत्रपती संभाजी महाराजांच्या चरित्राच्या बाबतीत अभ्यासकांची अशीच सोय विद्वान इतिहास संशोधक शंकर नारायण जोशी यांनी संपादित केलेल्या संभाजीकालीन पत्र-सार-संग्रह या ग्रंथामुळे झाली आहे. कधी कधी संभाजी महाराजांचे एखादे पत्र किंवा त्यातील उद्गार अभ्यासकाला आठवतात पण ते पत्र नेमके कोठे छापले आहे ते सांगता येत नाही. उदाहरणार्थ : मोगलांचे येथील राज्य काही फार काळ राहणार नाही अशा अर्थी "दोन दिवसांचे मोगल" असे जे अर्थपूर्ण उद्गार संभाजी महाराजांच्या एका पत्रात आले आहेत ते अगदी लक्षात राहाण्यासारखे आहेत; पण ते पत्र नेमके कोठे छापले आहे किंवा त्याची तारीख काय आहे ते आयत्या वेळी आठवेलच असे नाही. हा पत्र-सार-संग्रह वर वर चाळला तरी काही मिनिटांत ह्या पत्राचा थांगपत्ता लागू शकेल. मराठ्यांच्या इतिहासाच्या, आणि प्रामुख्याने संभाजी महाराजांच्या चरित्राच्या, अभ्यासकांची अशी मोठीच सोय या ग्रंथाने केली आहे. शेवटी संभाजी महाराजांच्या चरित्राची विस्तृत शकावलीही दिली असल्याने ग्रंथांची उपयुक्तता अधिकच वाढली आहे.

श्री. गजानन भा. मेहेंदळे